श्री

# शाकुंतल--सार व विचार.

प्रस्तुत लेख

रा० रा० माधवराव व्यंकटेश लेले, बी. ए., एल्. सी. ई.

यांनीं लिहून

'विविधज्ञानविस्तार' या मासिक पुस्तकांतून मूळ प्रकाशित केला.

तो

मराठी वाचकांच्या सोईसाठीं स्वतंत्र पुस्तकरूपानें

मुंबईंत 'कर्नाटक' प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केला.

१९०९.





किंमत बारा आणे.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | का. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ३ | २ | २२ | मनाल | मनाला |
| ४ | १ | १३ | 'केसर—बकुळ'—येथपासून—'पण थोडी' पर्यंत दोन प्याराग्राफ रद्द समजून त्याचे ऐवजीं पुढील मजकूर वाचवा. 'भ्रमरांनीं थोडथोडे चुंबित केलेले कोमल केसराचे अग्रभाग असलेलीं कोमल शिरीष पुष्पें आतुर व प्रेमळ प्रमदाजन जपून व लीलेनें कानांत अवतंसासारखीं घालताहेत. (यांत गायनाला योग्य असें पदलालित्य आणि ध्वन्यर्थयुक्त व पुढील कथा—प्रकाराचें सूचक; शास्त्रशुद्ध व मनोहर वर्णन आहे.) | |
| ५ | १ | २४ | वेडी वांकडी | उंच सरळ |
| ५ | २ | १० | धांवणाऱ्या | धावणाऱ्यांच्या |
| ६ | २ | २६ | त्यांतह | त्यांतही |
| ८ | १ | ३१ | त्याशिवाय | त्याप्रमाणें. |
| ११ | १ | १५ | मनोरथ | मनोरम |
| ११ | २ | २३ | वर्णन | वर्तन |
| १३ | १ | १ | प्रिय मधुर | प्रिय व मधुर |
| १३ | १ | २९ | पर्यत्सुक | पर्युत्सुक |
| १४ | १ | १६ | आहे' | आहे |
| १४ | २ | १९ | संभवाची | संभवा |
| १६ | २ | १९ | गळत | गळले |
| १८ | २ | २८ | राजा-नगराला | राजा-'नगराला |
| २१ | १ | २० | कृतक केल्यानें | कृतक कोपानें |
| ३१ | १ | ४ | फिरत नाहीं. | फिरत नाहीं.' |
| ४७ | १ | ३१ | करंटींत | करंडींत |
| ५३ | २ | १० | चक्रवकीला | चक्रवाकीला |
| ५७ | २ | १० | त्यानें | त्यांत |

| पृष्ट. | का. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ५८ | १ | २६ | मधुर मधुर | मधुर मधु |
| ५८ | २ | २० | आला.' | आला. |
| ५९ | १ | १८ | होतो. | होतोच. |
| ६० | १ | २ | आहे. | आहे.' |
| ६१ | २ | ७ | वेत्रपतिके | वेत्रवतिके |
| ६२ | २ | २८ | प्रतिहारीनें | प्रतिहारी— |
| ६३ | २ | १ | अनाशक्त | अनासक्त |
| ६४ | २ | १९ | प्रत्यक्ष साक्षात् | साक्षात् |
| ६७ | २ | २७ | दीर्घपांग | दीर्घापांग |
| ७८ | १ | ११ | भाग्ययान | भाग्यवान् |
| ८८ | १ | १६ | कुलस्थनः | कुलस्यनः' |
| ९१ | २ | १७ | चालविले | चाळविलें |
| ९२ | २ | ४ | पुढें त्या | पुढें त्यानें त्या |
| ९३ | २ | ३४ | प्रवाह | प्रवह |
| ९४ | १ | २९ | पोचतां. | पोहोंचतां.' |
| ९४ | २ | ६ | सलंग | सलग |
| ९६ | १ | २,३ | वृक्षनियुक्त | वृक्षांनीं युक्त |
| १०१ | १ | १४ | चुकीला | चुकीचा |
| १०६ | २ | ३३ | वासवानुदोज्य | वासवानुयोज्य |

श्री

# शाकुंतलसार व विचार.

## प्रस्तावना.

सर्व संस्कृत नाटकग्रंथांत या नाटकाला अग्रगण्यतेचा मान मिळालेला आहे, व तो सर्व प्रकारें योग्यही आहे. एतद्देशीय प्राचीन व अर्वाचीन विद्वान व रसिक लोकांनीं या ग्रंथाची सर्वतोमुखीं प्रशंसा केली आहे इतकेंच नव्हे, तर त्यांच्याचप्रमाणें, किंबहुना कांकणभर अधिकच, प्रशंसा पाश्चात्य संस्कृतभाषाकोविद् विद्वानांनींही केली आहे. यामुळें आजकाल इकडल्याप्रमाणेंच युरोप व अमेरिका खंडांतील लोकांमध्येंही या अप्रतिम ग्रंथाचें नांव सर्वमान्य होऊन बसलें आहे.

या देशांत मुसलमानी अंमल झाल्यावर त्यांच्यांतील दोन चार बादशहांनीं त्यांच्या नैसर्गिक उदात्त आणि सुसंग्राहक स्वभावास अनुसरून इकडील प्राचीन संस्कृत ग्रंथांचें परिशीलन करितां यावें ह्मणून त्यांचीं फारसी भाषेंत भाषांतरें तयार करविलीं. मुसलमान लोकांत नाटक ग्रंथांची, व नाटकप्रयोग करण्याची किंवा ते पाहण्याची, आवडच नाहीं; किंबहुना ते लोक नाट्यकला अगदीं गौण व त्याज्य असेंच मानतात. साऱ्या फारसी भाषेंत खरा नाटक ग्रंथ असा मुळींच नाहीं ह्मटलें तरी चालेल. अशा स्थितींत या अप्रतिम नाटकाचें फारसींत भाषांतर झालेलें नाहीं याचें नवल नाहीं. बाकी इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, इटालियन व रशियन, वगैरे भाषांत याचीं उत्तमोतम भाषांतरें झालेलीं असून, तीं मोठ्या आवडीनें वाचलींही जातात, असें दिसतें.

परकी लोकांनीं या ग्रंथाचें इतकें गौरव केलेलें आहे, त्या अर्थीं या देशांत बहुतेक प्रचलित भाषांमध्यें शाकुंतल नाटकाचीं भाषांतरें झालेलीं आहेत हें निराळें सांगणें नकोच .

यांतील कथा मूळचीच रमणीय व ती कालिदासासारख्या प्रासादिक व चतुर कवीनें वर्णन केलेली असल्यानें फारच मनोहर झालेली आहे. या नाटकाचीं नुसत्या मराठींतच किती तरी भाषांतरें आहेत. त्यांतील गुणदोषांविषयीं बरेंच सविस्तर वर्णन पुष्कळशा विद्वान व गुणी मंडळीनें जागजागीं केलेलें आहे, त्या अर्थीं मजसारख्या अल्पज्ञानें त्याबद्दल पुन: नवीन चर्चा करण्याची विशेषशी आवश्यकता आहे किंवा मी केलेल्या चर्चेंत कांहीं विशेष स्वारस्य येणार आहे, असा अर्थ नाहीं. तरी नाटकग्रंथपरीक्षणाचें स्वनियुक्त काम पुरें होण्याला याही नाटकाचें परीक्षण होणें अवश्य वाटल्यावरून, एका हिशेबीं, बऱ्याच साशंकपणानें हा प्रयत्न आरंभिला आहे. तो वाचकांस कितपत पसंत पडेल हें सांगतां येत नाहीं. तरी त्यांत थोडे-बहुत गुण असतील तेवढ्यांचें रसिक वाचक ग्रहण करतील अशी उमेद आहे.

कालिदासाच्या जीवनवृत्तांताविषयीं व त्याच्या कालनिर्णयाविषयीं स्वतंत्र लेख लिहिले गेलेले आहेत. सबब या 'सार व विचारां'त त्याबद्दल फारसें विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं.

या जगन्मान्य कवीचीं उपलब्ध नाटकें तीन—अभिज्ञानशाकुंतल, विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र; आणि काव्यग्रंथही तीनच आहेत—रघुवंश, कुमारसंभव, व मेघदूत. याशिवाय ऋतुसंहार व शृंगारतिलक हीं दोन लहानशीं काव्यें कालिदासानेंच केलेलीं आहेत असें ह्मणतात. पण याच्याबद्दल बराच वाद आहे.

तीनही नाटकांत, 'मालविकाग्निमित्र' हें नाटक या कवीनें प्रथम रचिलें असावें असें त्याच्यांतील कथानक, विचारसरणि व वर्णनप्रकार, इत्यादिकांवरून दिसतें. त्याच्यामागून विक्रमोर्वशीय, व सर्वांत अखेरीस अभिज्ञान शाकुंतल लिहिलें असावें. हें शेवटचें नाटक लिहिलें त्यावेळीं कालिदासाला जगाचा सर्व तऱ्हेचा अनुभव पूर्णपणें आलेला होता, व त्याचें मन व विचार चांगले प्रौढ व परिपक्व दशेला आलेले होते. शाकुंतल नाटकाला इतकें मोहक रूप आलेलें आहे तें यामुळेंच, असें प्रत्येक सहृदय वाचकाच्या लक्षांत येईल.

---

## अंक पहिला.

इतर नाटकग्रंथांहून शाकुंतल नाटकामध्यें असलेलें वैलक्षण्य त्याच्या नांदी किंवा मंगलाचरणावरून सुद्धां व्यक्त होतें. बाकीच्या नाटकांत उपास्य दैवतें, शिव, विष्णु, गणेश वगैरे संबंधें प्रेम व आदर यांनीं युक्त व प्रसंगविशेषी यांच्या ऐवजीं त्यांच्या शृंगारादिक चेष्टा यांचें वर्णन असलेलीं मंगलाचरणें आढळतात. पण या नाटकाच्या मंगलाचरणांत, परमेश्वराच्या विविध आद्य स्वरूपाचें फारच प्रौढपणाचें वर्णन केलें आहे. तें येणेंप्रमाणें:—

'परमेश्वराच्या प्रत्यक्ष भासमान होणाऱ्या व दृश्य अशा आठ सृष्टि, शक्ति किंवा रूपें:—जल; हव्य वस्तु पोंचविणारा—अग्नि; हवन करणारा; अनंत कालाचे दोन भाग पाडणारे—चंद्र व सूर्य; श्रुतिविषय शब्दगुणयुक्त व विश्व व्यापून राहिलेलें आकाश; सर्वबीजप्रकृति ह्मणून प्रसिद्ध असलेली पृथ्वी; व सर्वांचे प्राणरूपी वायु. अशा या अष्टमहाविभूतींनीं युक्त असा परमेश्वर आपलें रक्षण करो.'

सर्व चराचर सृष्टि परमेश्वराचीं निरनिराळीं रूपेंच आहेत, किंवा परमेश्वर या प्रत्यक्ष दिसणाऱ्या अष्ट महा प्रकृतींनी व्यक्त झालेला आहे. तो सर्वांचें रक्षण करो. या सुरेख वर्णनानें परमेश्वराचा सर्वव्यापीपणा व प्रौढी यांचा जसा मनावर ठसा उमटतो, तसा व्यक्तिवाचक मूर्त्त परमेश्वराच्या वर्णनानें उमटणें शक्य नाहीं.

कांहीं टीकाकारांनीं या नांदींतील वर्णनाचा कथेंतील गोष्टीशीं—शकुंतलादिक प्रमुख पात्रांसंबंधाच्या वर्णनाशीं—मेळ असल्याचें दाखविलें आहे. तो कसा तरी ओढून ताणून जोडलेला दिसतो. तरी त्याच्यावरून त्या टीकाकारांचें कल्पनाचातुर्य उत्तम व्यक्त होतें.

नांदी झाल्यावर सूत्रधार रंगभूमीवर येऊन ह्मणाला:—'आर्ये प्रिये, नेपथ्यरचना आटपली असली-खेळाची तयारी झाली असली-तर इकडे ये बरें.' हें भाषण नटीला उद्देशून आहे. पुष्कळ ठिकाणीं ती सूत्रधाराची पत्नी असल्याचें वर्णन आहे. येथें त्यानें तिला 'आर्ये' असें ह्मटलें आहे, तें बहुधा तिच्या नटीवेशाला अनुसरून असावें. नटीनें रंगभूमीवर येऊन ह्मटलें—'आर्यपुत्रा, ही मी आलें.' नटीनें सूत्रधाराला आपल्या नवऱ्याप्रमाणें उत्तर दिलेलें आहे, सूत्रधार या नात्यानें

नव्हे. सर्व स्त्रियांनीं तरुणपणीं पतीला आर्य-पुत्र ह्मणावें, असा भरतशास्त्राचा नियम आहे. आणि रामायणांतही असे प्रयोग आलेले आहेत. [ 'आर्यपुत्राभिरामोसौ मृगो हरति मे मनः' अरण्यकांड सर्ग ४३, श्लोक १०. 'सुप्तेव पुनरुत्थाय आर्यपुत्रेति वादिनी' किष्किंधाकांड, सर्ग १९ श्लोक २७.]

सूत्रधार–'आर्ये, पंडित व चतुर गुणिजनांनीं गजबजलेल्या या सभेचें कालिदासकृत 'अभिज्ञान-शाकुंतल' नांवाच्या नव्या नाटकाचा प्रयोग करून आराधन करावयाचें आहे, तर पात्रांची तयारी कर.'

सूत्रधारानें प्रेक्षकांची अशी प्रशंसा करून ते राजी रहातील अशी व्यवस्था केली आहे. कवीनें येथें आपल्या नुसत्या नांवाचा मात्र उल्लेख केला आहे व तोंही प्रेक्षकांना सहज पूर्व परि-चित अशा व्यक्तीचा नामनिर्देश करून द्यावा, त्याप्रमाणें. यावरून कालिदासानें यापूर्वी कांहीं ग्रंथ रचिले होते–मग ते काव्यें असोत किंवा नाटकें असोत–ते लोकांना मान्य झाले असल्यानें कालिदास कोण काय याविषयीं कथन करण्याचें प्रयोजन राहिलेलें नव्हतें.

मालविकाग्निमित्र नाटकांत पर्यायानें कालि-दासानें स्वतःविषयीं नवीन व आधुनिक अशा अर्थाचें वर्णन केलें असून येथें तशांतला प्रकार मुळींच नाहीं, यावरून, तसेंच रघुवंशाच्या प्रारंभींही त्यानें स्वतःविषयीं काढलेल्या उद्गा-रावरून, हे दोन्ही ग्रंथ शाकुंतलाच्या पूर्वींच त्यानें रचिले असावेत.

त्याला नटीनें प्रोत्साहनपर उत्तर दिलें:— 'प्रयोगाची तयारी उत्तम केली असल्यामुळें आपल्याला कांहींच कसर पडणार नाहीं.'

सूत्रधार—'हें खरें, पण मी तुला सांगतों, विद्वान लोकांच्या संतोष होईपर्यंत आपण प्रयो-गाची तयारी चांगली केली आहे असें मला वाटत नाहीं. कारण चांगल्या शिकलेल्या लोकांचें देखील मन आपल्या ठिकाणी साशंक असतें.' शा-हण्या लोकांच्या अंगीं स्वाभाविकपणेंच असा विनय असतो अशा ध्वन्यर्थपूर्वक लिहिण्यानें कवीनें आपण चांगले शिकलेले आहों असेंही दाखविलें आहे.

ही गीति चांगली ह्मणीसारखी साधलेली असून तिच्यांत पदरचना व अर्थप्राचुर्य हे दोन्ही गुण सुरेख आहेत.

नटी–'होय आर्या, असें खरें. पुढें काय करा-वयाचें त्याविषयीं आज्ञा व्हावी.'

सूत्रधार—'दुसरें काय, या सभाजनांच्या कर्णांला आनंद होईल असें कांहीं तरी नुकत्याच लागलेल्या व उपभोग घेण्याला उत्तम अशा ग्रीष्म ऋतूला अनुरूप गायन कर. हे पहा या वेळीं स्नान करण्यायोग्य व आनंद आणि प्रसन्नता वाढविणारे सुरेख जलाशय जागजागीं भरले आहेत व पुष्पपरागसुगंधित शीतल वनवायु वाहताहेत. स्वस्थ गार छायेंत पडून सहज झोंप येते. असे हे सायंकाळीं रमणीय वाटणारे दिवस आहेत.'

हा उष्ण काल आहे, याच्यांत जलाशयांत मोकळेपणीं स्नान करणें प्रशस्त वाटतें व मनाल प्रसन्न करितें. अनेक तऱ्हेच्या विकसित सुगंध पुष्पांच्या परिमलानें सुगंधित वनवायु वहात असतो. दिवसभर अतिशय उष्णता असते, ती सायंकाळच्या सुमारास कमी होते. यामुळें दि-वसा पडून झोंप काढावीसें वाटतें व संध्याकाळीं मात्र कांहीं बहार वाटते.

हें उष्णकाळाचें वर्णन विशेषतः हिंदुस्था-नांतल्या उत्तरभागाला लागू आहे. त्यांतही उष्ण काळांत मोठमोठे भरलेले जलाशय त्याच भागांत–मोठमोठ्या नद्यांना, हिमालयांतील बर्फ वितळल्यामुळें पूर येतो, त्या योगानें–सहज प्राप्त होतात. वनप्रदेशांतील निरनिराळ्या वृक्ष-

विशेषांना फुलांचा बहारही बहुतेक याच दिवसांत येतो व त्या पुष्पांचा परिमळ मंद मंद वाहणाऱ्या वायूबरोबर येत असतो, तो मोठा सुखकर वाटतो. दिवसा फार गरमी झाल्यामुळें कांहीं काम करवत नाहीं. स्वस्थ पडून रहावेंसें वाटतें. संध्याकाळीं थोडा थंडावा आला म्हणजे बरें वाटतें. हा सर्व प्रकार त्या भागांत अद्यापि असाच अनुभवास येतो.

हें वर्णन साधें, सरळ व थोडक्यांत असल्यानें चांगलें वाटतें. शब्दरचनाही परिपाठांतील आहे.

'होय असेंच आहे' असें ह्मणून, नटीनें पुढील अर्थाचें गायन केलें.

' केसर—बकुल—पुष्पांचे सुकुमार अग्रभाग भ्रमरांनीं थोडे थोडे चुंबित केलेले आहेत, व प्रमदाजन सहजपणें पण जपून सुकुमार अशीं तीं केसरपुष्पें शिरावर, आणि शिरीष पुष्पांचे गुच्छ कानांत अवतंसासारखे घालताहेत.'

( यांत अर्थापेक्षां गायनावर विशेष भर आहे. गायनामध्यें बहुधा असा प्रकार नेहमीं आढळून येतो. अर्थ व गायनसंबंधी सौष्टव दोन्ही पूर्णपणें एकत्र असलेलीं पद्यें आढळत नाहींत असें नाहीं, पण थोडीं. )

गायन ऐकून सूत्रधार ह्मणाला, 'वा: किती उत्तम तरी गायन! त्यांतील अप्रतिम रागदारीमुळें चित्तवृत्ति तटस्थ झाल्यानें हा प्रेक्षकसमाज चित्रासारखा स्तब्ध झाला आहे पहा. खरेंच—पण आर्ये, यांचें आराधन कसें करावयाचें आहे बरें!'

सूत्रधारानें नटीच्या गाण्याची तारीफ करून त्याचा प्रेक्षकांच्या मनोवृत्तीवर कसा परिणाम झाला याचेंही वर्णन केलें, व शेवटीं सहजपणें त्या परिणामाचें प्रत्यक्ष उदाहरण स्वत:चेंच दाखविलें आहे. ही ऱ्हस्या मार्मिक कवीनाच साधणारी खुबी आहे. त्याच्या भाषणांतील शेवटच्या साहजिक प्रभावें नटीच्या गायनाच्या अप्रतिमपणाची जशी साक्ष पटते, तशी कितीही लांबलचक अलंकारिक वर्णन केलें असतें तरी ती न पटती.

त्यानें केलेल्या प्रशंसेकडे—त्यांत स्वत:चाच गौरव असल्यानें—लक्ष दिलेंसें न दाखवितां पण कांहींसें आश्चर्यानें नटीनें ह्मटलें, 'अभिज्ञान-शाकुंतल नांवाच्या नव्या नाटकाचा प्रयोग करावयाचा ह्मणून प्रथमच आज्ञा केली ना!'

सूत्रधार—'आर्ये, खरेंच चांगलें स्मरण दिलेंस. कारण या भरधांव पळणाऱ्या चपल हरिणाच्या नादानें हा दुष्यंत राजा आकर्षित झाला आहे, तसा तुझ्या मनोहर गायनाच्या रागदारीनें मी अगदीं भुलून विसरून गेलों होतों.' असें ह्मणून दोघेही निघून गेले.

साधारण मनुष्याचें मन गीतरागानें आकर्षित होतें तसेंच राजे लोकांचें मन मृगयेच्या नादानें अतिशय आकर्षित होतें, असें यांत सहजपणें सुचविलें आहे. शिवाय मूळ कथेशीं व नाटकप्रयोगाशीं हा संबंध कसा उत्तम तऱ्हेनें, थोडक्यांत व सहज आणून जोडिला आहे.

ही प्रस्तावनेची तऱ्हा बहुतेक अप्रतिम व निर्दोष आहे, हें निराळें सांगणें नकोच.

दुष्यंत राजा रथांत बसून हातीं सज्ज धनुष्य बाण घेऊन हरिणामागें भरधांव लागला होता. त्याला त्याच्या सारथ्यानें ह्मटलें—

( हा राजाचा प्रवेश साहजिक असून त्यांचीं पुढील भाषणें ते ज्या कामांत आसक्त होते, त्या संबंधाचींच आहेत. राजाचा रथ अतिशय वेगानें हरणामागें दवडत होता व तो आपल्याच मागें दवडतो आहे असें पाहून हरिणही चेंडूसारखा उड्या टाकीत निसटून जाऊं पहात होता. )

सूत—'आपण धनुष्यावर बाण चढवून सज्ज

झालेले आणि हा दवडत असलेला काळवीट या दोघांकडे पाहून मला जणों साक्षात् मृगानुसारी पिनाकपाणीचेंच दर्शन घडतें आहे असें वाटतें.'

त्याच्या या भाषणाकडे विशेष लक्ष न देतां राजानें—त्याचें चित्त सर्वथा मृगाकडे लागलेलें असल्यानें—त्याच्याचकडे दृष्टि देत म्हटलें—'सूता, या सारंगानें आपल्याला फार दूर खेंचून आणिलें. अजून तरी तो पहा कसा वरचेवर मान मुरडून मार्गे रथाकडे दृष्टि टाकितो आहे. बाणाच्या माराच्या भीतीनें शरीराचा मागील भाग आकुंचित करून जसा काय पुढच्या भागांत घुसवीत आहे. त्याचें तोंड परिश्रमामुळें पसरलें—वासलें—आहे. व त्यांतून जागजागीं अर्धवट चावलेले दर्भ जणों मार्ग दाखविण्यासाठीं पडत आहेत. असा तो सारखा उड्या टाकीत जणों बहुतेक उडतच व क्वचितच जमिनीला पाय लावीत चाललेला दिसतो.'

भरधांव दौडत जाणाऱ्या भ्यालेल्या मृगाच्या स्थितीचें हें अप्रतिम व वास्तविक वर्णन आहे. यावरून कवीच्या मार्मिक दृष्टीची साक्ष पटते.

राजा—'अरे, पण हा पहा कसा हातीं येतां येतां दिसेनासा झाला!'

सूत—'महाराज, जमीन वेडीवांकडी असल्यानें मी लगाम आंखडून रथाचा वेग किंचित मंद केला होता म्हणून मृग दूर गेला. आतां साफ सपाट जमीन आहे, तो आपल्याला मिळण्याला कठिण जाणार नाहीं.'

राजा—'तर लगामाला ढील दे.' सूतानें तसें केलें, तेव्हां घोडे जसे वायुवेगानें उसळले, व रथ फारच वेगानें चालूं लागला. हें पाहून त्याचें वर्णन करीत त्यानें म्हटलें;—

'महाराज, लगामाला ढील देतांच घोडे जणों मृगाचा वेग सहन न होत्साते किती तरी वेगानें धांवताहेत! त्यांचा मागील भाग खूप ताणला आहे. शिरांवरील चवऱ्या निश्चल, कान टवकारलेले व ताठ उभे असून, खुरांनीं उडालेल्या धुरळ्याला देखील त्यांना मार्गे टाकतां येत नाहीं!'

(घोड्याच्या चपल वेगाचें हें सरस व यथार्थ वर्णन आहे. पण त्यांत त्यांच्याच खुरांनीं उडालेल्या धुरळ्याच्यानें देखील त्यांना मार्गे टाकतां येत नाहीं, असें वर्णन केलें आहे त्याचें स्वारस्य लक्षांत येत नाहीं. धांवणाऱ्या पायानें उडालेला धुरळा त्याच्या पुढें कसा जाणार? धावण्याच्या वेगाहून फारच अधिक वेगानें त्याच दिशेनें वायु वहात असला तर नकळे! बाकी नेहमींचा अनुभव धुरळा मागें राहतो व आकाशांत उडतो असा आहे.

(गमनकाळीं पाठीमागला वारा असणें शुभशकुन आहे असें ज्योतिषशास्त्रांत सांगितलें असल्यानें तदनुरूप हें वर्णन आहे, असेंही घेतां येईल.)

राजा—'खरेंच, सूर्याच्या सुप्रसिद्ध अश्वांना देखील यांनीं जणों मार्गे टाकलें. रथाच्या वेगामुळें प्रथम लहान दिसत असलेली वस्तु तेव्हांच मोठी थोरली दिसूं लागते. तुटक्या वस्तु जोडलेल्या व सारख्या दिसतात. मुळच्याच वांकड्या वस्तु डोळ्यांना सारख्या सरळ दिसतात. आणि मला कोणचीही वस्तु प्रथम दूर पुढें अंतरावर आहे अशी वाटते, तोंच ती जवळ आली आणि पाहतां पाहतां पार मार्गे पडून क्षणांत दिसेनाशी झाली असें होतें आहे.

(फारच वेगानें चालणाऱ्या वाहनावर असलेल्या मनुष्याला आसपासच्या वस्तु कशा दिसतात व त्याच्या मनावर कसकसा परिणाम होतो याचें हें सुरेख वर्णन आहे. आज काल

आगगाडींत बसून जातांना या सर्व गोष्टींचा बहुतेक प्रत्येकाला अनुभव येतोच. )

'सूता, हा पहा ठार करितों!' असें ह्मणून राजानें शरसंधान केलें.

( येथवर वाटेंत रथ, घोडे व सम विषम भूमि यांचें यथार्थ व थोडक्यांत संवादरूपानें वर्णन करून कवी मूळ कथेकडे वळला आहे. या साऱ्या वर्णनांत किंवा भाषणांत वावगा किंवा ठाकाऊ असा एक देखील शब्द नाहीं. )

इतक्यांत दुरून–'राजा, राजा, हा आश्रम–मृग–शिकारीचा नव्हे,–शिकार नव्हे.' असा शब्द झाला.

( हें भाषण आश्रमांतील तपस्व्यांचें आहे. आश्रमातील पाळीव मृग धांवत पळत परत आलेला व त्याच्या मागें राजा रथांत बसून बाणाचा नेम धरून वायुवेगानें लागलेला पाहून, राजा त्या हरणाची शिकार साधीत असल्याचें तात्काल त्या तपस्व्यांच्या लक्षांत आलें, व त्यांनीं एकदम पुढें होऊन दुरूनच,–'हा आश्रमांतील पाळीव मृग आहे, शिकारीचा नव्हे' असें ह्मटलें. )

तसें सूतानें ह्मटलें,–'महाराज, बाणाच्या तडाख्यांत आलेल्या या काळविटाच्या आड हे पहा तपस्वी आले आहेत!'

राजानें एकदम गडबडीनें ह्मटलें,–'घोडे आटप–घोडे आटप!' ( ही राजाची उडालेली गडबड तपस्व्यांचा अनादर किंवा आपल्या रथापासूनही त्यांना त्रास न व्हावा ह्मणूनच होती. )

सूतानें रथ थांबविला. तोंवर वैखानस दोघां तपस्व्यांसह पुढें येऊन हात उभारून ह्मणाला,–'राजा, हा आश्रममृग तूं मारण्या योग्य नव्हे,–मारूं नको! तुझा अमोघ उत्तम संधान केलेला बाण आटोप! आपलें शस्त्र आर्त, दीन व अनाथ यांच्या संरक्षणासाठीं–निरपराध्याला मारण्याला नव्हे.'

( वैखानसानें हात उभारून हें भाषण केलेलें, राजाचें आपल्याकडे विशेष लक्ष लागावें ह्मणून आणि त्याच्या मनावर विशेष परिणाम व्हावा ह्मणून होतें. हल्लीं देखील कोणीही सरकारी किंवा खानगी जुलमाच्या गोष्टीबद्दल गिल्ला करितात तेव्हां असेच हात वर करितात. त्यानें राजाच्या शरसंधानाची तारीफ केली आहे, पण तें दीनजनसंरक्षणासाठींच होणें उचित–गरीब निरपराध्यांचा प्राण घेण्याकरितां नव्हे, असें सांगून त्याला थोड्याशा विनयानेंच पण टोला दिला आहे. या श्लोकांतील दुसरें अर्ध ह्मणीच्या तऱ्हेवर उत्तम साधलें आहे व भाषणही थोडक्यांत पण उत्तम आहे. )

राजा–'हा पहा बाण आटोपला.' यावर त्याची विशेष स्तुति करीत वैखानसानें ह्मटलें, 'आपण पुरुवंशप्रदीप. त्यांना हें योग्यच. आपल्याला असाच गुणी चक्रवर्ती पुत्र होवो!'

दुसऱ्या तापसांनींही त्याला, 'हो, सर्वथा चक्रवर्ती पुत्र प्राप्त होवो,' असा आशीर्वाद दिला. * त्या सर्वांना राजानें प्रणाम करीत ह्मटलें, 'आपला हा आशीर्वाद ग्रहण केला.'

( तपस्वी जनांच्या भाषणाला राजे लोक मोठा मान देत व त्यांच्या आशीर्वादानें आपलें कार्य हटकून होईल असें मानीत असत. त्यांतह हा आशीर्वाद–अवचित सहज मिळालेला–असल्यानें राजानें त्याचें अधिक नम्रपणानें ग्रहण केलें आहे.

* या आशीर्वादाचा उपयोग पुढें पांचव्या अंकांत पुरोहितांच्या भाषणांत आणि सातव्या अंकांत राजाची व मुलाची भेट झाल्यावेळीं मुलाची ओळख पटण्याच्या कामीं कवीनें केला आहे.

वैखानस—' राजा, आह्मी समिधा आणण्याला चाललों आहों. ( यापुढें हरिणासंबंधाचा वृत्तांत कवीनें बुद्ध्या गाळलेला दिसतो. भवभूतीनें या जागीं बहुधा लांबलचक कहाणी—हरिण आश्रमांत कसा दौडत आला, त्याला पाहून तपस्व्यांना काय वाटलें, त्यांची कशी गडबड उडाली, ते कसे धांवले व त्यांनीं राजाला कसें पाहिलें, वगैरेबद्दल व्यर्थ पाल्हाळिक क्लिष्टशब्दरचनाप्रचुर वर्णन—दिली असती.) हा जवळच मालिनी तीरावर कुलपति कण्वाचा आश्रम आहे. इतर कामांत व्यत्यय होत नसल्यास तेथें जाऊन अतिथिसत्कार ग्रहण करावा. तसेंच तपोधनांच्या निर्विघ्न व रम्य नित्यक्रिया पाहून आपला मौर्वीचे घट्टे पडलेला भुज कोठवर—कितपत—सुरेख रक्षण करितो तेंही दिसून येईल.' यांतही वैखानसानें खुबीदारीनें राजाच्या उत्तम बंदोबस्ताची तारीफ केली आहे. तिकडे लक्ष न दिल्यासारखें करून राजानें ह्मटलें, 'कुलपति कण्व तेथें असतीलच!'

वै०—नुकतेच कन्या शकुंतलेला अतिथींचा सत्कार करण्याकरितां घरीं ठेवून तिला असलेल्या कांहीं अनिष्टाचा प्रतिकार करण्याकरितां ते सोमतीर्थाला गेले आहेत.

राजा—बरें तिलाच भेटूं, माझी महर्षिविषयक भक्ति व आदर तीच त्यांना कळवील.

'बरें तर आह्मी जातों,' असें ह्मणून तापस निघून गेले.

येथें कुलपति* शब्द आला आहे. त्याचा सामान्य अर्थ मालिनीतीरावरील आश्रम व त्याचे आसपासचे इतर तपस्व्यांचे आश्रम व पर्णकुट्या मिळून जमलेल्या कुलांचा—वसाहतींचा—पति किंवा प्रमुख असा घ्यावा. अथवा, कण्वकुल—हल्लीं काण्णव, नांवानें प्रसिद्ध असलेल्या ब्राह्मणाचें कुल—यांचा पति किंवा प्रमुख व मूळ पुरुष असाही घेतां येईल. पुढें ज्यांचीं कुळें विस्तृत व विख्यात झालीं त्यांना कुलपति ह्मणण्याचा परिपाठ आहे.

प्रतिकूल दैवाचा शम करविण्याकरितां, असें लिहिलें आहे. यावरून बहुधा अनिष्ट ग्रहच घेतले पाहिजेत. व जपादिकांच्याद्वारें त्यांची शांति करण्याकरितां कण्व सोमतीर्थाला गेले होते, असें वर्णन केलें आहे. मूळ भारतांतील कथेंत—कण्व आश्रमांत नसतांना राजा शिकारीला गेलेला थकून त्या आश्रमांत आला. तेथें कण्वकन्या शकुंतला इनें त्याचें आतिथ्य केलें, राजा तिला पाहून मोहित झाला, आपल्याला पुत्र होईल तो गादीचा वारस व्हावा असें राजाकडून वचन घेऊन तिनें राजाचें ह्मणणें कबूल केलें, असें वर्णन आहे. कवीनें राजाला कण्वाश्रमाजवळ जाण्याचें योग्य कारण सहजगत्या घडून आलें व आश्रमांत जाऊन शकुंतलेच्या हातून अतिथिसत्कार घेण्याचें कारण तरी वैखानसाचें एक तऱ्हेचें निमंत्रणच होतें, असें दाखविलें आहे. या वेळीं शकुंतलेला प्रतिकूल दैवाचें लक्षण ह्मटलें ह्मणजे तिची अशी राजाशीं एकांतांत गांठ पडणें—पण पुढें त्याला त्याची विस्मृति होणें—हेंच होय. व पुढें कांहीं कालानें त्याचा प्रतिकार होऊन कुशल परिणाम घडला तो कण्वानें केलेल्या शांतीचेंच फल मानतां येईल. कण्वकन्येच्या राशीला दुष्यंतरूपी जामाता—अनाहूत दशम ग्रह आला होता ह्मणावयाचें. )

नंतर राजानें सांगितल्याप्रमाणें सुतानें पुनः रथ चालविला. जातां जातां चोहोंकडे पहात

*दहा हजार मुनींना अन्नदानादिकेंकरून पोषण करून त्यांच्याकडून अध्ययन करवितो तो कुलपति समजला व ह्मटला जातो.

राजानें ह्मटलें, 'सूता, तपोवनांतील आश्रमाजवळचा हा प्रदेश आहे, असें न सांगतां देखील कळतें.'

सूत—तें कसें काय ?

राजा—अरे पहात नाहींस का ?

'हें पहा शुकांची बरटीं असलेल्या तरुकोटराखालीं पडलेलीं नीवारांचीं कणसें-हिंगणमिठे फोडलेले हे चिकट व ओशट झालेले दगड-माणसांच्या सहवासानें विश्वास पटलेले ह्मणून रथाचा व आपलाही शब्द स्वस्थपणें ऐकणारे हे मृग—आणि पाट्यांच्या बाजूवर वल्कलांच्या दशांपासून टपकलेल्या पाण्याच्या भेंगांच्या या रेघा.'

( हें वर्णन वस्तुस्थितीला अनुरूप व योग्य आणि साधें आहे. माणसाळलेले मृग तितके चमकत नाहींत, हा नेहमींचा अनुभव आहे. तपस्वी लोक हिंगणमिठे फोडून त्याच्या बियांचें तेल डोकीला लावीत असत.)

सूत—होय, महाराज ह्मणतात तें सर्व खरें.

थोडें दूर गेल्यावर राजानें ह्मटलें—'तपोवनांत राहणाऱ्यांना त्रास किंवा अडचण न होय असा एकीकडे रथ उभा कर, मी खालीं उतरतों.' सूतानें तसें केल्यावर राजा खालीं उतरून ह्मणाला,—'तपोवनांत विनीत व नम्र वेशानेंच गेलें पाहिजे, हे घे.' नंतर त्यानें अंगांवरील अलंकार व आभरणें उतरून त्याच्या हातीं दिलीं आणि ह्मटलें—'सूता, मी आश्रमवासी जनांचें दर्शन घेऊन परत येईतों घोड्यांना धुवून आण, पाणी दाखवून आण, व पाठीवरून हात फिरीव.'

( हल्लीं मेहनत करून आलेल्या घोड्यांच्या तोंडाला व डोक्याला थंड पाणी फडक्यानें लावण्याचा मुंबईस परिपाठ आढळतो. त्याशिवाय पूर्वी पाठीवरही ओले फडके फिरविण्याचा पाठ होता असें दिसतें.

आश्रमांत विनीत वेशानेंच गेलें पाहिजे असें वदविण्यांत राजाच्या अंगचा साहजिक नम्रपणा व नीति व्यक्त केली आहे. व राजे लोक त्यावेळीं तपस्व्यांचा मान कसा ठेवीत असत तेंही दाखविलें आहे. )

सूत रथ घेऊन गेल्यावर राजा आश्रमाकडे चालला. आश्रमाचें दार पाहून तो आंत शिरला. इतक्यांत त्याला शुभशकुन—बाहुस्फुरण—झाला. तेव्हां तो आपल्याशीं ह्मणाला,—'हें आश्रमस्थान कसें शांत, येथें हा माझा बाहुस्फुरण पावतो. याचें फल कसें प्राप्त होणार कोण जाणें. भवितव्यतेचीं द्वारें सर्वच मोकळीं आहेत.'

( हें भाषण पुढील शकुंतलादर्शन व लाभ यांचें सूचक तर खरेंच, पण कसें अगदीं साहजिक व थोडक्यांत आणिलें आहे. )

हे त्याचे विचार चालले आहेत तोंच 'सख्यांनों, इकडे या—इकडे या—' असे शब्द त्याच्या कानीं पडले. ते ऐकून त्यानें विचार केला, 'या उजव्या बाजूस वृक्षवाटिकेंत कोणसें बोलतें आहे. चला तिकडेच जाऊं.' चार पावलें जाऊन तो पुनः ह्मणाला—'बाः या तपस्विकन्या आपल्याला झेंपतील अशा कळशा घेऊन लहान लहान झाडांना पाणी घालीत येताहेत.' त्यांना न्याहाळून पाहून तो आनंदानें ह्मणाला, 'वाहवा! काय उत्तम देखावा हा! रूप किती तरी सुरेख! या आश्रमांत राहाणाऱ्या मुलींचें आपल्या अंतःपुरांतही दुर्लभ असें सौंदर्य! वनलतांनीं उद्यानलता मागें टाकल्या!'

( या आश्रमांत व वनांत राहणाऱ्या, तरी यांच्यासारखें स्वरूप लावण्य राजे लोकांच्याही अंतःपुरांत दुर्लभ, तेव्हां वनांतील लतांनीं उद्यानांत काळजीपुरस्सर व मेहनतीनें वाढविलेल्या लतांनाही मागें टाकिलें ह्मणावयाचें!

राजे लोकांच्या अंतःपुरांतील स्त्रियांची गोष्ट कशीही असो, तरी खेड्यापाड्यांत उघड्या ह-

वेंत मोकळेपणीं वाढलेल्या सामान्य स्थितींतल्या लोकांच्या मुली जास्त सुरेख व सतेज असतात, हा सार्वत्रिक व सार्वकालिक अनुभव आहे. त्याला अनुसरूनच हें भाषण आहे. या सुंदर तपस्वी कन्यांना या मोकळ्या स्थितींत पाहून राजाला आपल्या अंतःपुरांतील स्त्रिया ह्यांच्यापुढें माल नाहींत असें वाटलें. )

'असो, आपण या सावलींत आड उभें राहून यांची वाट पाहूं.'

नंतर, 'सख्यांनो, इकडे या गे, इकडे या.' असें बोलत अनसूया व प्रियंवदा नांवाच्या दोघी सख्यांसह शकुंतला आली. तिला अनसूया ह्मणाली, 'गडे शकुंतले, काश्यप बाबांना हे लहान लहान रोपे तुझ्याहूनही अधिक प्रियकर वाटतात—आणि ह्मणूनच नवमालिकाकुसुमाहूनही कोमल अशा तुला हीं यांचीं आळीं भरण्याला त्यांनीं लाविलें आहे!'

शकुंतला—'अगे, बाबांनीं सांगितलें ह्मणूनच मी हें काम करितें असें नव्हे. हें मला सख्या भावंडांसारखे प्रिय वाटतात.' असें ह्मणून ती झाडांना पाणी घालूं लागली.

( हीं भाषणें सहज थट्टेचीं व कांहीं अंशीं खरींही आहेत. अनसूयेनें जणों पाणी घालण्यानें परिश्रांतशा झालेल्या शकुंतलेला कांहींसें टोंचून, असल्या कठिण कामाला बाबांनीं तुला लाविलें यावरून तुजपेक्षां या वृक्षांवर त्यांची प्रीति अधिक आहेसें दिसतें, असें थट्टेनें ह्मटलें. त्यावर शकुंतलेनें—यांत बाबांचें सांगणें तर खरेंच, व यांची आज्ञा मानिलीच पाहिजे तशी मी मानितेंही; पण तीही मनापासून व आस्थेनें. कारण यांच्यावर माझें सख्या भावंडांसारखें प्रेम आहे—असें उत्तर दिलें आहे. यांत तिचा विनय, सौजन्य व बांधव-प्रेम व्यक्त केलें आहे.

या सख्यांच्या सहज भाषणावरून राजाला हवी तितकी माहिती आपोआप मिळून त्यांचा स्वभाव व वर्तन हीं समजून घेण्याला सवड सांपडली. )

हें ऐकून राजानें आपणाशीं ह्मटलें, 'हीच ती कण्वदुहिता कां? या आश्रमांतील कामाला असल्या इला लावणारे ते काश्यप ऋषि विलक्षण खरे! ही त्यांची योजना योग्य नाहीं. असलें स्वभावतःच सुंदर शरीर तपाचरणायोग्य समजून ते तिकडेच त्याची योजना करणार वाटतें! नील कमलाच्या पाकळीच्या कोरेनें समिधा तोडण्यासारखेंच हें!'

( शकुंतलेसारख्या अद्वितीय मनोहर शरीराला असल्या या दांडग्या व सेवकजनांनींच करण्यायोग्य कामाला लावणें ह्मणजे कोमल नीलकमलपत्रानें समिधा तोडण्याचा यत्न करण्यासारखेंच होय! दोहोंतही असें करूं इच्छिणारांची पारख होते.

हें भाषण व वर्णन राजाच्या दृष्टीला व स्थितीला योग्य व सुरेख असेंच आहे. )

'असो, झाडांआडच राहून हिला मोकळेपणीं पाहून घेऊं.'

नंतर शकुंतला एक दोन झाडांना पाणी घातल्यावर ह्मणाली, 'अनसूये, प्रियंवदेनें हें वल्कल फारच घट्ट आवळलें असल्यानें मी कशी जखडलें आहे. तें थोडें सैल तरी कर.'

त्याप्रमाणें अनसूयेनें केलें. तितक्यांत प्रियंवदेनें हंसत हंसत थट्टेनें ह्मटलें, 'याबद्दल तुझ्या पयोधरविस्तारी यौवनाला दोष दे.'

( हीं यांचीं भाषणें सहज विनोदाचीं असून त्यांच्यांत अश्लीलपणा, ग्राम्यपणा किंवा निष्कारण बाष्कळपणा इत्यादिकांचा लेशही नाहीं व त्यांच्यांत उत्तान अर्थापेक्षां किती तरी अधिक ध्वनि आहे. )

हीं भाषणें राजानें ऐकिलीं व त्यांच्यांतला अर्थ त्याच्या लक्षांत आला. त्यानें शकुंतलेकडे न्याहाळून पाहून ह्मटलें, 'इच्या या वयाला व स्थितीला हें वल्कल अधिकच शोभा आणतें आहे. कारण, शेवाळानें वेष्टित असलें तरी कमळ रम्यच दिसतें. चंद्रावरील मलिन मृगांकानें त्याला जास्तच शोभा येते. ही सुकुमार तरुणी या वल्कलांनीं देखील अधिकच मनोहर झालेली आहे. मधुर व मोहक आकृतींना कोणची गोष्ट जास्त शोभादायक होत नाहीं!!' 'जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें.'

इतर वस्तूंना वैगुण्य आणणारे पदार्थ देखील खऱ्या सुंदर व मोहक वस्तूंना अधिक शोभाच आणितात. तसा हा प्रकार आहे. सामान्य स्त्रियांना वल्कलें फारच वाईट दिसतीं; पण शकुंतला इतकी कांहीं सुरेख, मनोहर आणि सुंदर होती कीं, तिच्या अंगावर या वेळीं वल्कलें असूनही ती अधिकच चांगली दिसत होती.

हा श्लोक फारच चांगला आहे व यांतील शेवटचा चरण ह्मणीसारखा आहे. याचें पद्यात्मक भाषांतर कै. अण्णा किर्लोस्कर यांनीं केलेलें अप्रतिम आहे.

शकुंतला—'हा लहानसा बकुल वृक्ष वाऱ्यानें हलणाऱ्या पल्लवांनीं जसा जरुद् बोलावितो आहे. त्याचें समाधान करूं दे.' असें ह्मणून ती त्याच्याजवळ जाऊन उभी राहिली.

प्रियंवदा—'गडे शकुंतले, थोडा वेळ तिथेंच थांब. हा केसर वृक्ष जणों लता सनाथ झाल्यानें अधिकच रमणीय दिसतो!'

तिचा भाव जाणून शकुंतलेनें ह्मटलें,—'तरीच प्रियंवदा.' ( प्रियंवदेच्या भाषणांत शकुंतला एखाद्या सुंदर लतेसारखी रमणीय व योग्य तरुण पुरुषाशीं संगत होण्यांला पात्र झालेली आहे, असा भाव होता. तो शकुंतलेच्या लक्षांत येऊनच तिनें हें भाषण केलें आहे. )

राजा—'प्रियंवदेनें प्रिय, तरी पण खरें व ठीक असेंच भाषण केलें. कारण इचा अधर—किसलय वर्णाचा लाल, बाहू कोमल शाखांसारखे, आणि सर्वांगावर मोहक व लालचविणारीं यौवनरूपी पुष्पें आलेलीं आहेत.'

लतेला मृदु व लाल किसलय, कोमलशा शाखा, आणि सर्वत्र फुलें आलेलीं असतात, तेव्हां ती फारच रमणीय दिसते. तसें इचा अधरोष्ठ, बाहू व सर्वांगावर मुसमुसणारें यौवन असल्यानें प्रियंवदेनें इला लतेची उपमा दिली ती ठीक व यथार्थ आहे.

अनसूया,—'शकुंतले, ही तूं वनज्योत्स्ना नांव दिलेली, आम्रवृक्षाची स्वयंवरवधू—तुझी नवमालिका—विसरलीस!'

आम्रवृक्षावर चढलेल्या नवमालिका—जाईच्या—वेलीला शकुंतलेनें वनज्योत्स्ना नांव दिलेलें होतें. तिला अनुलक्षून हें अनसूयेनें भाषण केलें. त्यावर शकुंतला,—'मग मी स्वतःला सुद्धां विसरेन ह्मणावयाची!'

नंतर ती जवळ जाऊन त्या वेलीला नीटपणें पाहून पुनः ह्मणाली,—'गडे, या लतापादपांचा समागम मोठ्या बहारीच्या वेळीं झाला आहे. नवीनच फुलें आल्यानें वनज्योत्स्ना बहाराला आलेली आणि स्निग्ध, मनोहर, कोमल पल्लव आल्यानें उपभोगायोग्य असा हा सहकार वृक्ष'—

( तारुण्य व प्रेम द्योतक मनोहर अशा चिन्हांनीं युक्त असल्यावेळीं प्रत्येक मिथुनाचा समागम बहारीचा असतो, असा यांतील सामान्य अर्थ आहे. तो या ठिकाणीं कवीनें नायिकेच्या तोंडून फारच खुबीदारीनें व सहजगत्या बदविला आहे. याच्यांतील उत्तान अर्थ विशेष प्रौढ

असल्यानें त्याला ग्राम्यपणाचा संपर्क किंचित् सुद्धां झालेला नाहीं. )

याप्रमाणें बोलून ती कांहीं वेळ सारखी त्या बनज्योत्स्नेकडे पहात उभी राहिली. हें पाहून प्रियंवदेनें थट्टेनें ह्मटलें,–'अनसूये, ही शाकुंतला या बनज्योत्स्नेकडे इतकी विशेष आतुरतेनें कां पहाते आहे कळलें कां?'

अनसूया–'नाहीं गे, सांग पाहूं.'

प्रियंवदा–'ही बनज्योत्स्ना अनुरूप वराशीं संगत झाली तशी मीही होईन कां?' असें इला वाटतें आहे.

शकुंतलेनें तिला लगेच कांहींसें तोऱ्यानें उत्तर दिलें.–'हा तुझा स्वतःचाच मनोरथ!' नंतर तिनें त्या वेलीच्या आळ्यांत पाणी घातलें.

हा त्यांचा आपसांत चाललेला मनोरथसंवाद राजा ऐकतच होता व त्याचें मन शकुंतलेवर अधिकाधिकच बसत चाललें होतें. तो ह्मणाला, 'या कुलपति कण्वाची ही अन्य वर्णाच्या पत्नीच्या पोटची कन्या असावी कां? अथवा संशय नको.

यथायोग्यच अभिलाष करणारें माझें शुद्ध मन इचा अभिलाष करितें. त्या अर्थी ही क्षत्रियांनीं परिग्रह करण्या योग्य खास. सज्जनांना संदेह वाटतो तेव्हां त्यांच्या नैसर्गिक अंतःकरण–प्रवृत्तीच प्रमाणभूत होतात. तरी पण इची खरी माहिती काढूं.'

मी थोर वंशांत जन्मलेला व मनोनिग्रही. माझेंही मन इच्यावर बसलें. तेव्हां ही मजसारख्या क्षत्रियानें वरण्याला पात्र असलीच पाहिजे. नाहीं तर माझें मन तिच्यावर जातेंच ना. थोर व सज्जन लोकांच्या मनांत केव्हांही अन्यथा विचार येत नाहींत. यामुळें त्यांच्या मनांत आलेले विचारच त्यांना प्रमाणभूत होतात.

इतक्यांत शकुंतला कांहींशी दचकून मागें सरून घाबऱ्यां घाबऱ्यां ह्मणाली, "अग बाई! पाणी घालण्याच्या गडबडीनें नवमालिकेवरून उठलेला हा दांडगा भ्रमर पहा माझ्या तोंडाभोवतीं घिरट्या घालतो आहे." आणि ती घाबरून मस्तक हलवीत गडबडीनें फिरूं लागली.

यावरून कवीनें ती पद्मिनी होती असें सुचविलें आहे असें ह्मणतां येईल.

तिची यावेळची स्थिति फारच प्रेक्षणीय होती. ती राजाला अनायासें पाहण्यास सांपडली. तिचें वर्णन करीत राजानें लालचून ह्मटलें–'हे मधुकरा भ्रमरा, तूं मोठा धन्य–कृतकृत्य. आह्मी तत्वान्वेषणाच्या नादीं लागून व्यर्थ फसलों आहों. कारण यावेळीं या सुंदरीची दृष्टि कावरीबावरी झाली आहे व तिच्या अंगांत कांपरें भरलें आहे, अशा स्थितींत तूं तिला वरचेवर स्पर्श करून एकांतांत गुजगोष्टी सांगण्याच्या तऱ्हेवर तिच्या कानाशीं गुंजारव करितो आहेस. ती तुला हात हालवून दूर करिते आहे तरी तूं तिचें रतिसर्वस्व–रूपी अधरपान करितो आहेस; आणि आह्मी हें सर्व पहात नुसते हाका मारीत उभे!'

(येथें राजानें शकुंतलेची स्थिति व भ्रमराचें आगंतुक वर्णन यांचें वर्णन करून वास्तविक या सर्व गोष्टी आपण करावयाच्या त्या आपल्या समक्ष हा धृष्ट भुंगा करितो आहे, याबद्दल असूया दाखविली आहे. भ्रमराचें वर्तन नवसमागमोचित, धृष्ट, कामी पुरुषाशीं समागम करण्याला कांहींशा नाखुष व निदान बाह्यात्कारें तरी त्याला झिडकारीत असणाऱ्या किंचित् म्याड व मोहक मुग्धेसारखें असल्याचें वर्णन केलें आहे. व आपण त्या भ्रमराच्या जागीं असतों तर धन्य होतों, असा त्याचा भाव असल्याचें दाखविलें आहे.)

श्रृंगाररसविषयक वर्णनासंबंधें हा श्लोक फारच सरस व योग्य आहे. याच्यांत ग्राम्यपणा

मुळीं नसून वाच्यार्थापेक्षां पुष्कळच अधिक व्यंग्यार्थ दाखविलेला आहे.

हे राजाचे स्वतःशीं विचार चालले होते, तोंवर नाटकप्रयोगांत शकुंतलेला भ्रमरबाधा झाल्याचा भाव दाखवीत गडबड उडवावी लागते. व तीही संगीत शाकुंतलाच्या प्रयोगाच्या वेळीं बरीच विसंगत दिसते. ही गोष्ट हे प्रयोग प्रत्यक्ष पाहिले असलेल्या प्रेक्षकांच्या लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. स्वगत विचार प्रसंगविशेषीं असे अधिक लांबीचे असल्यानें हा प्रकार होतो. हा थोडासा दोष आहे, तथापि तो कालिदासाच्या नाटकांत फारच क्वचित् आलेला आहे.

शकुंतला—' हा दुष्ट मेला कांहीं ऐकत नाहीं. दुसरीकडे तरी जाल्यें.' तसें करून पुनः मागें पहाते तों तो भ्रमर तिच्या मागोमागच होता. तेव्हां तिनें ह्मटलें,—' काय मेला इकडेही आला. गडे, हा दुष्ट मधुकर मला कसा त्रास देतो आहे पहाना. मला सोडवा तरी.'

यावर दोघींनीं तिची थट्टा करीत सहजपणें तिला ह्मटलें, ' आह्मी सोडविणार कोण? दुष्यंताला हाक मार. तपोवनाचें रक्षण करणारा राजा ह्मणे.'

( दुष्यंताच्या प्रवेशाचें सूचक असें हें भाषण किती सहजपणें, मार्मिक रीतीनें व गमतीनें आणिलें आहे. )

हा प्रसंग आपणाला पुढें सरण्याला उत्तम आहे, असें समजून राजा कांहींसा पुढें होत्साता घाई घाईनें ' भिऊं नका, भिऊं नका ' असें अर्धवट ह्मणणार तोंच, आपण राजा असल्याचें प्रगट होईल हें ठीक नाहीं, असें त्याच्या लक्षांत आलें.

तोंवर शकुंतला आणखी चार पावलें फिरली होती. तिनें पुनः पाहिलें तो भ्रमर मागें लागला आहेच. यावर ती त्रासून ह्मणाली—' काय करावें! हा मेला इकडे देखील माझ्यामागें येतो आहे.'

राजानें झडकर पुढें होऊन ह्मटलें—' उन्मत्तांचा शास्ता पौरव, पृथ्वीचें शासन करीत असतांना, मुग्ध तपस्विकन्यांशीं कोण दांडगाई करितो आहे?'

राजा पुढें आलेला पाहतांच त्यांची थोडीशी गडबड उडाली. कांहीं वेळानें अनसूयेनें शकुंतलेकडे बोट करून ह्मटलें—' आर्या! विशेष नाहीं कांहीं झालें. ही आमची प्रियसखी भ्रमरानें त्रास दिल्यामुळें थोडीशी भ्याली, झालें.' शकुंतलेकडे वळून राजानें ह्मटलें,—' कां तपोवृद्धि आहेना?' हा सहज तिच्या स्थितीला अनुरूप असा प्रश्न आहे. राजा आपल्यालाच उद्देशून बोलतो आहे असें पाहून शकुंतला प्रथमच प्रसंग असल्यानें कांहींशी भिऊन गप राहिली.

( हें शकुंतलेचें वर्णन किती अनुरूप आहे! हाच प्रकार अद्यापि इकडे बहुतेक सर्वत्र अनुभवास येतो. किंचित मोठ्या मुलींना अद्यापिही कोणी पुरुषानें असा समक्ष प्रश्न केला तर त्यांची हीच अवस्था होते. हा बहुधा प्रत्येकाचा अनुभव आहे. )

राजाला अनसूयेनेंच उत्तर दिलें 'होय, त्यांतही अशा अतिथिविशेषाच्या लाभानें. शकुंतले, पर्णशाळेंत जा. फलमिश्र अर्घ घेऊन ये. हें पादोदक आहेच.'

कोणी पाहुणा आला तर प्रथम त्याला पाय धुण्याला पाणी व थोडेसें उपहाराला कांहीं तरी गोड आणि फळें वगैरे आणून देण्याची पूर्वीपासून चाल होती. आलीकडे अनेक चांगल्या जुन्या गोष्टींबरोबर या चालीचाही लोप होत चालला आहे व नवीन शिकलेल्या थोड्याशा मंडळीमध्यें त्याला निराळें चहा, काफी, विडी देण्याचें रूप येत आहे.

राजा—'तुमच्या या सत्य, प्रिय, मधुर भाषणानेंच आतिथ्य झालें.'

प्रियंवदा—'तर मग या सातवणीच्या झाडाखालीं ओट्यावर सावलींत क्षणभर बसून परिश्रम दूर करावयाचे होते.'

राजा—'आणि तुम्हीही या कामामुळें थकलां आहांच. थोडी विश्रांति घ्या.'

अनसूया—'शकुंतले, अतिथिबरोबर बसलें पाहिजे. अशा इकडे बसूं ये.'

त्याला एकटेच बसवून आपण दुसरीकडे कामाला जाणें योग्य नाहीं, त्याच्या जवळ बसणें उचित आहे, असें बोलून सर्व मंडळी बसली.

राजाला पाहिल्यापासून शकुंतलेच्या मनांत कांहीं विलक्षण तऱ्हेचे विचार येऊं लागले होते. ती मनांत ह्मणाली, 'याला पाहून माझ्या मनांत तपोवनाला विरुद्ध असे विचार कां बरें येऊं लागले?'

राजा—'वा: तुह्मी साऱ्या एक वयाच्या, रूपवान, रमणीय. तुमचें हें प्रेम व स्नेहभाव किती मनोरम आहेत!'

प्रियंवदेनें एकीकडे ह्मटलें, 'अनसूये, हा चतुर, गंभीर, प्रिय-भाषणी आणि प्रभाववान् कोण बरें असावा?'

तिला तसेंच एकीकडे अनसूयेनें ह्मटलें, 'गडे, मलाही याचें कौतुक वाटतें. विचारतेंच पण.' नंतर ती राजाला ह्मणाली, 'आपल्या मधुर भाषणामुळें विश्वास वाटून विचारतें. आपण कोणा राजर्षींचा वंश भूषित केला! कोठील लोकांना इकडे येऊन विरहपर्युत्सुक केलें? आणि सुकुमार आत्म्याला कशाकरितां तपोवनांत गमनाचे परिश्रम दिले?'

आपण कोणच्या वंशांत जन्मलां, कोणच्या देशांतून या तपोवनांत कां आलां? हे साधे प्रश्न वरील अलंकारिक व सरस रीतीनें विचारले आहेत. भाषा साधी, सरळ व ठाकठिकीची आणि मनोहर आहे.

आपण खरे कोण तें एकदम प्रगट करावें, किंवा लपवून तरी कसें ठेवावें? असा विचार करून शेवटीं तो ह्मणाला, 'बाई, पौरव राजानें धर्माधिकारावर नेमलेला मी या धर्मारण्यांत सर्व क्रिया निर्विघ्न चाललेल्या पाहण्याला आलों आहे.'

राजानें भाषणांत खोटेपणा न आणितां अनसूयेला उत्तर दिलें आहे.

त्यावर अनसूयेनें वास्तविकपणें त्याला ओळखूनच ह्मटलें, 'तर येथें धर्माचरण करणारे आज सनाथ झाले.'

हीं सर्व भाषणें ऐकून शकुंतलेचें मन राजावर बरेंच बसलें व तिला शृंगाररसद्योतक लज्जा वाटली. राजाचेंही मन तिच्यावर आशक्त झालेंसे दिसलें. त्या दोघांचीही स्थिति पाहून दोघींनींही एकीकडे शकुंतलेला ह्मटलें, 'गडे, यावेळीं बाबा येथें असते तर—'

शकुंतलेनें विचारिलें, 'तर काय?' 'तर ते या थोर अतिथीला आपलें जीवितसर्वस्व देऊन कृतार्थ करिते.'

तुमच्या परस्परानुरागानुरूप ते तुला यांना देऊन तुह्मा दोघांनाही कृतार्थ करिते.

हें मनाजोगें तरी थट्टेचें व आपला मनोभाव लक्षांत आला असें व्यक्त करणारें त्यांचें भाषण ऐकून शकुंतला किंचित् रागानें व झिडकाऱ्यानें ह्मणाली, 'जा. कांहीं तरी आपल्याच मनांत आणून बोलतां. मी तें मुळीं ऐकतच नाहीं.'

( हें शकुंतलेचें भाषण तिच्या या वेळच्या स्थितीला व अवस्थेला अनुरूप असेंच आहे. )

हीं त्यांचीं भाषणें आपसांत हळू हळू चाललीं होतीं.

राजा—'मी ही तुह्माला या तुमच्या सखीविषयीं विचारावें ह्मणतों.'

प्रियंवदा,—'हा आपला आमच्यावर अनुग्रहच.'

राजा—' भगवान् काश्यप कण्व शाश्वत ब्रह्मपरायण प्रसिद्ध आहे. ही तुमची सखी त्यांची कन्या, हें कसें काय ?'

( शाश्वत ब्रह्मामध्यें लीन, नेहमीं ब्रह्मनिष्ट, नेहमीं ब्रह्मचारी, तेव्हां त्याला ही कन्या कशी झाली ? प्राचीन काळीं कांहीं ऋषि गृहस्थाश्रमानें राहून, मारीच ऋषीसारखे नेहमीं तपश्चर्येंत व ब्रह्मपारायणांत निमग्न असत. व कांहीं या कण्वासारखे सदैव ब्रह्मचर्यानें राहत असत. त्यावेळीं ब्रह्मचर्यानें राहिलेंच पाहिजे, तरच खरें ऋषीपण प्राप्त होतें, असा आलीकडील समजुतीप्रमाणें प्रकार नव्हता. )

अनसूया—'ऐकावें, कौशिक या गोत्राच्याच नांवाचा महानुभाव व प्रसिद्ध राजर्षि आहे.'

'तो आमच्या या प्रिय सखीचा पिता समजा. तिला टाकून दिली असतांना तिचें संगोपन केल्या कारणानें काश्यप बाबांना इचे वडील म्हणतात.'

राजा—'टाकलेली म्हटलें यावरून कौतूहल वाटतें. मूळापासून ऐकण्याची इच्छा आहे'

अनसूया—'ऐका तर, पूर्वीं ते राजर्षि गौतमी तीरावर उग्र तप करीत होते. त्याबद्दल देवांच्या मनांत कायशी शंका येऊन त्यांनीं तपोनियमाला विघ्न करणारी मेनका नांवाची अप्सरा त्यांच्याकडे पाठविली.'

राजा—'खरेंच. दुसऱ्याच्या समाधीला भिण्याची देवांना संवयच आहे.'

( हें राजाचें भाषण देवांच्या देवपणाला थोडेंसें बुच्या टोंचून असें आहे. याच्यावरून देवांविषयीं केवळच अनादर नव्हे, तरी पण विशेष आदरबुद्धिही व्यक्त होत नाहीं. )

अन०—' नंतर उदार व रमणीय अशा वसंतसमयीं तिचें मोहक व उन्मादकारक रूप पाहून—'

इतकें बोलून पुढील प्रकार सांगण्याला ती अर्थातच लाजून स्वस्थ बसली.

( हें कथेचें सूचन कितीतरी साधें, सहज, पण प्रौढ आहे. याच्यांत या तापसकन्यांचें स्वाभाविक सौजन्य उत्तम व्यक्त झालें आहे. हाच प्रकार इतर भवभूतीवगैरेंच्या नाटकांत अधिक उत्तान व पाल्हाळिक तऱ्हेनें दिला गेला असता व त्यामुळें त्याच्यांत अशी खुबी कधीं न येती. )

तिचा पुढील भाव जाणून राजानें म्हटलें, 'हें लक्षांत आलें. एकंदरींत हिची अप्सरेपासून उत्पत्ति तर!'

अनसूया-'हो.'

राजा—'हें जुळतें. असलें रूप मनुष्यस्त्रियांमध्यें कोठून संभवणार ? दैदीप्यमान ज्योति पृथ्वीतळापासून उत्पन्न होत नसते.'

ही अतिमानुषसंभवाची असल्यामुळेंच इतकी अप्रतिम रूपलावण्ययुक्त आहे. इच्यांत मानुष पार्थिवांश कमी, म्हणूनच ही इतकी अवर्णनीय (etherial) सुंदर आहे. स्वतःच्या अंगच्या लावण्याच्या तेजानें चंचल व दैदीप्यमान दिसणारी ज्योति पृथ्वीपासून—जडांशापासून—उत्पन्न होत नाहीं.

राजानें सहज प्रसंगानें शकुंतलेच्या अप्रतिम रूपाची तिच्या तोंडावर केलेली ही स्तुति ऐकून शकुंतला अर्थातच लाजून खालीं पाहूं लागली. तेव्हां राजानें मनांत म्हटलें,—'माझ्या मनोरथाला जागा दिसते. इची सखी सहज थट्टेनें अनुरूप वराविषयीं बोलली. ह्यावरून किंचित् शंका व भीति वाटते.'

( शकुंतला लाजून खालीं पाहूं लागली यावरून राजानें तिच्या रूपाविषयीं केलेली स्तुति व

त्याच्या एकंदर भाषणाचा रोख व त्याची त्या वेळची चर्या तिला रुचली व ती राजाविषयीं सकाम झाली होती ही गोष्ट तिच्या सख्यांच्या तशीच राजाच्याही लक्षांत येऊन चुकली होती. पण वरविषयक थट्टेचें भाषण ऐकतांच शकुंतलेनें थोडासा नखरा व झिडकारा दाखविला होता. त्यावरून राजाचें मन द्विधा व साशंक झालेलें होतें कीं, न जणों ही आपल्यावर राजी होईल कां इचें मन दुसऱ्या कोणावर बसलेलें आहे. )

राजाच्या चर्येतील आतुरता पाहून व त्याचा भाव ओळखून प्रियंवदेनें हंसत शकुंतलेकडे पाहून राजाकडे वळून ह्मटलें, 'आणखी कांहीं बोलावयाचें मनांत आहे असें दिसतें.'

हें ऐकून शकुंतलेनें प्रियंवदेला कांहींशी नाराज होऊन—'हें काय गे ? उगीच काय ही थट्टा ? पुरे, चुप कर' अशा अर्थानें जणों अंगुलीनें खूण केली.

राजा—'हो तुह्मी ह्मणतां तसें खरें. सच्चरितश्रवणाच्या लोभामुळें आह्माला आणखीही कांहीं विचारावेंसें वाटतें.'

प्रियंवदा—'यांत विचार कशाचा? तपस्वी जनांला प्रश्न विचारण्याला इतका विचार करण्याचें कारण नाहीं. खुशाल विचारा.'

राजा,—'या तुमच्या सखीला मदनाचा व्यापाररोध करणारें असें इंद्रियांचा जय करणारें वैखानस व्रत स्वतःचें दान होईपर्यंत पाळावयाचें आहे?—कां आपल्यासारखे नेत्र असल्यानें आवडणाऱ्या हरिणींच्याच सहवासांतच नेहमीं राहण्याचें ठरलें आहे?'

ही मुळींच भाषण करीत नाहीं. असें करण्याचा इनें तपस्वीजनानुरूप नियम पाळावयाचा ठरला आहे. किंवा इनें आपल्यासारख्या विलोलदृष्टि हरिणींच्या सहवासांतच आजन्म राहण्याचें ठरविलें आहे? इचा विवाह वगैरे व्हावयाचा आहे कां इनें जन्मभर तापस वृत्तीनें राहण्याचें आहे?

ही बोलत कां नाहीं इतकाच त्याच्या विचारण्याचा भाव होता. तो त्यानें अशा खुबीदारीनें व्यक्त केला आहे.

प्रियंवदा—'ही धर्माचरण करण्यासंबंधांत देखील परवशच आहे ह्मणावयाची. अनुरूप वराला देण्याचा गुरूंनी संकल्प केलेला आहे.'

( राजाचें मन इच्याविषयीं साभिलाष झाल्याचें प्रियंवदेनें ताडलेंच होतें; त्याला अनुसरूनच हें उत्तर आहे. ही धर्माचरण करीत आजन्म या तपोवनांत रहाण्याची नसून गुरूच्या मनांत इला अनुरूप वराला देण्याचा संकल्प झालेला आहे. अर्थात् तुह्माला इच्याविषयीं आशा बाळगण्याला जागा आहे. )

राजानें विचार केला—'आपल्या मनाची प्रार्थना कांहीं दुष्प्राप नाहीं. मना, आतां संशयाचा निर्णय झाला. प्राप्तीची इच्छा व उमेद ठेव. अग्नि असेल अशी शंका वाटत होती तें हातीं घेण्याजोगें रत्न आहे.'

( प्रथमच राजाच्या मनांत शकुंतलेविषयीं अभिलाष झाला तेव्हां ही कण्वाची कन्या, ब्राह्मणकन्या, आपणा क्षत्रियांना इच्छा करण्यायोग्य नव्हे, अशी आशंका आली. तिचें त्यानें पौरवाचें मन अप्राप्य किंवा अयोग्य वस्तूंवर कधीं बसावयाचें नाहीं, असें ह्मणून निरसन केलें. ती कौशिक व मेनका यांची कन्या असल्याचें कळल्यानें त्याचें दृढीकरण झालें. ती कांहींच बोलत नाहीं याचें कारण तिनें आजन्म तपश्चर्या करण्याचें ठरलें आहे किंवा काय अशी शंका वाटून त्यानें पुनः प्रश्न केला. त्याचें उत्तर, तसें कांहीं नसून तिच्या पित्यानें तिला अनुरूप वराला देऊन टाकण्याचें ठरविलें आहे, असें कळलें. तेव्हां इला आपल्यापेक्षां अधिक

अनुरूप वर कोण मिळणार, आपण मागणी केली तर ती मान्य होईल व हें स्पर्शउपभोगक्षम रत्न आपल्याला प्राप्त होईल, असें त्याला खात्रीनें वाटलें. )

ही त्यांची भाषणाची तऱ्हा पाहून शकुंतला रागावल्यासारखें करून ह्मणाली,—'अनसूये, मी जातें.'

अनसूया,—'ती कां?'

शकुंतला,—'ही प्रियंवदा काय काय भलतेंच बोलते आहे तें मी गौतमी आतेला जाऊन सांगतें.'

( एखादी गोष्ट मनापासून आवडणारी पण बाहेरून आवडत नाहीं, असें दाखविण्याची असते. अशा प्रसंगीं शोभण्यासारखें असेंच हें भाषण आहे. )

अनसूया,—'गडे, अशांचा सत्कार सोडून स्वच्छंदपणें जाणें योग्य नाहीं.' तरी कांहींच न बोलतां शकुंतला निघालीच.

शकुंतला निघालेली पाहून राजा इतक्यांतच तिच्याविषयीं इतका कांहीं उत्कंठित झालेला होता कीं, त्याच्या भरांत तो जणों तिच्या मागून जाऊन तिला अडवून धरण्याच्याच बेतास आला होता. पण तितक्यांत आपलें मन आंवरून तो स्वतःशीं ह्मणाला,—'या वेळीं माझी अशी कांहीं चमत्कारिक स्थिति झाली आहे कीं, मी एकदम मुनिकन्येच्यामागें तिला धरण्याला जात असलेला पण अशा अतिप्रसंगापासून विनयानेंच मला आवरलें. आणि जागेवरून न हालतां देखील जणों तिच्याकडे जाऊन मी परत आलों.

'ही काय तरी विलक्षण कामी जनांच्या मनोवृत्त्यनुरूप चेष्टा तरी! कामी जनांच्या मनाच्या वृत्त्यनुरूप त्यांच्या हातून नकळत चेष्टा व कृति सुद्धां होऊन गेल्यासारख्या भासतात.'

अतिथींचा सत्कार करणें बाबांनीं तुजवर सोंपवलें असल्यानें यांचा सत्कार करणें तुझें काम आहे. तें न करितां निघून जाणें तुला योग्य नाहीं हें पोक्तपणाचेंसें भाषण आहे. पण प्रियंवदा विशेष थट्टेखोर व वयानें किंचित् कमी अशी असल्यानें तिनें जाऊन तिला अडवून वरून ह्मटलें 'सखे, मी तुला नाहीं जाऊं देणार.'

यावर त्रासल्या रागावल्यासारखें दाखवीत भिवया वर चढवून शकुंतलेनें विचारिलें, 'तें ग कां?'

प्रिय०—कां ह्मणने दोन झाडांना मीं तुझ्याकरितां पाणी घातलें आहे. चल इकडे ये. त्यांतून आपणाला सोडीव नी मग जा हवी तर.' असें ह्मणत तिनें तिला ओढून परत आणिलें.

ही प्रियंवदेची सर्व कृति तरी थट्टेची व शकुंतलेला मनापासून आवडणारीच होती. हा प्रकार पाहून राजानें ह्मटलें.

'अहो, ही वृक्षसेचनामुळें अगदीं थकलेली दिसते. हें पहा,

झाडाला पाण्याच्या घागरी भरून आणून घातल्यानें इला थकवा आला आहे. खांदे गळत गेले आहेत, तळवे फार लाल झाले आहेत. अधिक दम भरल्यानें उरोजांचा कंप होतो आहे. तोंडावर घामाच्या बिंदूंचें जाळें बांधलें असून त्याच्यामुळें कानांवर ठेवलेल्या सिरसांच्या फुलांचे केसर तोंडावर चिकटले आहेत, आणि गडबडींत केशबंध सुटल्यानें तिनें केशपाश एका हातानें सांवरून धरिला आहे, तेव्हां मीच तिचें ऋण फेडतों.' असें ह्मणून तो तिला आपली आंगठी देऊं लागला.

बराच वेळ मेहनतीचें काम करून थकलेल्या सुकुमार तरुणीच्या स्थितीचें हें अप्रतिम वर्णन आहे व यावरून एक सुरेख चित्र काढतां येईल.

तरी पण शकुंतला व तिच्या सख्या झाडांना पाणी घालीत होत्या. त्यानंतर राजाची व त्यांची अकस्मात् गांठ पडून त्या झाडाखालीं सावलींत येऊन स्वस्थपणें बोलत बसल्या. याला पुष्कळ वेळ झाला होता. तेव्हां अद्यापि त्या पूर्व परिश्रमाचा परिणाम शकुंतलेच्या शरीरावर व चेहऱ्यावर येथें वर्णन केल्याइतकी व्यक्त होत असणें शक्य आहे किंवा कसें हा प्रश्नच आहे. राजानें वर्णन केलें आहे तें प्रत्यक्ष दिसत असल्यासारखें; हा प्रकार पूर्वी होऊन गेल्यासारखें नव्हे. नाटकप्रयोगांत याचा अक्षरशः अभिनय करण्याचा प्रसंग येतो तेव्हां या प्रसंगीं शकुंतलेची भूमिका घेतलेल्या पात्राची उडालेली हास्यास्पद धांदल प्रेक्षकांच्या लक्ष्यांत आल्यावांचून रहात नाहीं.

ही या वर्णनांत थोडीशी संगती चुकली आहे. पण तें अप्रतिम साधलें असल्यानें ती क्षम्य आहे.

त्या आंगठीवर कोरलेलीं नांवाचीं अक्षरें वाचून त्या एकमेकींच्या तोंडाकडे आश्चर्यानें पाहूं लागल्या. त्यांची ती स्थिति पाहून राजानें ह्मटलें 'इच्यावर राजाचें नांव आहे ह्मणून विशेष शंका नको. मी स्वतःच राजा दुष्यंत तुह्माला ही मुद्रा परिश्रमाचें मूल्य ह्मणून खुषीनें देतों.'

प्रियंवदा—'तर मग आपल्या अंगुलीला इचा वियोग होणें योग्य नाहीं. आपल्या या वचनानेंच ही ऋणमुक्त झाली.' पुनः थोडेसें हंसत—या हंसण्याचा भाव अर्थातच शकुंतलेच्या ध्यानांत आला—ती ह्मणाली, 'गडे शकुंतले, तुझी या दयाळू गृहस्थांनीं अथवा महाराजांनीं मुक्तता केली आतां खुशाल जा.'

मी तुला राहिलेल्या घागरीबद्दल अडकविलें होतें. महाराजांनीं मुद्रा देण्यास तयार होऊन तें तुजवरचें माझें ऋण फेडिलें. आतां खुशाल जा. माझी अडचण नाहीं.

हें सर्व पाहून व आपल्याशीं राजा दुष्यंत प्रत्यक्ष अशा तऱ्हेनें बोलतो आहे व वागतो आहे हें पाहून, शकुंतलेच्या मनांत त्याच्याविषयीं होत चाललेला अनुराग अधिकाधिक वाढत होता.

प्रियंवदेचें हें भाषण ऐकून व तिचा भाव ताडून तिनें मनांत ह्मटलें, 'हो माझ्यानें जाववेल तर ना!' नंतर तिनें मुरक्यानें मोठ्यानें प्रियंवदेला ह्मटलें, 'मला जा किंवा रहा ह्मणणार तूं गे कोण?'

ही तिची बोलण्याची तऱ्हा पाहून व तिची स्थिति ताडून राजानें मनांत ह्मटलें, 'मी जसा इच्याविषयीं तशीच ही मजविषयीं सानुराग झाली असावी कां? अथवा माझ्या मनोरथाला इथें जागा आहे खास. कारण—

ही, प्रत्यक्ष माझ्याशीं किंवा माझ्यासंबंधेंही भाषण करीत नाहीं, तरी मी बोलत असतांना इकडेच तोंड वळवून कान देते. माझ्या सन्मुख फार वेळ रहात नाहीं, तरी पण तिची दृष्टि फारशी दुसरीकडेही नसते.'

मजवरच आषक आहे अशा तऱ्हेचें तिचें वर्तन सारखें दिसत नाही, तरी तिचें लक्ष्य दुसरीकडेही तसें विशेष लागलेलें वाटत नाहीं. हल्लींच्या तिच्या स्थितीवरून तिचें मन मजवर बसलेलें आहे खास असें दिसतें.

( एखाद्याचें दुसऱ्यावर प्रेम बसलें असलें तर तो त्याच्याशीं बोलतो किंवा त्याच्यासंबंधानें तरी दुसऱ्याशीं बोलतो. तसें यावेळीं शकुंतला करीत नव्हती. तरी ती त्याचें भाषण उत्सुकतेनें व लक्षपूर्वक ऐकत होती; व ती सारखी त्याच्याकडे पहात नव्हती, तरी दुसरीकडेही तिचें मुळींच लक्ष नव्हतें.

याचा, असें वर्णन आहे. त्याचें भाषण त्याच्या दृष्टीनें खरें, पण परिणामीं हास्यकारक असें असलें पाहिजे. राजेलोकांच्या अंतःपुरासंबंधी कारस्थानांत प्रवीण असून असल्या खटपटींत राजाची साथ करावयाची हेंही एक त्याचें मुख्य काम असे.

अशा तऱ्हेचा विदूषक रोजच्या शिकारीच्या कटकटीमुळें त्रासलेला राजाकडे जाण्याला निघालेला आपल्याशीं ह्मणाला,—

'अहो पाहिलें, शिकारीच्या नादीं लागलेल्या राजाच्या मित्रपणामुळें किती तरी कष्ट होताहेत. हा मृग—हा वराह—हा वाघ असें ह्मणत भर दुपारीं, ग्रीष्म ऋतुमुळें पुरतीशी सांवली आहे नाहीं असल्या झाडाझुडांतून रानोरान भटकत फिरावयाचें; पहाडांतील ओहोळाच्या डबक्यांत सांचलेलें, पानें सडल्यानें कडू झालेलें पाणी प्यावयाचें; सवड सांपडेल तेव्हां सळईवर अर्धे-बोबडी भाजलेली शिकार मुख्यतः खावयाची, दिवसभर घोड्यावर किंवा त्याच्यामागें दवडावें लागल्यानें सारे सांधे ढिले झालेले—सबब रात्रीं सुद्धां स्वस्थशी झोंप नाहीं. तशांतच मोठ्या पहाटेचें रान वेढण्याकरितां सज्ज होणाऱ्या रांडलेक शिकाऱ्यांच्या आरडाओरडीनें जागा झालों. बरें इतक्यांवरच पीडा टळते का?—करटावर काळपुळी तशांतला हा प्रकार! काल आह्मी बरोबर नसतांना राजेश्री मृगामागें लागून आश्रमांत पोहोंचले. तेथें आमच्या दुर्दैवानें गोसावड्याची पोरगी शकुंतला त्यांच्या दृष्टीस पडली आहे. आतां नगराला परत जाण्याचें नांव कसें तें घेत नाहीं. आज सुद्धां तिच्याविषयींच विचार करीत स्वारींनीं सारी रात्र जागरणच केलें. डोळ्याला झोंप कशी ती नाहीं. काय करावयाचें? आलेलें भोगलें पाहिजे खरें. चला, त्यांचें स्नानपूजनादिक उरकलें असेल, जाऊन दर्शन घ्यावें.'

असें ह्मणून चार पावलें चालून पुढें पाहात तो ह्मणाला, 'हे पहा वनपुष्पांच्या माळा घातलेल्या व हातीं धनुष्य असलेल्या यवनींसह हे आमचे प्रिय मित्र शिकारीला जाण्याच्या तयारीनेंच इकडेच येत आहेत. असो. आपण अंग वेडेंवाकडें करून असे इकडे उभे राहूं. यानें तरी कांहीं विश्रांति मिळाली तर पहावी.'

(शिकारीची मुळींच आवड नसलेले लोक शिकारीचा चांगलासा नाद असलेल्या राजे लोकांबरोबर शिकारीला निघाले तर त्याच्यामुळें त्यांना कसकसा निष्कारण त्रास होतो, याचें हें सुरेख वर्णन आहे. अलीकडील राजे लोकांच्या शिकारींत यासंबंधें सुधारणा होऊन बऱ्याच अडचणी दूर झाल्या आहेत, तरी त्या मोठ्या लोकांकरितां; बरोबरच्या नोकरचाकरांकरितां नव्हेत. सळईवर भाजलेलें मांस बहुतकरून खाण्यांत यावयाचें, असें लिहिलें आहे. हें वर्णन विदूषकानें स्वतःलाही लागू असें केलें आहे. असें घेऊन चाललें तर हें नाटक लिहिलें गेलें त्यावेळीं ब्राह्मणांना—निदान या ब्राह्मण विदूषकाला—मांस खाण्यास अडचण नव्हती, असें घेतलें पाहिजे.

शिकारीला जातांना राजाबरोबर यवनी असल्याचें वर्णन केलें आहे. अशा तऱ्हेनें यवनी—हलक्या बायका—शिकारी लोकांच्या कां होईनात—मोकळेपणें राजे लोकांबरोबर शिकारींत बाहेर जाण्याचा प्रघात कसा पडला व तो कोठवर अमलांत होता, हा प्रश्नच आहे. हल्लीं सुद्धां हिंदु संस्थानिकांकडे शिकारी लोक बहुधा यवन—मुसलमानच—असतात. यवन शब्दाचा उपयोग दुष्यंताच्या वेळेसंबंधेंही केलेला आहे यावरून या लोकांचा—ह्मणजे परकी पाश्चिमात्य लोकांचा—संसर्ग या देशांत फार प्राचीन काळापासून होता असें ठरतें.

विदूषकानें वर्णन केल्याप्रमाणें येतां येतां राजा आपणाशीं ह्मणाला, 'कण्वकन्या शकुंतला इच्यावर माझें मन किती तरी जमलेलें. पण ती प्राप्त होणें सुलभ नाहीं. तरी माझें मन तिच्यावर अतिशय आसक्त होत्सातें तिचे भाव व चेष्टा पाहून धन्यता मानतें. यापासून मदनमनोरथ पूर्ण होईल असें नाही. तरी तिच्या दर्शनानें माझ्या मनाची तृप्ति होऊन कदाचित् तिच्याही मनांत मजविषयीं विशेष प्रेम उत्पन्न होईल.'

( एखाद्यावर मन बसलें ह्मणजे त्याला मागीलपुढील भान राहात नाहीं. नेहमीं त्याचाच ध्यास असतो. ) या विचाराचें त्याचें त्यालाच हसूं येऊन तो ह्मणाला, 'पण आपल्या अभिप्रायानुरूपच इष्टजनाची चित्तवृत्ति आहे असें समजणाऱ्याची जुणों थट्टा होते.'

'कामी पुरुषाचें मन बसलेल्या स्त्रीनें सहज विलोलदृष्टीनें पाहिलें किंवा नितंब भारामुळें मंद मंदगमन केलें, किंवा सखीशीं कांहीं कारणावरून कृतक केल्यानें व असूयेनें—मी नाहीं जा—असें कांहीं ह्मटलें, तर हें सर्व ती आपल्यावरच आषक होऊन करिते आहे, असें त्यास वाटतें.'

कामी पुरुषाला आपलें मन जिच्यावर बसलेलें असेल तिचेंही मन आपल्यावरच बसलेलें असून तिच्या सर्व कृति व वर्तन आपल्यालाच अनुलक्षून आहेत असें वाटत असते.

( या दोन्ही श्लोकांत वर्णन केलेली स्थिति अक्षरशः खरी असून तिचा प्रत्यही अनुभव येतो. केवळ प्रेमसंबंधापुर्तीच नसून इतर हरएक संबंधांतही हाच प्रकार अनुभवास येतो. हा मनुष्यस्वभावच आहे. याचें अशा विशिष्ट व मनोहर रीतीनें केलेलें वर्णन इतरत्र क्वचितच आढळतें. भाषा साधी व सरळ असल्यानें हे श्लोक विशेष चांगले झाले आहेत. )

राजा येत असलेला पाहून, वेडावांकडा होऊन, उभा राहिल्या जागेवरूनच विदूषकानें ह्मटलें,—'मित्रा, माझे हात पाय चालत नाहींत, तेव्हां तुमचा शब्दानेंच जयजयकार करितों.' ( पुढें होऊन हात उचलून आशीर्वाद देत जयजयकार करण्याला मी यावेळीं समर्थ नाहीं. )

राजा—अरे, पण हीं तुझीं गात्रें अशीं कशानें झालीं?

विदूषक—कशामुळें! बाः स्वतःच डोळ्यांत बोट घालून पाणी कां आलें ह्मणून विचारितोस! चांगलें!

राजा—तें कसें? माझ्या लक्षांत आलें नाहीं.

विदूषक—अहो राजेश्री, वेतसाला कुबडेपणा स्वभावतःच, कां नदीच्या वेगामुळे येतो?

राजा—नदीच्या वेगामुळें.

विदूषक—तसेंच मला ही स्थिति येण्याला कारण आपणच.

राजा—'तें रे कसें?'

विदूषक—हें असें. आपण सारीं राजकार्यें सोडून असल्या घोर रानावनांत वनचरासारखे फिरतां. खरोखर रोजच्यारोज सावजें उठविल्यामुळें माझे सांधेनसांधे खिळखिळे झाले. आणि गात्रें मुळींच स्वाधीन नाहींतशीं झालीं आहेत; तेव्हां मला एक दिवस तरी विश्रांति देण्यापुरता प्रसाद करा. दुसरें काय?

(विदूषकानें मृगयेच्या परिश्रमाला त्रासून राजाचें मन परावृत्त करण्याचा—निदान स्वतःला तरी थोडीशी विश्रांति मिळण्याचा—हा सुरेख यत्न केला आहे. तो त्याच्या थट्टेखोर तऱ्हेवरच आहे. )

हें ऐकून राजानें मनांत विचार केला—'हा असें ह्मणतो, आणि कण्वकन्येचाच विचार लागल्यामुळें माझें मन मृगयेविषयीं निरुत्साह झालें आहे. कारण—

'हें माझें धनुष्य सज्ज आहे. त्याच्यावर बाण लावून तो या मृगावर सोडण्याला माझें मन घेत नाहीं. कारण, माझ्या प्रियेजवळ राहून मुग्ध विलोल विलोकनाचें त्यांनीं तिला जणों शिक्षण दिलें आहे.'

( हाही श्लोक साधा, सरळ व प्रसादयुक्त आहे. इतक्यांत राजानें शकुंतलेला आपली प्रियाही करून टाकिली आहे! तिचें आपल्यावर प्रेम बसलेलें आहे अशी त्याची खात्री झालेली दिसते. )

राजा कांहींच बोलत नाहीं असें पाहून विदूषकानें त्याच्या तोंडाकडे पाहत ह्मटलें, 'हे राजेश्री मनांत आणिकच कांहीं विचार आणून पुटपुटत आहेत. मी हें अरण्यरोदनच केलें ह्मणावयाचें!'

( हें विदूषकाचें भाषण आपल्याशींच पण राजाला ऐकूं जाई व त्याचें लक्ष आपल्याकडे लागे, अशा तऱ्हेवर केलें आहे. प्रत्यक्ष राजालाच हें भाषण करण्यापेक्षां ही तऱ्हा अधिक प्रशस्त व सरस आहे. )

त्याला राजानें थोडेसें हंसत ह्मटलें, 'अरे, दुसरें काय—प्रियमित्राचें वचन कसें मोडावें, ह्मणून मी स्वस्थ बसलों.'

यावर, 'चिरंजीव हो,'—असा आशीर्वादसा करून विदूषक निघाला. तों राजानें ह्मटलें, 'मित्रा, थांब, माझें बोलणें पूर्तें ऐक.'

विदूषक—काय ती आज्ञा होऊं दे.

राजा—तूं विश्रांति घेतल्यावर मला एका सोप्याशा कामांत साहाय्य केलें पाहिजे.

विदूषक—मोदकबिदक खाण्यांत का? तर अस्मादिकांनीं हा क्षण घेतला आहे.

राजा—तें कोठें व कसें तें मी सांगतों.— कोण आहे रे तिकडे?

( विदूषक ब्राह्मण नेहमीं श्राद्धपक्ष झोडणाऱ्या वर्गांतला त्याच्या तोंडीं असले शब्द केव्हांही सूक्तच आहेत! तो गरीब भोळवट व खादाड अशांतला असावा असें सामान्यतः वर्णन आहे, त्याला अनुसरूनच हें त्यांचें मोदकांविषयींचें भाषण आहे. )

राजानें हाक मारतांच द्वारपालानें येऊन, 'काय आज्ञा,' असें ह्मणतां, राजानें सेनापतीला बोलावून आणण्यास सांगितलें. तसा तो बाहेर गेला व थोड्या वेळानें सेनापतीसह येतां येतां त्याला ह्मणाला, 'हे पहा महाराज कायशी आज्ञा करण्याला उत्कंठित होत्साते इकडेच पहात बसले आहेत, पुढें जावें.'

सेनापती—शिकारीमध्यें दोष आहे असें मत आहे, तरी तिच्यापासून आमच्या यजमानाला तर गुणच झालेला दिसतो आहे. शिकारींत नेहमीं धनुष्यबाणाशीं काम पडल्यानें त्यांना परिश्रम पडून त्यांचें शरीर कणखर आणि ऊन्ह ताहान सोसण्याला समर्थ झालें आहे. त्याच्यावर परिश्रमानें घामाचा टिपूस येत नाहीं. शरीर जरी कृश झालेलें आहे, तरी तें कसलेलें व गठलेलें असल्यानें तसें वाटत नाहीं. पहाडावर स्वच्छंद विहार करणाऱ्या वनगजाच्या शरीरासारखी त्यांची स्थिति झाली आहे.

( 'शिकार रिकामटेकड्याचें काम होय.' 'शिकार कार बेकारान् अस्त'—असें औरंगजेब बादशहानें आपल्या एका पत्रांत वर्णन केलें आहे. मृगया एक प्रमुख व्यसन आहे, अशाविषयीं आपल्या प्राचीन ग्रंथांत जागजागीं वर्णन आहे. लोक मृगयेला सामान्यतः नांवेंच ठेवतात. तरी तिच्यापासून राजाच्या शरीरावर चांगला गुणकारक परिणाम झाला आहे, असें सेनापतीनें ह्मणून तो परिणाम त्याच्या शरीरावर कसा व्यक्त झालेला आहे, त्याचें विशेष व सरस वर्णन केलें आहे—

तें अगदीं यथार्थ आहे. हाही श्लोक उत्तमांपैकीं आहे.)

नंतर त्यानें पुढें होऊन राजाचा जयजयकार करून, 'रान वेढलें गेलें—आतां उशीर कां?' असें ह्मटलें.

(ही त्यानें आपल्या कामासंबंधें आतुरता व्यक्त केली आहे.)

राजा—'या माढव्यानें शिकारीला नांवें ठेवून माझा उत्साह मंद केला आहे.'

यावर सेनापतीनें विदूषकाला एकीकडे ह्मटलें, 'मित्रा, तूं याविषयीं—मृगयेला नांवें ठेवण्यांत—कायम रहा. ते न जातील तर बरेंच—पण मी थोडा वेळ यजमानाच्या मर्जीप्रमाणें बोलतों.'

(यांत आपल्याकडील—किंबहुना सर्व राजेलोकांच्याकडे त्यांच्या आश्रित मंडळीचा कसा व्यवहार चालतो तो स्पष्ट, पण कसा थोडक्यांत, सुचविला आहे. प्रत्येकाला होईल तेथवर राजाच्या मर्जीप्रमाणें वागणें व बोलणें भाग असतें. मग मनांत त्याच्या कितीही विरुद्ध प्रकार असो. सेनापतीच्या मनांतसुद्धां राजा शिकारीला न जाईल तर बराच—तितका त्रास चुकला—असें होतें. पण तसें स्पष्ट ह्मणणें किंवा दाखवावें तर न जाणों राजा नाराज होईल, व त्याला आपण व विदूषक मिळून गेलों, असें वाटेल—व तो कदाचित् शिकारीला जाण्याचा जास्त आग्रह धरील. यापेक्षां आपण शिकारीला जाणें उत्तम असेंच प्रतिपादन करावें व विदूषकानें तिला नांवें ठेवावीं, ह्मणजे विदूषकाकडे राजाचा अधिक ओढा असल्यानें तो बहुधा जाणार नाहीं व सर्वांचाच त्रास चुकेल असें सेनापतीला वाटलें, व तेंच अखेरीस खरें ठरलें. हें कृतकभांडण विशिष्ट अर्थसाधनाकरितां केलेलें आहे. हा प्रकार प्रत्यहीं प्रत्येक दरबारांत आढळून येतो.

सेनापती—'हा मूर्ख वाटेल तशी बडबड करो. याविषयीं हुजूरचीच प्रत्यक्ष साक्ष पहाना.

'मृगयेला व्यसन ह्मणून नांवें ठेवतात, पण तिच्यासारखा गमतीचा खेळ आहे कोठें. तिच्यामुळें मेद झडून पोट हलकें होतें; सर्व शरीर सुटसुटीत व कोणच्याही उद्योगाला तयार असें होतें. निरनिराळ्या श्वापदांच्या चित्तावर भीति व राग यांच्यामुळें झालेल्या विकृति व त्यांच्या चर्या पाहण्यांत येतात. आणि चललक्ष्यावर बाणाचा नेम साधावा लागल्यानें धनुर्धरांना उत्कर्ष प्राप्त होतो.'

शिकारीपासून शिकार करणाऱ्या व्यक्तीला कसकसा फायदा होतो त्याचें हें एकदेशीय तरी उत्तम वर्णन आहे. व तें सेनापतीनें बुद्ध्या बाह्यतः तरी राजाला प्रोत्साहन देण्याकरितां केलेलें आहे. प्रत्येक वस्तूंत चांगले व वाईट गुण असतात. मृगयेमधील चांगल्याच गुणांचें हें वर्णन आहे.

त्याला झिडकारीत विदूषकानें ह्मटलें, 'मोठा आला शिकारीची बढाई करणारा. यांची प्रकृति ताळ्यावर आहे. तूं मात्र रानोरान भटकत एखाद्या माणसाचीं नाकें खाण्याला सवकलेल्या जखखड आस्वलाच्या तोंडांत पडणार खास.'

(राजा शिकारीविषयीं बहुतेक निरुत्साह झाल्याचें बोलल्यावरूनच विदूषकानें हें भाषण केलें आहे. त्याच्यांत सेनापतीला—तुला वाटेल तर जा—हे कांहीं येत नाहींत—पण तुझा याच्यांतच शेवट होणार, असेंही कांहींसें टोंचून सांगितलें आहे.)

राजानें हा दोघांचा वाद मिटवीत ह्मटलें, 'अहो सेनापती, आपण आश्रमाजवळ उतरलों आहोंत. ह्मणून तुमचें ह्मणणें मला मान्य करतां येत नाहीं.' (यांत राजानें आज शिकारीला जाणें कां मंजूर नाहीं याचें कारण, आपण आ-

श्रमाजवळ असल्यानें आश्रमवासीजनांला त्रास होईल असें सेनापतीच्या लक्षांत येण्याकरितां—आणि स्वतःच्या संबंधानें या आश्रमांत शकुंतला आहे तिच्या निजध्यासामुळें मला शिकारीला जाण्याला मुळी उत्साहच वाटत नाहीं असें खरें—सांगितलें आहे. )

'तेव्हां आज आतां असें होऊं द्या. वनमहिष पाणी पिण्याच्या तलावांत खुशालपणें बसून आपल्या शिंगांनीं पाण्याचें ताडण करूं देत.—( अशी बिनधास्त डबक्यांत बसलेल्या असल्या ह्मणजे वरचेवर डोकीं हलवून शिंगांनीं पाणी बडवीत असतात. हें निर्भयपणाचें व खुशालपणाचें लक्षण आहे, तें कवीनें चतुरपणानें पाहून त्याचें वर्णन केलें आहे.) सावलींत कळप बांधून बसलेलीं सावजें खुशालपणें रंवथ करूं देत. पल्वलांमध्यें वनवराहपती खुशाल, निर्भय व विश्वस्त होत्साते नागरमोथे उकरून खात बसोत आणि या आमच्या दोरी उतरलेल्या धनुष्यालाही विश्रांति मिळो.'

आज आपण शिकारीला जाऊन जंगलांत गडबड उठविली नाहीं ह्मणजे वनमहिष खुशाल तळावांत बसून स्वस्थपणें शिंगांनीं पाणी बडवितील, हरणाचे कळप दुपारच्यावेळीं सावलींत बसून स्वस्थपणें रंवथ करतील, आणि प्रमुख वनवराह लहानलहान डबक्यामध्यें खुशालपणें दांतांनीं नागरमोथे उपटून उखडून खातील. याप्रमाणें शिकार करावयाच्या सर्व सावजांना विश्रांति मिळेल; तशीच दोरीला ढील मिळाल्यानें धनुष्यालाही विश्रांति मिळेल.

( हेंही वर्णन साधें तरी वास्तविक प्रसादयुक्त आणि सरळ आहे. वनमहिष, मृग व वराह यांच्या खुशालपणांतील कृतीचें व स्थितीचें वर्णन मार्मिकपणें केलेलें आहे. )

सेनापतीला तरी हें नको होतें असें नाहीं. त्यानें—'जशी हुजुरची मर्जी.' असें ह्मटलें.

राजा—'तर मग रान घेरण्याला पूर्वीच पुढें गेलेले लोक परत बोलावा आणि सैनिक लोक तपोवनाला त्रास देणार नाहींत अशाविषयी सक्त ताकीद द्या. हे पहा—

तपस्वी लोक वृत्तीनें सौम्य खरे—तरी त्यांच्या अंगीं बाहेर न दिसणारें पण प्रखर दाह करणारें तेज असतें. त्यांना त्रास किंवा उपसर्ग लागला तर तेव्हांच तें प्रगट—नाशकारक—होतें. सुर्यकांत मणि स्वतः शीतलस्पर्श असतो तरी त्याला सूर्यतेजाचा संपर्क झाला कीं तो दाहच करितो.'

मुनिजन शांत असतात तरी त्यांच्याशीं फार सलगी करून त्यांना त्रास देऊं नये, नाहीं तर त्यांच्या अंगचें गूढदाहक तेज प्रगट होऊन नाश होतो.

( यांत राजाच्या मनांत ऋषिलोकांविषयीं पूज्यभाव, भीति व आदर असल्याचें दाखविलें आहे. सुभाषित या नात्यानें सुद्धां हा श्लोक चांगला आहे. )

सेनापती—'जशी हुजूरजी आज्ञा!'

विदूषक—'झाला एकदांचा तुझा उत्साहभंग! ठीक झालें.'

सेनापती गेल्यावर राजानें यवनींना शिकारीपोषाख उतरण्यास आणि द्वारपाळ रैवतकाला आपल्या कामावर जाण्यास सांगितलें. सर्व सेवकजन निघून गेलेले पाहून विदूषकानें ह्मटलें, 'येथें चिटपांखरूं सुद्धां राहूं दिलें नाहीं. आतां या झाडाखालीं वेलीच्या जाळींत सावलींत सुरेख चौरंगासारखें आसन झालेलें आहे, तेथें बसावें मीही चांगल्याशा जागीं बसतों.' ( तसें केल्यावर. )

थोडे वेळानें राजानें ह्मटलें, 'माढव्या, तुझ्या

दृष्टीचें साफल्य झालें नाहीं—कारण येथें पाहण्यासारखें आहे तें तूं पाहिलेंच नाहींस.'

त्याला विदूषकानें भोळवटपणानें किंवा खुशामतीच्या तन्हेवर लागलेंच उत्तर दिलें, 'वाः आपण माझ्यासमोरच तर आहां.' आपल्यापेक्षां दर्शनीय तें काय असणार ! आणि तें मी समक्षच पाहतों आहे.

राजा—'आपलीं माणसें सर्वांनाच सुंदर दिसतात. पण या आश्रमाला शोभा आणणाऱ्या शकुंतलेसंबंधें मी बोलतों आहें.'

तुझें दृष्टिसाफल्य झालें नाहीं व येथें पाहावयाचें तें तूं पाहिलें नाहींस असें ह्मटलें, तें मी या आश्रमाचें भूषण अशा शकुंतलेला उद्देशून.

विदूषकानें तो पुढें या संबंधेंच बोलणार असें ताडून मनांत ह्मटलें 'याला मुळीं याविषयीं सवडच देत नाहीं !' नंतर तो राजाला ह्मणाला,— 'हं, त्या तापसकन्येवर डोळा ठेवून विचार चालला आहे वाटतें !'

राजा—'मित्रा, पौरव भलत्याच वस्तूवर कधीं डोळा ठेवीत नाहीत.' ती मुनींची कन्या, अप्सरेच्या पोटची. तिनें टाकली, ती मुनीला सांपडली. अर्कावर सहज येऊन पडलेल्या नवमालिकेच्या फुलासारखी आहे.'

( ती हीन जातीची किंवा परोपभुक्त व त्याग केलेली नसून अप्सरेच्या पोटची व सहज कण्व मुनीला सांपडलेली आहे. तेव्हां तिच्या प्राप्तीविषयीं मला खटपट करण्याला हरकत किंवा अडचण नाहीं. यांत राजानें शकुंतलेची उत्पत्ति, मनोहरपणा, आणि शुद्धि यांचा गौरव करून ती आपणाला योग्य आहे असें दाखविलें आहे )

विदूषकानें हंसत ह्मटलें, 'हें पहा, उत्तमोत्तम स्त्रीरत्नें सोडून इच्यावर आषक्त होणाऱ्या तुझा हा प्रकार, एखाद्याला उत्तम पिंडखजूर खातां खातां वीट येऊन चिंचेवर वासना जावी, तशांतला दिसतो.'

( कालिदासाच्या वेळीं सामान्य लोकांत पिंडखजूर विशेष चांगला व दुर्मिळ मानला जात असावा. )

राजा—'अरे, तूं तिला पाहिलें नाहींस तोंवर असें ह्मणतोस.' पाहिल्यावर तुझेंही मत मजप्रमाणेंच होईल.

विदूषक—'आपणाला सुद्धां विस्मयांत टाकणारी ती तशीच रमणीय असली पाहिजे.'

विदूषकाचेंही मत फिरत चाललेलें पाहून राजानें ह्मटलें, 'मित्रा, तुला फार काय सांगू, विधीनें तिला घडतांना जड पदार्थ घेऊन किंवा स्वतःच्या हातानें न घडतां आपल्या मनांतील कल्पनेप्रमाणें उत्तमोत्तम चित्र रेखून त्यानें त्याच्यांत प्राण घातला. विधात्याच्या थोरवीचीच साक्ष अशी ती एक अद्वितीय स्त्रीरत्न आहे.

विदूषक—'असें असलें तर इच्यापुढें सर्व रूपवती स्त्रिया तुच्छ झाल्या ह्मणावयाचें.'

राजा—'शिवाय ही शकुंतला जणों अद्यापि कोणीही वास न घेतलेलें पुष्प, न खुडलेलें कमल, न घासलेलें किंवा न विंधलेलें रत्न, अथवा, जणों कोणी न चाखलेलें ताजें मधाचें पोळें, आणि अखंड पुण्याचें बिनमोल फलच, अशी आहे. विधात्यानें या सर्वांचा कोण भाग्यशाली भोक्ता ठरविला आहे कोण जाणें !'

यांत राजानें शकुंतलेच्या वर्णनाची जणों कमाल केली आहे.

यावर विदूषकानें राजाचें मन फिरविण्याचा बेत सोडून त्याला उत्तेजन देत ह्मटलें, 'तर मग आपण तिला तातडतोब सोडवा. ती एखाद्या हिंगणमिठ्याच्या तेलानें चिकट जटा झालेल्या तापसाच्या हातीं न पडो.'

राजा—'ती पराधीन, आणि तिचे पालकही येथें नाहींत.'

विदूषक—'बरें, आपल्या संबंधें तिचा रागरंग कसा काय?'

राजा—'तपस्विकन्या उपजतच अप्रगल्भ, तरी पण ती माझ्या तोंडाकडे समोर पहात नव्हती, यावरून तिला शृंगारलज्जा वाटत होती असें दिसतें. तिला वरचेवर हसूं येत होतें, यावरून तिच्या मनोवृत्ति विनयामुळें आडपडद्यानेंशा दिसत होत्या; तरी तिच्या अंतःकरणांत मदनविकार विशेष प्रगट किंवा अगदीं गूढ असाही दिसत नव्हता.'

तिचें हसणें व पाहणें इत्यादिकांवरून ती मजवर अनुरक्त झालेलीशी दिसत होती. तीही अगदीं उघडपणें नव्हे. (तरुण व मुग्ध स्त्रियांच्या मदनविकारविकासाच्या निदर्शनाचें हें सुरेख, प्रौढ व वास्तविक वर्णन आहे.)

यावर विदूषकानें कांहींसें थट्टेनें म्हटलें, 'हो, नाहीं तर तिनें येऊन तुझ्या मांडीवरच बसावयाला हवें होतें!'

राजा—'शिवाय तिनें पुनः जातांना कुशलपणानें व कांहींसें मोकळेपणानेंच आपला खरा भाव बराच प्रगट केला. कारण,

एक दोन पावलें जाऊन पायाला दर्भांकुर रुतल्याचा बहाणा करून ती तेथेंच थबकली. तसेंच झाडांच्या फांद्यांना वल्कल अडकलें असें दाखवून तोंड फिरवून तें सोडवीतशी म्हणून मजकडे पहात उभी राहिली.'

खरोखर तिच्या मनांतून त्यावेळीं जावयाचें तर होतेंच, पण त्यांतही मजकडे पाहण्याचें व आपला प्रेमभाव सखींना नकळे अशा तऱ्हेनें दाखविण्याचा तिचा हेतु होता. म्हणून तिनें सहज पायांत दर्भांकुर रुतल्याचा व नंतर झाडांच्या फांद्यांमध्यें आपलें वल्कल अडकल्याचा बहाणा केला आणि ती तोंड फिरवून मजकडे प्रेमदृष्टीनें पहात क्षणभर उभी राहिली.

(हा प्रसंग कवीनें अगदीं सहजपणें आणला असून त्याचें वर्णनही मोठ्या खुबीदारीनें केलेलें आहे. अशा प्रसंगाचा अनुभव आपल्या गृहस्थितींत सुद्धां अनेक प्रेमळ दंपत्यांना पुष्कळदां येतो.

असल्याच तऱ्हेच्या प्रसंगाचें वर्णन भवभूतीनें मालती—माधवांत पहिल्या अंकांत माधवाच्या तोंडीं घातलें आहे. पण त्यांत आणि यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे.)

हें ऐकून विदूषकानें उल्हासानें म्हटलें, "तर मग राव, शिदोरी बांधून तयार व्हा. आपण या तपोवनाचें उपवनच बनविलें!"

आपण शकुंतलाप्राप्तीच्या उद्योगाला लागा कसे. तो सफल होण्यांत कसर नाहीं. हा उद्योग सफळ झाला म्हणजे हें तपोवन आपण शृंगारविहार करण्याचें रमणीय उपवनच केलेंत.

राजा—'मित्रा, येथील कांहीं तापसांनीं मला ओळखिलें आहे. तेव्हां पुनः आश्रमांत जाण्याला कांहीं योग्य सबब तर पहा.' योग्य सबबीविना पुनः आश्रमांत गेलें तर बुद्ध्यां शकुंतलेच्या लालचीनेंच गेलों असें त्या लोकांना वाटेल. तसें न वाटतां सहज तेथें जाऊन राहतां येईल अशी युक्ति काढ.

विदूषकानें आपल्या नैसर्गिक गांवढळपणाला अनुरूप अशा तऱ्हेनें म्हटलें, 'आपण राजे, आपणाला दुसरी सबब ती कशाला हवी? आमच्या हक्काचा नीवाराचा षष्ठांश दाखल करा म्हणावें.'

(राजाला प्रजेपासून उत्पन्नाचा षष्ठांश घेण्याचा हक्क आहे. येथील उत्पन्न नीवारत्याचा षष्ठांश वसूल करणें आहेच—त्याच निमित्तानें त्यांच्याकडे जावें, असें विदूषकानें सुचविलें. पण राजानें त्याला झिडकारून म्हटलें,

'हा मूर्खा! यांच्या रक्षणापासून प्राप्त होणारें भाग्य निराळ्याच प्रकारचें. त्याची योग्यता रत्नराशीच्याही पलीकडे आहे. इतर सर्व प्रजे-पासून त्यांच्या उत्पन्नाचा षड्भाग प्राप्त होतो तो अंशांश नष्ट होणारा. पण या तापसांकडून त्यांच्या तपाचा षष्ठांश प्राप्त होतो तो शाश्वत फल देणारा. तेव्हां नीवाराचा षष्ठांश वसूल करण्याला जाणें ठीक नाहीं.'

इतक्यांत दोघे ऋषिकुमार राजाच्या भेटीला आलेले ह्मणाले—'वा: आपला मनोरथ सफळ झाला.'

( हें भाषण राजाच्या मागील भाषणाला व मनोरथाला शुभ शकुनासारखेंही आहे. )

हा त्यांचा शब्द ऐकून राजानें ह्मटलें, 'अरे, हा धीर व गंभीर असा तपस्वी लोकांचा शब्द वाटतो.' इतक्यांत देवडीवाल्यानें आंत येऊन ह्मटलें, 'महाराजांचा जयजयकार असो. बाहेर दोघे ऋषिकुमार आले आहेत.'

राजा—'त्यांना तावडतोब आंत घेऊन ये.' त्यानें जाऊन त्यांना 'असें इकडून यावें' असें ह्मणत आंत आणिलें. ऋषिकुमारांनीं येतां येतां राजाला पाहिलें. त्यांतील एकजण ह्मणाला, 'वा: हा राजा असा तेजस्वी आहे, तरी त्याला पाहून मनांत विश्वास वाटतो. अथवा ऋषि आणि राजे सारखेच. तेव्हां हेंही योग्यच आहे. कारण, सर्व आश्रमाचा आधार व सर्वांना ग्राह्य अशा गृहस्थाश्रमामध्येंही हा प्रजा-रक्षणद्वारें नेहमीं तपाचरणच करितो आहे. तेव्हां फरक काय तो याला राजर्षि व त्यांना नुसतें ऋषि ह्मणावयाचें इतकाच. चारणमिथु-नांनीं या पुण्य श्लोकाचें स्तवन केलें, त्याचा शब्द आकाशांत सारखा दुमदुमतो आहे.'

त्याला दुसऱ्या ऋषिकुमारानें विचारिलें—'[illegible] इंद्रसखा दुष्यंत तो हाच?' 'होय होय.' 'समुद्र परिवेष्टित पृथ्वीच्या राज्याचा हा एक-टाच उपभोग घेतो यांत आश्चर्य नाहीं. कारण याचे प्रचंड भुजदंड नगराच्या महाद्वाराच्या अडसरासारखे आहेत. याचें अधिज्य धनुष्य किंवा इंद्राचें वज्रच दैत्यविजयसाधन होय, असें दैत्यांशीं कायमचें वैर बांधलेल्या सुरस्त्रिया समजतात.'

( हे दोन्ही श्लोक फार चांगले साधले आहेत. भाषा सरळ व साधी असून त्यांच्यांत प्रसाद-गुण विशेष आहे. ऋषिकुमारांकडे केवळ स्तुति-पाठकपणा न देतां त्यांची प्रौढी राखीत राजा-चेंही प्रौढपणें यथायोग्य गुणवर्णन केलेलें आहे. )

नंतर दोघांनींही पुढें होऊन 'राजा, तुझा विजय असो—' असा आशिर्वाद केला.

राजानें आसनावरून उठून दोघांनाही अभि-वादन केलें. त्यांनीं त्याला कांहीं फळें भेटी-दाखल दिलीं. तीं राजानें नमस्कारपूर्वक गृहण करून, 'काय आज्ञा!' ह्मणून नम्रपणें विचा-रितां, 'आपण येथें असल्याचें आश्रमवासी मंडळीला कळल्यावरून त्यांची आपणाला प्रा-र्थना आहे.' 'काय आज्ञा!' 'महर्षि कण्व येथें नसल्यामुळें, राक्षस आमच्या इष्टीमध्यें विघ्नें उत्पन्न करितात. तेव्हां येथें कांहीं दिवस सारथ्यासह राहून याला सनाथ करावें.'

'हा मजवर अनुग्रहच आहे.' हें ऐकून विदूषकानें, त्याला निमित्त हवें होतें तें हें आ-यतेंच सांपडलें असें पाहून एकीकडे ह्मटलें, 'राव, ही प्रार्थना यावेळीं पथ्यावरच आहे ह्मटलें.'

त्याला राजानें थोडेंसें हंसून तेवढ्यानेंच उत्तर दिल्यासारखें केलें. विदूषकाच्या भाष-णांतील मर्मितभाव तो समजला. नंतर तो

ह्मणाला, 'रैवतका, सारथ्याला ह्मणावें, धनुष्यबाणासह रथ तयार करून आण.'

( ऋषिकुमारांशीं राजाचें वर्तन व भाषण किती नम्र व प्रौढ आणि सभ्यपणाचें दाखविलेलें आहे. व त्यांचींहीं भाषणें राजाविषयीं योग्य आदरानें युक्त अशींच आहेत. या भाषणांत राजाच्या मनांत मुनिजनांविषयीं फाजील भीतीपासून उत्पन्न झालेला पोकळ आदर असल्याचें किंवा ऋषिकुमारांच्या मनांत आपण राजाहूनही श्रेष्ठ असल्याचें वाटून त्याच्याविषयीं यत्किंचित् तरी तिरस्काराची झांक असलेली सुद्धां दिसत नाहीं. यावरून कालिदासानें राजे व ऋषि यांची परस्पर योग्यता व संबंध अगदीं बरोबरीचा व योग्य आणि प्रौढपणाचा होता, निदान असावा, असें दाखविलें आहे. याच्यांत व भवभूतीनें महावीरचरितांत राजे व ऋषि यांच्या संबंधाचें चित्र रेखिलें आहे, त्यांत किती तरी फरक असलेला दिसतो. )

राजानें तावडतोब रथ तयार करून आणण्याला सांगितलें यावरून आपल्या कार्याकरितां हा इतका उत्सुक व दक्ष आहे असें पाहून ऋषिकुमारांनीं मोठ्या हर्षानें ह्मटलें, 'आपल्या पूर्वजांचें अनुकरण करणाऱ्या आपणाला हें योग्यच आहे. पौरव राजे आपन्न जनांला अभय देण्याच्या कामीं नेहमीं जसे दीक्षितच असतात.'

( ऋषिकुमारांच्या तोंडीं दाखला घातला आहे तो तरी त्यांच्या नेहमींच्या परिपाठांतला यज्ञयागसंबंधाचा आहे. )

नंतर राजानें त्यांना प्रणाम करीत, 'आपण पुढें व्हा, मीही पाठोपाठ आलोंच—' असें सांगितल्यावर ते त्याला आशीर्वाद करून गेले.

राजा—'कां माढव्या, शाकुंतलेला पाहण्याचें कुतूहल मनांत आहे!'

विदू०—'प्रथम किती तरी होतें. त्याचा जसा लोटच चालला होता. पण आतां या राक्षसांच्या वृत्तांतानें त्यांतील एक बिंदूसुद्धां बाकी राहिलेला नाहीं. तें पार वाहून गेलें.'

( येथें सहजांत विदूषकाला राक्षसाचें नुसतें नांव ऐकतांच आलेला भित्रेपणा व्यक्त केला आहे. )

राजा—'भिऊं नको! अरे, तूं माझ्याजवळच राहशील.'

विदूषक—'तर मग राक्षसांपासून माझें रक्षण झालेंच. मी त्यांना मुळींच भीत नाहीं.'

इतक्यांत देवडीवाल्यानें आंत येऊन विनंती केली. 'रथ तयार आहे. हुजूरच्या विजयप्रस्थानाची काय ती अपेक्षा. पण हा करभक राणीसाहेबांचा निरोप घेऊन नगराहून आला आहे.'

राजानें आदरानें ह्मटलें, 'आईसाहेबांनीं पाठविला आहे!'

( आईचे संबंधानें भाषण करण्यांत सहजांत राजानें आदर दाखविल्याचें वर्णन आहे. अशा बारीकसारीक गोष्टींवरून सुद्धां खऱ्या प्रासादिक कवीची पारख होते. व अशा गोष्टींनीं नायकालाही अधिक प्रौढी व थोरवी येते. )

दे. वा.—'होय.'

राजा—'अरे, त्याला आंत घेऊन ये.'

करभकानें देवडीवाल्याबरोबर आंत आल्यावर राजाचा जयजयकार करून ह्मटलें, 'आईसाहेबांनीं आज्ञा केली आहे. पुढें चार दिवसांनीं माझ्या उपवासाचें पारणें सोडावयाचें आहे, तेव्हां चिरंजीवानें अवश्य यावें.'

राजा—'इकडे तपस्व्यांचें कार्य, आणि वडिलांची आज्ञा ही अशी. दोन्हींचेंही उलंघन करितां येत नाहीं. इथें काय करावें!'

विदूषकानें थट्टेनें ह्मटलें, 'त्रिशंकूसारखा मध्येंच लोंबत रहा.'

( त्रिशंकु राजाला विश्वामित्रानें आपल्या तपस्सामर्थ्यानें स्वर्गीचें इंद्रपद दिलें. तो स्वर्गास चालला असतांना देव व ऋषि यांनीं त्याला अटकाव केला व विश्वामित्रानें त्याला खालीं येऊं दिलें नाहीं, तेव्हां तो मध्येंच लोंबत राहिला. व तेथेंच विश्वामित्रानें त्याच्याकरितां नवीन स्वर्ग उत्पन्न करून त्याची इंद्रपदीं स्थापना केली, अशी कथा आहे. )

राजा-' खरेंच मोठी पंचाईत पडली आहे.

' हीं दोन्हीं कामें दोन ठिकाणीं व्हावयाचीं, यामळें माझें मन द्विधा झालें आहे. पात्रांत मध्येंच खडक आल्यानें नदीचें पाणी दुभागून भिन्न दिशेला वाहूं लागतें तद्वत् माझी स्थिति झाली आहे.'

थोडा वेळ विचार करून तो पुनः ह्मणाला, ' हो, अरे, तुलाही आईसाहेबांनीं पुत्राप्रमाणें मानला आहे. तूंच परत जा. माझें मन तपस्विजनाच्या कार्यामुळें व्यग्र असल्याचें सांग आणि त्यांचें पुत्रकार्य तूंच आटप कसा.'

( राजानें ही केवळ कशी तरी तोडजोड काढली आहे. विदूषक असल्यानें कदाचित आपला इष्ट हेतु-शकुंतलाप्राप्ति-होणार नाहीं असेंही त्याच्या मनांत आलें असेल. )

यावर विदूषक ऐटीनें ह्मणाला, ' मी राक्षसांना भिणारा असें कांहीं नको समजूं.'

राजानें हंसत ह्मटलें, ' हें आपल्या ठिकाणीं संभवेल तरी? भलतेंच!'

विदूषकानें यावर आपल्या तऱ्हेवर ह्मटलें, ' राजाच्या धाकट्या भावासारखा मी जाईन हवा तर.'

राजा-' तपोवनालाही अडचण न होय असें केलें पाहिजे, तेव्हां बरोबरचे सर्व सैनिक तुझ्या बरोबरच परत पाठवून देतों.'

' तर मग अस्मादिक युवराज झाले!'

राजानें मनांत विचार केला. ' हा ब्राह्मण बेटा धूर्त, लबाड. कदाचित् आमची शकुंतलाविषयक इच्छा अंतःपुरांतील मंडळीला सांगेल.— बरें, त्याला असें सांगावें.' नंतर विदूषकाला हातीं धरून तो मोठ्यानें ह्मणाला, ' मित्रा, मी आश्रमांत जाणार तो ऋषींच्या गौरवाकरितां. ह्या तापसकन्येविषयीं माझ्या मनांत कांहीं अभिलाष नाहीं बरें. पहा,

' मी जें एवढा वेळ शकुंतलेबद्दल बोललों तें सारें थट्टेचें. त्याच्यांत कांहीं जीव नाहीं.* कोठें आह्मी आणि कोठें हे जंगलांत मृगशावाबरोबर वाढलेले आणि मन्मथविमुख लोक! मजसारख्याला असल्या या जंगली मंडळीच्या सहवासापासून कसचें सुख किंवा समाधान होणार?'

असें बोलत दोघेही निघून गेले.

( याच्यांत रेखलेलें विदूषकाचें चित्र अगदीं भाबडेपणाचेंही नाहीं किंवा फार लुच्चेगिरीचेंही नाहीं. सारें वर्णन बेताचें व साहजिक असून यांत हास्यरस उत्पन्न व्हावयाचा तो वाच्यापेक्षां व्यंग्यार्थामुळेंच अधिक होतो. )

हा अंकही नाटकप्रयोगदृष्ट्या उत्तम साधला आहे. भाषासरणी साधी व सरळ आहे. प्रवेशवैचित्र्यही बरेंच आहे. केवळ मूळकथेचें अनुसंधान धरूनच हा अंक लिहिलेला नाहीं. विदूषकाच्या प्रारंभींच्या भाषणावरून शिकारीपासून होणारा त्रास व्यक्त होतो, तसाच सेनापतीच्या भाषणावरून त्याच्यापासून व्यक्तिमात्राला होणारे फायदेही व्यक्त होतात. शकुंतलेची गांठ पडल्यानें राजा लवकर नगराला परत जाणार नाहीं, व त्यामुळें आपणाला त्रास होईल, सबब त्याची तिच्याविषयींची आस्था ह्मणून पाडावी, ह्मणून विदूषकानें प्रारंभीं प्रारंभीं

* याचा उल्लेख पुढें सहाव्या अंकांत आला आहे.

यत्न केला, पण पुढें तो तिच्याविषयींचें वर्णन ऐकून ती राजाला प्राप्त होण्याची इच्छा करूं लागला; व राजाही त्याला या कामीं मदतीला घेऊन जाण्यास तयार झाला. पुढें राक्षसांचा वृत्तांत ऐकल्यापासून विदूषकाचें अवसान सरलें. इतक्यांत नगरांतून राजाला त्याच्या मातोश्रीकडून परत येण्याला निमंत्रण आलें. तेव्हां विदूषकाला आपल्या ऐवजीं परत पाठवून आपण आश्रमांत जाऊन ऋषींच्या यज्ञाचें रक्षण व सावल्यास शकुंतलेसंबंधें खटपट करण्याला राजाला सवड सांपडली.

राजा व विदूषक यांचें संभाषण व तद्विषयक प्रसंग फार सुरेख साधले आहेत.

---

## अंक तिसरा.

मागील दोन्ही अंकांतल्याप्रमाणें याही अंकांतील कथा कण्वाच्या आश्रमांत व आसपासच्या प्रदेशांतच घडलेली आहे. राजानें सारें सैन्य विदूषकाबरोबर नगराला परत पाठविलें व तो स्वतः आश्रमांत यज्ञरक्षणासाठीं राहिला. त्याच्या नुसत्या सांनिध्यानेंच सर्व विघ्नें दूर पळालीं. इकडे त्याच्या निजध्यासानें शकुंतला अस्वस्थ झाली होती. तिला चैन नव्हतें. राजाचीही तिच्यासंबंधानें बहुतेक तशीच अवस्था झाली होती.

राजा आश्रमांत येऊन पोहोंचल्याबरोबर आपलीं सर्व विघ्नें पार नाहींशीं झालीं, असें वर्णन करीत एक मुनिशिष्य स्वतःशीं ह्मणाला, 'वाः, राजा दुष्यंत काय तरी पराक्रमी ! त्यानें आश्रमांत प्रवेश मात्र केला, तोंच आमचीं सारीं कर्में कशीं अगदीं निरुपद्रव झालीं आहेत.

बाणसंधानाची गोष्ट दूरच—केवळ धनुष्याच्या जणों हुंकारच कीं काय अशा त्याच्या दोरीच्या टणत्कारानेंच जणों सर्व विघ्नें उडवून दिलीं.'

याप्रमाणें राजाच्या येण्यापासून आश्रमांतील तापसांचें कसें उत्तम काम झालें त्याचें वर्णन व तद्द्वारा राजाच्या माहात्म्याची साहाजिक प्रशंसा करून तो पुढें ह्मणाला, 'हो, हे वेदीवर पसरण्याचे दर्भ ऋत्विजांना नेऊन देतों.'

नंतर थोडेंसें फिरून पुढें पाहून वर तोंड करीत तो पुनः ह्मणाला, 'प्रियंवदे, ही वाळ्याची उटी नी हीं—मृणालें कमलांचीं पानें—कोणाकरितां चाललीं आहेत ?— काय ह्मणतेस ? उन्हाच्या तिरमिरीनें शकुंतलेची प्रकृति फार अस्वस्थ झाली आहे, तिच्याकरितां ! जा—जा—लौकर घेऊन जा. अगे, ती कुलपति कण्वाची जीव का प्राण. मीही तिच्याकरितां वैतानिक शांत्युदक गौतमीच्या हातीं पाठवितों.' असें ह्मणून तो निघून गेला.

( या भाषणावरून राजा इष्टिविघ्ननिवारणाकरितां गेला त्याचा कसा काय उपयोग झाला तें, व तसेंच शकुंतलेची अवस्था कशी काय झाली होती, व ती उन्हाच्या बाधेनें झाली असें भासवून तिच्याकरितां तिच्या सख्यांनीं काय काय उपाय चालविले होते, व शेवटीं पुढें राजा व शकुंतला यांच्या समागमाच्या ऐन वेळीं गौतमी कशा कारणानें आली, याचा खुलासा केला आहे. यामुळें पुढील कथेचें अनुसंधान चांगलें जुळलें आहे. भाषण थोडक्यांत व चटकदार आहे. यांत पुढील कथेची केवळ सूचना आहे. भवभूतीच्याप्रमाणें बाल्हाळिक वर्णन दिलेलें नाहीं. )

नंतर राजा मदनपीडित व त्रस्त होत्साता फिरत येतां येतां उसासा टाकीत ह्मणाला—

'ती परतंत्र असल्यानें मनांत असूनही मला अनुकूल होण्याला समर्थ नाहीं. व आपण

पाहणें करावें, किंवा करण्याची सत्ता त्याची तर तपाचें बल कसें प्रखर असतें, हें मला माहित आहे. मी तिच्याकडून मन फिरवावें म्हणून यत्न करितों, तरी तें फिरत नाहीं. विशेष मदनबाधा झाल्यासारखें दाखवून तो म्हणाला, 'भगवंता कुसुमायुधा मदना, तूं आणि चंद्र यांच्यावर कामिजन मोठा विश्वास ठेवितात. पण तुह्मी दोघेही त्यांना फार फसवितां. कारण,

'तुझें कुसुमशरत्व व चंद्राचें शीतरश्मित्व दोन्ही मजसारख्याच्याठिकाणीं अयथार्थ होत. कारण, तो आपल्या हिमगर्भ किरणांच्याद्वारें अग्नीचा वर्षाव करितो व तूंही आपले कुसुम बाण जणों वज्रासारखे तीव्र करितोस.'

(कुसुमबाण व चंद्रकिरण हे मदनाचे मोठे सहायकारी, प्रियपात्र सन्निध असतांना अत्यंत सुखकर होतात. पण तेच त्याच्या विरहप्रसंगीं उलटपरिणामी होतात. चंद्रकिरणांनीं शीतलता वाटण्याच्याऐवजीं प्रखर दाह वाटूं लागतो. हें सर्व मनाच्या स्थितीवर अवलंबून आहे.)

(हें राजाचें सारें भाषण फार चांगलें, त्याच्या त्या वेळच्या स्थितीला अनुरूप असें, आहे.)

'यज्ञांतील सभासदांनीं मला यज्ञरक्षणाच्या कामापासून थोडासा विसावा घेण्यास परवानगी दिली आहे. तेव्हां श्रमपरिहार होऊन मनाला बरें वाटेल असें कोठें जावें बरें!'

पुनः उसासा टाकून तो ह्मणाला, 'प्रियेच्या दर्शनाशिवाय दुसऱ्या कशानें समाधान होणार! तेव्हां तिचाच शोध करावा.

'ही रखरखीत उन्हाची वेळ. शकुंतला सख्यांसह बहुधा लतावल्यांनीं युक्त अशा मालिनीच्या तीरावर घालवीत असते. तेव्हां तिकडेच जावें.'

थोडासा पुढें जाऊन आनंदानेंसा तो पुनः ह्मणाला, 'वाः, या प्रदेशांत वाऱ्याची काय बहार आहे!

'हा वारा कमळांच्या सुगंधानें सुरभि, व मालिनीच्या तरंगांतील जलकणांनी थंड झालेला आहे. माझ्या मदनतप्त शरिराला आलिंगन करण्यास योग्य असा त्याचा स्पर्श किती तरी सुखकर वाटतो!

'ती या वेताच्या आड असलेल्या लतामंडपांत, जवळच असेल.'

'अरे, हीं या लतामंडपाच्या दारापुढील पांढऱ्याशा वाळूमध्यें नुकतींच उमटलेली पावलें दिसताहेत. हीं पावलें पुढच्या अंगीं वर उचललेलीं व जघनभारामुळें मागें—टाचेकडे—खोल गेलेली आहेत. या मंडपांच्या आडून पाहावें तर खरें.'

पुनः हर्षानें ह्मणाला, 'ओ हो, माझ्या नेत्रांचें पारणें फिटलें. ही मनोरथप्रियतमा या फरसावर पसरलेल्या कुसुमास्तरणावर निजलेली असून, तिच्या सख्याही जवळच आहेत. बरें यांच्या गुज गोष्टी तर ऐकूं!' असें ह्मणून तो आड ऐकत उभा राहिला.

(राजा इष्टिसंरक्षणाकरितां आश्रमांत जाऊन राहिला होता. आणि त्याला त्यायोगानें सहजच शकुंतलेच्या पुनर्दर्शनाची व साधल्यास प्राप्तीची उमेद होती. त्याच्या नुसत्या संनिधानानेंच यज्ञांतील सर्व विघ्नें नाहींशीं झालीं. व यामुळें आश्रमवासी तापसांना सहजच हर्ष झाला. त्यांचें व राजाच्या अलौकिक प्रभावानें तापसाच्या भाषणांत वर्णन आलेंच आहे. शकुंतला बाह्यतः उन्हाची तिरीप लागल्यानें अस्वस्थशरीर होती व तिच्या सख्या तिला शीतोपचार करण्याच्या खटपटींत होत्या.

इकडे राजाच्या मनांत सारखी शकुंतलासमागमाची प्रबल इच्छा होती. यज्ञरक्षणांतून फुरसत मिळतांच तो यांच खटपटींत व विचारांत

असे. मदनविकारामुळें त्याच्याही मनाची स्थिति त्याला तापद झाली होती. दुपारच्या फुरसुदीच्या वेळीं मनाची करमणूक करण्याकरितां व साधल्यास शकुंतलेची गांठ घेण्याकारतां—निदान तिचें दर्शन मिळविण्याकरितां—तो तिच्या नेहमींच्या विश्रांतीच्या स्थळीं मालिनीनदीच्या तीरावरील लताकुंजाकडे गेला. वाटेंत नदीच्या पात्रावरून मंद, शीतल व कमलगंधयुक्त वायूचा त्याच्या अंगाला स्पर्श झाला, यामुळें त्याला फार समाधान वाटलें. त्या संबंधाचें केलेलें वर्णन अगदीं यथार्थ व मनोरम आहे.

शकुंतला नुकतीच नदीच्या कांठच्या वाळवंटांतून एका लतामंडपांत गेली होती. तिचीं पावलें वाळूंत उमटलीं होतीं. वाळूंत चालतांना सर्व शरीराचा भार टांचेवर आलेला असतो ह्मणून सहजच टांचा खोल जातात. व पावलांचा पुढील भाग कांहींसा वर उमटलेला असतो. तरी याचें कारण आपल्या प्रियेच्या जघनाचें गौरवच होय, जघनगौरव असणें हा स्त्रियांमध्यें एक सौंदर्यद्योतक गुण मानला आहे, असें राजाच्या तोंडून वदविलें आहे. यांतही कवीनें मार्गें राजाच्या तोंडीं, 'सर्व तात्किल मत्परायणमहो कामी स्वतां पश्यति' असें वदविलें आहे, त्याचें मनोरमपणानें पुष्टीकरण केलें आहे.

सामान्य गोष्टीला महत्व देऊन ती विशिष्टशी व आपल्यास अनुकूल किंवा प्रतिकूलशी करून दाखविणें व तीही साहजिक रीतीनें, याच्यांतही कवीचें खरें चातुर्य व मार्मिकपणा दिसून येतो.

राजानें वर्णन केल्याप्रमाणें शकुंतला त्या लतामंडपांत कुसुमास्तरणावर पडलेली होती. तिच्या सख्यांनीं तिला स्नेहानें वारा घालीत घालीत ह्मटलें, 'गडे शकुंतले, तुला या कमलाच्या पानाच्या वाऱ्यानें सुख वाटतें ना?'

त्यांना तिनें कसें तरी, 'मला तुह्मीं वारा का घालतां आहां?' असें ह्मटलें.

( हा शकुंतलेचा प्रश्न किती तरी हेतुगर्भ आहे. सख्यांनीं इतके वेळ खटपट करून शकुंतलेच्या शरीराला होणारा ताप दूर करण्याचा प्रयत्न चालविला होता, व त्या तिला कमलपत्रानें वारा घालीत होत्या. कदाचित् वाऱ्याच्या झुळकीमुळें किंवा खरोखर ग्लानीमुळें किंवा चित्त दुसरीकडे गुंतलें असल्यानें या वेळीं शकुंतला स्वस्थशी दिसली. ती आपण वारा घातल्यामुळेंच असावी असें समजून, त्याबद्दल समाधान मानून त्या सख्यांनीं तिला हा प्रश्न विचारिला. त्याचें शकुंतलेनें उत्तर दिलें त्यावरून, त्या तिला वारा घालताहेत हें देखील तिच्या गांवीं नाहीं, तेव्हां त्याच्यापासून सुख वाटण्याचें नांव कोठलें? त्यावरून आपले सर्व उपाय व्यर्थ झाले असून ही देहभानावर सुद्धां नाहीं इतकी अस्वस्थ आहे, असें त्यांच्या लक्षांत आलें, व त्यामुळें त्या खेदानें, काळजीनें व साशंकपणेंशा एकमेकींच्या तोंडाकडे पाहूं लागल्या. यावेळचें त्या तिघींचें चित्र पाहिजे तसें काढलें गेलें तर फारच मनोरम होईल. असल्या बारीक पण मार्मिक गोष्टींकडे सहजपणें लक्ष गेलेलें ज्या कवीच्या काव्यांत दिसून येईल तोच खरा मार्मिक व प्रासादिक. )

हें त्यांचें भाषण ऐकून राजा ह्मणाला, 'शकुंतलेची प्रकृति फारच अस्वस्थ दिसते.' थोडासा विचार केल्यासारखें करून तो ह्मणाला, 'हा कां उन्हाचा दोष, कां माझ्या मनांत वाटतें तशांतला प्रकार?' पुनः उत्सुकतेनें नीटपणें पाहून तो ह्मणाला, 'अथवा संदेह नकोच.

हें प्रियेचें शरीर पीडित आहे, तरी तें किती तरी रमणीय वाटतें. स्तनावर वाळ्याचा लेप लावलेला; मृणालाचें एकच वलय—तेंही शुष्क

व लिहिलें झालेलें आहे. मदन आणि प्रखर उन्ह या दोहोंचा ताप सारखाच असतो. तरी ग्रीष्म ऋतूंतील उष्ण तापामुळें तरुण स्त्रियांच्या शरीरावर असा सौंदर्यजनक परिणाम घडत नाहीं. तो मदनबाधेचाच परिणाम खरा.’

( येथें वाळ्याची उटी स्तनावर लावल्याचें वर्णन आहे. साऱ्या उरावर—हृदयावर—नव्हे हें तरी हेतुगर्भ वाटतें. कारण तरुणीचे स्तन उन्हाळ्यांत थंड व शीतकाळीं उष्ण असल्याचें कामशास्त्रांत वर्णन आहे. व तें वस्तुतःही अवास्तव नाहीं. यावेळीं उष्णकाळ असूनही तिच्या स्तनाचा दाह होत होता व तो कमी करण्याकरितांच वाळ्याची उटी लावलेली होती. यावरून शकुंतलेला पीडा होत होती ती कामपीडाच, ग्रीष्मपीडा नव्हे, असा राजानें निश्चय केला आहे. उन्हाची तिरीप व मदनबाधा यांचे परिणाम सकृद्दर्शनीं सारखेच असतात, तरी त्यांतील फरक लक्ष देऊन पाहणाऱ्याच्या तेव्हांच लक्षांत येतो. आणि तो राजासारख्या कामशास्त्रचतुर पुरुषाच्या लक्षांत तत्काळ आलाही. )

थोड्या वेळानें प्रियंवदा हळूच म्हणाली, ‘अनसूये, राजाला पाहिल्या वेळेपासून ही अस्वस्थ झाली आहे व हिच्या मनाची चलबिचल झाली आहे. ती त्याच्याविषयीं हिच्या मनांत साभिलाष प्रेम उत्पन्न झाल्यामुळें तर नसेल ?’

‘गडे, माझ्या सुद्धां मनांत हीच शंका आहे. बरें, हिला विचारतेंच तर.’—नंतर ती मोठ्यानें शकुंतलेला म्हणाली, ‘गडे, तुला कांहीं विचारूं म्हणतें. तुला भारीच ताप होतो आहे.’

हें ऐकून शकुंतला कोपरावर टेकून कांहींशी वर उठून पडल्या पडल्याच म्हणाली,—‘गडे, काय म्हणतेस ?’

तिनें म्हटलें—‘गडे शकुंतले, आम्ही बाई मदनवृत्तांताविषयीं अगदीं परक्या—त्याचा आम्हांस कांहींच अनुभव नाहीं. तरी इतिहासग्रंथांमध्यें मदनबाधापीडितांच्या अवस्थेचें वर्णन ऐकिलें आहे, तशांतलीच तुझी स्थिति दिसते. सांग तर, हा तुझा संताप कशामुळें ? कोणत्याही विकाराचें खरें निदान झाल्यावांचून त्याच्या प्रतिकाराचा आरंभ होत नाहीं.’

हें अनसूयेचें भाषण ऐकून राजा म्हणाला, ‘मला तर्क वाटला तोच अनसूयेच्याही मनांत आला’—( मी केवळ आपल्याच अभिप्रायाप्रमाणें हें मनांत आणिलें असें नाहीं. तिचें प्रेम मजवर आहे असें माझ्या मनाला वाटतें, त्यामुळेंच मी हा असा तर्क केला असें नव्हे. अनसूयेलाही तसेंच वाटलें आहे. )

शकुंतलेनें मनांत विचार केला, ‘मला फारच प्रखर बाधा होते आहे. तथापि या वेळीं यांना त्याबद्दल सांगण्याचेंही माझ्यानें होत नाहीं’—( असा त्रास होतो आहे, तरी माझ्यानें यांना मोकळेपणीं सारें सांगवत नाहीं. कितीही स्नेह असला तरी प्रथम प्रथम असल्या गोष्टी आपल्या सख्यांना सुद्धां सांगवत नाहींत. )

प्रियंवदाः—‘सखे शकुंतले, ही खरें म्हणते. आपल्या हृद्रोगाची उपेक्षा कां करितेस ? दिवसेंदिवस तुझें शरीर क्षीण होत आहे. केवळ लावण्याची झाक मात्र तुला सोडीत नाहीं.’ ( अनंगतापानें दहन होणाऱ्या अभिनव तरुणीच्या शरीराची ही अवस्था नेहमी दिसून येते. तोंडावर किंबहुना सर्व शरीरावर टवटवी दिसते, पण आंतून शरीर सुकत असतें. प्रियसमागमरूपी जीवन प्राप्त झालें तर या सुकत चाललेल्या वृक्षाला पुनः तेव्हांच जोम येतो. नाहीं तर क्षय ! )

राजाः—‘प्रियंवदा बोलली तें अगदीं खोटें

नाहीं. गाल बसल्यानें व सुकल्यानें इचा चेहरा अधिकच फिकट झाला आहे—उरप्रदेश स्तनांनीं कठिणपणा सोडलेला—मध्यभाग अधिकच तनुता आलेला—स्कंधदेश किती तरी गळलेला—सर्वांगावर पांडुरता आलेली—अशी ही पतझडीचा वारा लागलेल्या माधवी लतेसारखी—मदन बाधा झालेली—दिसते. तिला पाहून वाईट वाटतें तरी अशाही स्थितींत ती रमणीयच दिसते आहे.'

( अशा तऱ्हेनें शोचनीय तरी पण प्रेक्षणीय अवस्था प्राप्त झालेल्या तरुणी हल्लीं देखील आढळत नाहींत असें नाहीं. मात्र त्यांच्यामध्यें Ethereal अपार्थिव तेज व कांती मात्र क्वचितच दिसून येते.

थंडीच्या दिवसांत गार वारा सुटतो त्याच्या योगानें बहुतेक झाडांचीं पानें सुकून गळतात. त्याला पतझडीचा वारा ह्मणतात. )

शकुंतला:—' सखे, तुह्मांला नाहीं तर दुसऱ्या कोणाला सांगणार ? पण त्यापासून तुह्मांला आयास मात्र पडतील.'

तिला दोघींनींही ह्मटलें, ' ह्मणूनच आमचा तरी आग्रह. मैत्रिणीबरोबर वांटलें गेलेलें दुःख तितकें सोसण्याला बरें पडतें. '

( हें वाक्य कांहीं ह्मणीसारखें चांगलें साधलें आहे.)

राजानें आपणाशीं ह्मटलें, ' सख्यांनीं विचारल्यावरून ही आतां आपल्या आधीचें कारण सांगेलच. आणि तें काय असणार हेंही तिनें बागेंतून परत जातांना वरचेवर आवडीनें मजकडे मुरडून पाहिलें त्यावरून मी समजतों. तरी पण न जाणों मला हवें व वाटतें तसेंच सांगते कीं भलतेंच, याबद्दल मला शंका व भीतिही वाटते. '

शकुंतला—' तो तपोवनाचें रक्षण करणारा राजर्षि माझ्या दृष्टीस पडला तेव्हांपासून माझी ही अशी अवस्था झाली आहे. '

( शकुंतलेनें आपल्या सख्यांच्या आग्रहाव हें आपल्या हृत्तापाचें अंतस्थ कारण मोकळेपणीं सांगितलें आहे. सामान्यतः अशा तऱ्हेनें असलें कारण तरुण मुली स्वमुखानें सहसा कबूल करीत नाहींत. पण अगदीं दुःसह स्थिति झाल्यामुळें व सख्यांनीं समदुःखी होऊन तिला साहाय्य करण्याच्या तऱ्हेवर विचारिल्यावरूनच तिनें असें स्पष्टपणें सांगितलें आहे. यांत विशेष वावगेपणा आहे असें नाहीं. पण व्यवहारांत तो थोडासा मानला जातो. )

हें शकुंतलेचें उत्तर तिनें आपल्याला परोक्ष समजून व सख्यांना सांगितलेलें रहस्यांत ऐकून राजाला अर्थातच मोठा आनंद झाला व तो ह्मणाला, ' ऐकावयाला हवें तेंच ऐकिलें.

' भर उन्हाळ्याच्या तापकारक दिवसांत तिसरे प्रहरापासून अभ्रें येऊन थंडशी सावली पडल्यानें प्राणिमात्राला आनंद होतो. मला संताप देण्याला कारण मदनच, आणि हल्लीं, प्रियेलाही ताप होण्याचें कारण तोच. यामुळें तो माझा संताप नाहींसा करितो आहे. '

शकुंतला—' तेव्हां तुह्मांला योग्य वाटलें तर तो राजर्षि मजवर कृपा करील असें करा. नाहीं तर, माझ्या जीवाची आशा सोडा आणि तिलांजलि द्या. '

( हें फारच निर्वाणीचें व काकुळतीचें भाषण मित शब्दांनीं केलेलें आहे. )

राजा—' संशय तोडणारें हें भाषण ! '

प्रियंवदेनें हळूच ह्मटलें, ' अनसूये, इच्या मनोरथाचा पल्ला फार दूर पोहोंचला आहे. विलंब खपण्याजोगा नाहीं. इचें मन बसलें आहे तो तरी पौरश्रेष्ठ. तेव्हां इचें अभिनंदनच करण्याजोगें आहे. '

( प्रियंवदेनें या वेळीं शाकुंतलेच्या मनाप्रमाणें करणें अवश्य असल्याचीं दोन कारण दिलीं आहेत. एकतर इचा मनोरथ व अभिलाष विकोपाला गेलेला. त्याची पूर्तता करण्याला विलंब करण्याजोगा नाहीं. भलतेंच कांहीं व्हावयाचें. दुसरें इचें मन यःकश्चित् किंवा अपात्र पुरुषावर बसलें असतें तर शंका घेण्याला जागा. पण, तिचें मन बसलें तें पौरवललामभूत राजर्षीवर.तेव्हां याच्या समागमाविषयीं लवकर यत्न करणें अवश्य असून त्यांत हरकतही नाहीं.)

तिला अनसूयेनेंही अनुमोदन पडलें. तेव्हां प्रियंवदा ह्मणाली, 'सखे, तुझें मन बसलें, तें तरी योग्यच वरावर. पहा, नदी सागराला सोडून दुसऱ्या कोणाला मिळणार? आणि फुललेली मोगरीची वेल आम्रवृक्षावांचून दुसरा कोण झेलणार! तुह्मी परस्पर अनुरूप व योग्य आहां.'

हीं त्यांचीं भाषणें ऐकून राजानें समाधानानें ह्मटलें, 'विशाखाच्या चांदण्या चंद्रलेखेला अनुसरल्या यांत नवल काय!'

( शुक्लपक्षाच्या आरंभीं चंद्राची कोर संध्य कालीं दिसत असतांना विशाखा नक्षत्रांतील दोन बऱ्याच मोठ्या चांदण्या त्या चंद्रकोरेच्या जवळच--लागलेल्याशा--दिसत असल्या ह्मणजे तो देखावा मोठा बहारीचा दिसत असतो. त्याला अनुसरून हें राजाचें भाषण आहे. आणि रामायणांतही "विशाखयोर्मध्यगतः पूर्णचंद्र इवाबभौ" ( युद्धकांड सर्ग ७६ श्लोक १९ ) असें वर्णन आहे. यांत चंद्रलेखा शकुंतला, व अनसूया आणि प्रियंवदा विशाखाच्या दोन्ही चांदण्या, असा भाव आहे. )

अनसूया--'पण आपल्या सखीचा मनोरथ ताबडतोब आणि गुप्तपणें संपादितां येईल असा कोणचा उपाय?'

प्रियंवदा--'गुप्तपणाचीच काय ती अडचण. लवकर वाटेल तेव्हां करितां येईल.'

अनसूया--'ते कसें काय?'

प्रियंवदा--'हें पहा, तो राजर्षि इला विशेष प्रेमानें पहात असतो, व इच्या अभिलाषामुळें रात्री जागरणें झाल्यानें तो आलीकडे कृश झालेलासा दिसतो.'

त्याचेंही इच्यावर प्रेम जडलेलें आहे, व तिच्या प्राप्तीविषयीं तो सचिंत असल्यानें त्याला जागरणें घडतात व त्यामुळें तो कृश झालेला दिसतो.

हें ऐकून राजानें आपल्या शरीराकडे पहातसें ह्मटलें, 'अरे, खरेंच! ही ह्मणते तशीच माझी अवस्था झालेली आहे. हें माझें दंडावर असावयाचें जडाऊ वलय रोज रात्रीं हात उशाशीं घेऊन तळमळत असतांना उष्ण अश्रु सारखे त्याच्यावर पडल्यामुळें तें मलिन व विवर्ण झालें आहे; आणि धनुष्याच्या दोरीनें पडलेल्या घट्ट्यांपर्यंत पोहोंचून वरचेवर खालीं गळतें, तें मी सारखें मागें सारीत असतों.'

( आश्रमांत इष्टिविघ्ननिरसनार्थ राहिल्यापासून राजा शकुंतलेविषयीं साभिलाष होऊन जसा झुरणीला लागला होता. दिवस कसा तरी इतर व्यवहारांत निघून जाई, पण रात्रीं तो याच संबंधीं विचार करीत बिछान्यावर तळमळत लोळत असे. उशाला दुसरें असूनही बहुधा तो आपला हात--डावा हात--घेत असे. यावेळीं त्यानें आश्रमांत सौम्य वृत्तीनें असावें ह्मणून, आणि पुढें मदनविव्हलपणामुळें इतर आभरणें परिधान करण्याचा कंटाळा आल्यामुळें, नुसतें एक रत्नखचित सोन्याचें कडें डाव्या हातांत ठेवलेलें होतें. हात उशाशीं असतांना मनाला मदनताप झाल्यानें डोळ्यांतून अश्रु गळत ते त्या मणिवलयावर सारखे पडत.

त्यामुळें मणि विवर्ण व मलिन झाले होते. सारखीं जागरणें पडल्यानें व प्रेमविषयक दुःखानें त्याचें सारें शरीर व त्याबरोबर मुख कृश झाला होता. त्यामुळें करचेवर मणिवलय कोपरापर्यंत गळून येई. तें तो सारखें वर सारीत असे.

हेंही वर्णन मोठें सरस आहे. मदनबाधेनें राजा कृश होत चालल्याचें प्रियंवदेच्या लक्षांत आलें होतें. पण त्याला स्वतःच्या शरीराचें भान नसल्यानें त्याचें तिकडे लक्षच गेलें नव्हतें. हल्लीं सहज प्रियंवदेनें त्याचा निर्देश केला तेव्हां आपली स्थिति राजाच्या तेव्हांच लक्षांत आली. त्यानें आपल्या कृशपणाचें वर्णन केलें आहे तें तरी सर्वथा त्याच्या पौरुषाला साजे असेंच आहे. श्लोकांची रचना व त्यांतील व्यंग्य आणि वाच्य अर्थ सारेच अप्रतिम आहेत. )

प्रियंवदेनें येथवर आपल्याशीं विचार करून म्हटलें, 'गडे, तूं त्याला मदनलेख लिही. देवतांचा प्रसाद म्हणून मी त्याला फुलें नेऊन देईन. त्याच्यांत तो चांगला झांकून ठेवून मी त्याच्या हातीं पोहोंचवीन.'

प्रियंवदा विशेष चतुर असल्यानें तिनें हा उत्तम उपाय शोधून काढिला. तो अनसूयेला आवडला. तरी तिनें यावर, 'शकुंतला काय म्हणते?' असें विचारिल्यावरून तिनें उत्तर दिलें, 'तुमच्या विचारांत मी शंका काय काढणार?' हें ऐकून प्रियंवदेनें तिला मनांतील भाव प्रगट होई असें सुरेखसें पद तयार करण्यास सांगितलें. शकुंतला—'बरें, मी विचार करून पाहतें. पण मी मदनलेख लिहून पाठवूनही माझा अंगीकार न होतां उलट तिरस्कार होईल की काय, म्हणून माझें मन कचरतें.'

हें भाषण शकुंतलेच्या पुढील प्रत्यादेशाचें सूचक समजतां येईल.

हें तिनें सख्यांशीं साशंकपणासंबंधाचें भाषण ऐकून राजानें हर्षानें म्हटलें, 'हे भीरु, ज्याच्यापासून धिक्कार होईल अशी तुला शंका, तो हा मी तुझ्या संगमाविषयीं उत्सुक उभा आहें. श्री—संपदे—ची प्रार्थना करणाऱ्याला ती कदाचित् मिळेल न मिळेल; पण संपदेला हवा तो न मिळेल असें कसें होईल?'

हाही श्लोक उत्तमांतला आहे.

तिला दोघींनींही म्हटलें, 'अगे, तूं आपल्या गुणांचा बळेंच अवमान करितेस. शरीराला अप्रतिम सुख देणारें शरत्कालांतील चांदणें आड वस्त्र धरून कोण वारील?'—तूं शरज्ज्योत्स्नेसारखी सुखकर, तुझा तिरस्कार कोण करील? ही त्यांनीं केलेली आपली स्तुति ऐकून शकुंतला थोडेंसें हंसत समाधानानें म्हणाली, 'बरें बाई, तुम्ही म्हणतां तसेंच,' असें म्हणून ती उठून बसून विचार करूं लागली.

तिचें त्या वेळचें विलक्षण मोहक रूप पाहून राजा म्हणाला, 'या वेळीं प्रियेकडे पहात असतांना माझ्या पापण्या हालण्याचें सुद्धां बंद झालें आहे, हें योग्यच आहे. कारण मजला उद्देशून प्रेमपत्र लिहिण्याची तिनें मनांत योजना चालविली आहे. याजबद्दल विचार करितांना तिची एक भ्रुकुटी वर चढलेली असून तिच्या गालांवर रोमांच आले आहेत. त्यावरून तिचें मजवरील प्रेम व्यक्त होत आहे.'

( मनुष्य आतुरतेनें विचार करीत असला म्हणजे त्याची जी चर्या होते त्याचें हें मार्मिक वर्णन आहे. )

शकुंतला—'सखी, पदाची रचना तर जुळविली, पण इथें लिहिण्याचें सामान कांहीं नाहीं.'

तिला चतुर प्रियंवदेनें तत्काल उत्तर दिलें, 'अगे, हें पोपटाच्या पोटाप्रमाणें तान्हें व कोवळें पान, याच्यावर नखांनीं कोरून लिही.' ( त्रसा

लेख तसेंच हें लिहिण्याचें साधनही उत्तम आहे. )

त्याप्रमाणें लेख लिहून तयार करून शकुंतला म्हणाली, ' अर्थ नीट सुसंगत आहे किंवा नाहीं, ऐका तर.' त्यांनीं वाच म्हटल्यावर शकुंतलेनें पुढील अर्थाचें पद्य लिहिलेलें वाचून दाखविलें. ' मजविषयीं तुझ्या मनांत कितपत प्रेम आहे व त्यामुळें तुझ्या हृदयाची कशी काय स्थिति झाली आहे तें मला माहित नाहीं. पण मला मात्र मदन तुजविषयक प्रेमामुळें सारखा दिवसरात्र ताप देतो आहे. तुझा समागम केव्हां होईल असें मला झालें आहे.'

( शकुंतलेनें आपल्या स्थितीचें मोकळेपणीं वर्णन केलें आहे. व आपलें प्रेम बसलें असल्याचें उघडपणें राजाला लिहून पाठविलें आहे. तात्त्विक दृष्टिनें पाहतां तिनें असें करण्यांत कांहीं हरकत नाहीं. पण सामान्य व्यवहारांत अशा तऱ्हेनें स्त्रीनें प्रथम स्वतःच आपलें प्रेम इतक्या उत्तान रीतीनें व्यक्त करणें गौण मानलें जातें. व प्रौढविवाह आणि तोही बहुतेक स्वयंवरासारखा आजकाल जारी असलेल्या पाश्चिमात्य सुधारलेल्या लोकांतही अद्यापि असें करणें स्त्रियांना गौणच समजतात. कालिदासानें हा प्रसंग मोठ्या खुबीदारीनें अनिर्वाह पक्ष म्हणूनच आणिला असून त्याला साधन—कमलपत्र—ही तसेंच नाजुक व क्षणिक राहणारें दिलें आहे. बाकी, यावरून स्त्रियांनीं असें करणें गैर आहे असेंच कालिदासाला वाटत होतें, असें मात्र म्हणतां येत नाहीं. )

हें पद्य शकुंतलेनें सख्यांना वाचून दाखविलें, तेव्हां आतां कांहींच शंका राहिली नाहीं असें पाहून राजा एकदम मोठ्या आनंदानें त्यांच्या पुढें गेला आणि वरील पद्याचें जणों उत्तरच देत म्हणालाः—

' हे तनुगात्रि, मदन तुला नुसता तापच देतो, पण मला तो सारखा दिवस रात्र जाळतो आहे. सूर्यापासून कमलिनीला केवळ त्रासच होतो, पण चंद्राचा तर त्याच्यामुळें प्रास होऊन जातो. आपण उभयतां चंद्र व कमलिनीसारखे. तुला मदनरूपी सूर्यापासून ताप होतो हें तर खरेंच, पण, त्याच्यापासून माझा जणों ग्रास होतो. तेव्हां माझी स्थिति तुजपेक्षां अधिक दुःसह आहे.'

( शकुंतला व सख्या यांच्याजवळ या वेळचा हा राजाचा प्रवेश फारच उत्तम साधला आहे. त्यांत कृत्रिमपणाचा लेश नसून सर्व प्रकार कसा सहजगत्या झाल्याचें दाखविलें आहे. हाच प्रकार भवभूतीनें कसा बेढबपणानें केला आहे, याचें मालतीमाधवांत उदाहरण आहेच. )

राजा असा अचानक आलेला पाहून—या वेळीं दोघीही सख्यांचें मन शकुंतलेचें कसेंही करून समाधान व्हावें इकडेच लागलें असल्यानें—दोघींनाहीं मोठा आनंद झाला व त्यांनीं त्याला म्हटलें, ' मनोरथाबरोबर त्वरित प्राप्त होणारे आपण बरे उत्तम आलां. '

शकुंतला शय्येवरून उठून उत्थापन देण्याच्या खटपटींत असल्याचें पाहून राजानें तितक्यांत शिताफीनें म्हटलें, ' पुरे पुरे, हा आयास कशाला ?

' तुझ्या सर्वांगाचा दाह होत असल्यामुळें हीं शय्येवरील पुष्पें आणि हे कोमल पण कोमेजलेले कमलतंतु त्याला चिकटताहेत, अशा त्या गात्रांना हा आदर करण्याचा परिश्रम सोसवणार नाहीं.'

( हें राजाचें भाषण फारच मार्मिक व प्रसंगाला शोभे असें आहे. )

अनसूया—' या शिलातलाच्या एका बाजूवर

आपणही येथे बसावं.' ( अनसूयेनें येथें आदरोपचार वगैरे सर्व सोडून त्याच्याशीं सलगीचें भाषण केलें आहे, तें लक्षांत घेण्यासारखें आहे. त्यानें शकुंतलेशीं व तिच्याविषयीं जें भाषण केलें त्यावरून आतां तो आपल्या सलगींतला प्रिय मित्रासारखाच आहे असं मानण्यास कांहीं हरकत राहिली नाहीं, असं समजूनच हें भाषण केलेल आहे. )

नंतर राजा त्याप्रमाणें बसला, आणि शकुंतला लाजत उभी राहिली.

प्रियंवदा—'तुह्मा दोघांचें परस्परांवर भारीच प्रेम असलेलें प्रत्यक्षच झालं आहे. तरी स्नेहामुळें मला पुनः बोलावेंसें वाटतें.'

राजा—'अहो, तें बाकी नका ठेवूं. बोलण्याची गोष्ट मनांत राहिला तर पश्चात्तापाला कारण होते.' ( ही एक सुरेखशी ह्मण आहे. )

प्रियंवदा—'राज्यांत राहणाऱ्या प्रत्येक कष्टी माणसाचे कष्ट राजानें दूर करणें हा आपला धर्म.'

राजा—'याहून दुसरा कोणचाच नाहीं.'

प्रियंवदा—'तर मग, या आमच्या प्रिय सखीला भगवान् मदनानें तुमच्या संबंधानेंच या अशा अवस्थेला आणिली आहे. तिच्यावर अनुग्रह करून तिचे प्राण राखणें आपल्याकडे आहे.'

राजा—'अहो, हा अनुग्रह दोघांनाही सारखाच. यांत मजवर तो अधिकच झाला आहे.'

येथवरचीं हीं भाषणें ऐकून शकुंतलेचा भीड चेपली गेली होती व तिला स्वस्थपणाही आला होता.

हीं भाषणें जणों कवीनें राजाच्या एकदम प्रगट होण्यापासून शकुंतलेच्या मनाची उडालेली तारांबळ कमी होऊन तिची भीड चेपण्याला अवकाश मिळावा ह्मणूनच घातलेलीं दिसतात. तरी त्यांच्यामध्यें मळचाच मोहकपणा किंवा औचित्य कमी आहे असें नाहीं.

शकुंतलेनें नखऱ्यानें प्रियंवदेला ह्मटलें, 'अंतःपुरांतील राजस्त्रियांचा विरह बरेच दिवसांचा झालेला, तिकडे जाण्याची उत्कंठा लागली असेल. तिच्या आड कां यतेस?'

( हें शकुंतलेचें भाषण स्त्रीस्वभावास अनुसरून, राजाचें आपल्यावर कितपत प्रेम आहे व इतर पत्नींविषयीं याचें मन कसें काय आहे तें स्पष्ट काढून घेण्याकरितां घातलेलें आहे. तसेंच आपल्याला पट्टराणीपद देण्याविषयींचें वचन राजाच्या तोंडांतूनच साहजिकपणें काढण्याकरितांही हें भाषण चांगलें सूचक आहे. )

राजानें तिचा भाव समजून ह्मटलें, 'या वेळीं माझें मन केवळ त्वत्परायण आहे. तूंच माझ्या हृदयाला खिळलेली आहस. असें असून हें माझें हृदय दुसऱ्या कोणावर आसक्त आहे असें तं समजत असलीस, तर हे मदिरेक्षणे! मी आधींच मदनबाणानें हत झालेला, त्या मला तूं पुनः ठार मारतेस.'

यावर अनसूया पोक्तपणानें ह्मणाली, ( प्रियंवदा आणि अनसूया या दोन्ही पात्रांत कवीनें बुद्धया एकतऱ्हेचा विशेष फरक ठेवलेला आहे. प्रियंवदा हौसी, मोकळ्या स्वभावाची व तात्कालिक सुखदुःखापुरता विचार व यत्न करणारी—आणि अनसूया पोक्तशी, दीर्घ विचारी व मागेंपुढें पाहून कोणचीही गोष्ट करणारी, अशी दाखविली आहे. ) 'राजांना पुष्कळ बायका असतात ह्मणे.

'इचें मन तुमच्यावर बसलेलें. तसेंच हल्लीं आपलेंही इच्यावर बसलेंसें दाखवून पुढें इचा त्याग केलात, तर इला व सर्व बंधुजनांला संताप व शोक होईल. तसें न व्हावें.'

राजा—'फार कशाला? मला पुष्कळ स्त्रिया

असल्या तरी माझ्या वंशाची खरी प्रतिष्ठा काय ती समुद्रवसना पृथ्वी आणि ही तुमची सखी, या दोघींपासूनच.'

( राजानें शकुंतलेसंबंधें वचन दिलें असें वाक्य काय तें हेंच. यावरून तिच्या पोटीं पुत्र होईल तो आपल्या कुळाचा आधार होईल, व आपल्यामागें गादीचा वारस होईल आणि अर्थातच ही पट्टराणी होईल, असें सांगितलें आहे. तें सहजगत्या--तूं असें वचन देशील तरच तुला मी वश होईन, अशा तऱ्हेचें भाषण शकुंतलेच्या तोंडीं घालून तिला कांहींसा कमीपणा आणून नव्हे--केलें असल्यानें उभयतांच्याही परस्पर प्रेमाला अधिक शोभे असें आहे. )

हें त्याचें मोकळेपणीं केलेलें भाषण ऐकून व त्यांतील भाव जाणून दोघीही सख्या ह्मणाल्या 'आतां आमचें कांहीं ह्मणणें नाहीं.'

नंतर प्रियंवदेनें डोळ्यांनीं खुणावीत ह्मटलें, 'अनसूये, हा पाहिलास कां हरणाचा बच्चा इकडे दृष्टि देऊन आपल्या आईलाच ‹ णों शोधितो आहे. चल तर त्याला तिकडे पाहोंचवूं.' असें ह्मणून बुद्ध्या कांहीं तरी निमित्त करून दोघीही शकुंतला व राजा यांना एकांतांत सोडून निघाल्या. तेव्हां शकुंतला परपुरुषाशीं अशा रीतीनें एकांतांत भेटण्याचा हा प्रथमचाच प्रसंग असल्यानें कांहींशी गोंधळून ह्मणाली, 'गडे, मला इथें रक्षण करणार कोणी नाहीं. दोघींतून एकजण तरी या.'

( यांतही कवीनें तरुण स्त्रियांच्या ाहजिक भ्याडपणाचें प्रसंगोपात्त पण उचित असें धोतन केलें आहे. )

तिला सख्यांनीं तोऱ्यानें उत्तर दिलें, 'साऱ्या पृथ्वीचें रक्षण करणारा तो तुझ्यापाशींच आहे' असें बोलून त्या निघून गेल्या.

तेव्हां शकुंतला कां शी कावऱ्या बावऱ्यानें ह्मणाली, 'अग बाई! या गेल्याच कीं!'

तिचें समाधान करीत राजा ह्मणाला, 'घाबरूं नको, तुझें आराधन करणारा हा तुझा दास तुझ्याजवळच आहे.

'तुला सुख होण्याकरितां सेवकजनाप्रमाणें किंवा तुझ्या प्रियसख्यांप्रमाणें तुला थंडगार अशा कमलपत्रांनीं वारा घालूं?--किंवा तुझे कमलाप्रमाणें सुकुमार व आरक्त चरण मांडीवर घेऊन हळूहळ तुला बरें वाटेल असे दाबूं?' ( यांतील पाय दाबण्याला सुद्धां तयार असल्याविषयींचें राजाचें भाषण गाढ समागमाची अत्युत्कट इच्छा अस याचेंही द्योतक आहे. )

हें त्याचें प्रे ाचें व गुदगुल्या होण्याजोगें भाषण ऐकूनही शकुंतलेनें त्याला योग्य असेंच उत्तर दिलें,--'ज्यांना मान दिला पाहिजे त्यांच्याकडून सेवा करून घेण्याचा अपराध मजकडून कधा घडणार नाहीं.' तुह्मी राजे व माझे प्रियतम, तुह्माला मी मान दिला पाहिजे. तुमच्याकडून असली सेवा करून घेण्याचा अपराध मी करणार नाहीं.

( हें किती भारदस्तपणाचें व विनयाचें उत्तर दिलेलें आहे. शकुंतला प्रेमविव्हळ झाली होती, तरी ती आपलें कर्तव्य विसरली नव्हती असें यावरून व पुढील एकदोन भाषणांवरून स्पष्ट दाखविलें आहे. ) असें बोलून ती उठून जाऊं लागली, तेव्हां राजा ह्मणाला, 'सुंदरी, हें कडक ऊन पडलेलें; त्यांत तुझें शरीर नाजूक व मदनसंतापानें परि ास झालेलें. ही कुसुमशय्या व हीं कमलतंतूंचीं स्तनावरणें टाकून जाण्याजोगी तुझी अवस्था नाहीं.' असें ह्मणून त्यानें तिला धरून परतविलें.

तेव्हां शकुंतलेनें त्याला किंचित् प्रेमानें तरी रागानें ह्मटलें, 'पौरवा, अशी दांडगाई तुला

योग्य नाहीं. मी मदनसंतप्त असलें तरी माझी मी मुखत्यार नाहीं.' ( या भाषणांतील पूर्वभाग निषेधपर असूनही त्याचें जणों त्यांतील उत्तरभागानें निराकारण केलें आहे. माझ्या स्वतःकडून तुझ्या समागमाविषयीं नकार नाहीं. पण मी आपलीच मुखत्यारीण नाहीं. )

राजा—'अगे, भित्रे, यांत गुरुजनाची भीति बाळगण्याला नको. कुलपति कण्व धर्मज्ञ आहेत. ते याविषयीं दोष देणार नाहींत. कारण त्यांना खरी स्थिति कळून येईल. शिवाय यांत कांहीं दोष नाहीं. पुष्कळ राजर्षिकन्यांनीं आजवर गांधर्व विवाह केले, व त्यांना त्यांच्या पित्यांनीं अनुमोदन दिलें, व त्यांचें अभिनंदनही केलेलें ऐकिवांत आहे.'

शकुंतला—'पण मला सोडा. पुनः जाऊन सख्यांचें अनुमोदन घेऊं द्या.'

( हें कांहींतरी कृतक, नाखुषी दाखविण्यापुतें भाषण आहे. यांत तिनें 'पुनः विचारूं दे' असें ह्मटल्यावरून, पूर्वी सख्यांनीं अनुमोदन दिलेलें आहे—तेव्हां आतां त्यांना विचारण्याच प्रयोजन काय, असें ह्मणण्याला व एकंदरींत तिच्या तर मनांत आहेच—गुरुजन अभिनंदनच करतील, आणि सख्यांनीं पूर्वीच समक्षच अनुमोदन दिलेलें आहे, तेव्हां आतां बाकी कांहीं राहिलें नाहीं—आतां पुनः सख्यांना विचारण्याचा केवळ बहाणा आहे, हें सर्व समजूनच राजानें ह्मटलें, 'होय सोडतों.'

शकुंतला—'केव्हां?'

राजानें आतुरपणानें उत्तर दिलें: 'एखादा आतुर भ्रमर एखाद्या कोमल, नवीन आणि दुसऱ्या कोणी स्पर्श केला नाहीं अशा पुष्पाचें आस्थेनें मधुपान करितो, तद्वत् मी प्रेमानें या तुझ्या अधराचा रस चाखल्यानंतर.'

( हेंही भाषण मोठें मजेदार आहे. यांत राजानें शकुंतलेची स्तुति करून खुलवून आपलें काम साधण्याचा उपक्रम केला आहे. श्लोकाची रचना अप्रतिम आहे. राजानें तरी हें भाषण शकुंतलेची स्थिति अंततः आपल्यास प्रतिकूल नसलेली व केवळ वरवर नाखुषीचा बहाणा करण्याची असल्याचें पाहूनच केलें आहे.)

असें ह्मणून तो बळेंच तिचें मुख मुका घेण्याकरितां वर करूं लागला, तेव्हां शकुंतला डौलानें मागें मागें घेऊं लागली.

यांत तरी कवीनें, तरुण स्त्रिया स्वभावतः लज्जावती असतात व समागमाच्या संबंधांत अतिप्रसंग त्यांच्याकडून सहसा होत नाहीं, तो प्रथम पुरुषाकडूनच होतो, हेंही व्यक्त केलें आहे. स्त्रियांच्या मनांत प्रबळ कामेच्छा असली, तरी त्यांच्या हातून अविनय होत नाहीं. तो मान पुरुषाकडेच नेहमीं येतो. व एकंदरींत स्त्रियांना प्रथम बिघडविण्याला मूळ कारण व प्रस्ताव पुरुषाकडूनच होतो.

इकडे लतामंडपांत हा प्रकार चालला होता आणि बाहेर अनसूया व प्रियंवदा टेहळणीवर होत्या. प्रारंभीं शिष्यानें सांगितल्याप्रमाणें त्यानें गौतमीआत्याला तीर्थोदक देऊन पाठविलें होतें. ती शकुंतलेचा शोध करीत इकडेच येत होती, ती त्यांच्या दृष्टीस पडली. तेव्हां त्यांनीं शकुंतलेला सूचना करण्यास्तव सहजपणें पण मोठ्यानें अन्योक्तीनें ह्मटलें, 'चक्रवाकी, आपल्या सहचराचा निरोप घे—रात्र जवळ आली.' आपल्या प्रियकराचा निरोप घेऊन त्याला एकीकडे लपीव, ही तुह्माला रात्रीसारखी गौतमी प्राप्त झाली आहे.

हें ऐकून व यांतील भाव समजून शकुंतलेची तारंबळ उडाली व तिनें ह्मटलें, "पौरवा, मी आतां कशी आहे तें पाहण्याकरितां आत्या गौतमी येते आहे खास—या झाडा आड हो.'

'बरें तर,–' असें ह्मणून राजा आड झाला. तोंच हातीं तीर्थपात्र घेतलेली गौतमी व दोघीही सख्या लतामंटपांत आल्या. गौतमीनें येतांच विचारिलें, 'बाळे, अंगाचा दाह कमी झाला कां कांहीं!' शकुंतलेनें उत्तर दिलें, 'होय कांहींसा.'

'या दर्भोदकानें–तीर्थानें–सारी बाधा दूर होईल–' असें ह्मणून तिनें तिच्या अंगावर तीर्थ शिंपडलें, आणि 'बाळे, दिवस बुडत आला, चला उटजांत जाऊं' असें ह्मणून, सर्वजणी निघाल्या. तेव्हां शकुंतला आपल्याशीं ह्मणाली, 'वेड्या मना! प्रथम मनोरथ सहज सुखानें प्राप्त होत होता तेव्हां भित्रेपणा सोडला नाहींस–आतां पश्चात्ताप आणि हळहळ कां?' चार पावलें जाऊन ती मोठ्यानें ह्मणाली,–– 'संतापहारका लतामंटपा, पुनः उपभोग देण्याकरितां आमंत्रण देतें बरें.'

(राजा व शकुंतला यांचा समागम लतामंटपांत संभोगशृंगाराच्या आरंभाला येतो आहे तोंच कवीनें गौतमीचा प्रवेश करविला आहे–व तोही सकारण आणि अनिर्दिष्ट नव्हे असा–यांत नाट्यशास्त्राचे ठरीव नियम पाळले गेले आहेत. पण ते सहजगत्या मोठ्या खुबीनें; भवभूतीच्या नाटकांतल्याप्रमाणें बुद्ध्यां कथेचा, प्रवेशाचा, किंवा संविधानकाचा, विरस होईल अशा रीतीनें नव्हे. शकुंतलेनें गौतमीला उत्तर दिलें आहे तें तरी–खरें पण खुबीदार; कारण तिचा राजाशीं समागमसा घडल्यानें तिचा दाह कांहींसा कमी झाला होता खराच.

निरुपायानें गौतमीबरोबर जावें लागल्यानें मनांतील पूर्ण समागमाची इच्छा जशीच्या तशीच–निदान या वेळेपुर्ती–राहिली, ह्मणून तिला खेद झाला; व आपण पूर्ण सुख मिळण्याचा प्रसंग आला असतां भीतीमुळें माघार घेऊन तो व्यर्थ दवडला, याबद्दल तिला हळहळ वाटली. तरी या लतामंटपांत पुनः वाटेल तेव्हां संकेत ठरवून राजाची गांठ घेतां येण्यासारखी असल्यानें, तिनें जातां जातां–बाह्यतः जणों लतामंटपाला, पण खरोखर तेथें लपून बसलेल्या राजाला–मी येथेंच उपभोगसुखाकरितां पुनः येईन, असें अन्योक्तीनें ह्मटलें आहे. हा सर्व भाग सुरेख साधला आहे.

सर्व निघून गेल्यावर राजा झाडाआडून बाहेर आला. शकुंतला गेल्यामुळें त्याला उद्विग्नता आली होती. उसासा टाकीत तो ह्मणाला, 'आपणास हव्या असलेल्या गोष्टी सिद्ध होण्याला किती तरी विघ्नें येतात!

'मीं बळेंच तिचें मुख चुंबन घेण्याकरितां वळविलें तेव्हां तिचे नेत्र तरल व दृष्टि वक्र झाली होती. तिनें आपल्या अंगुली वरचेवर आपल्या ओंठावर ठेवल्या, आणि तोंडानें अस्पष्टपणें–'नको नको, पुरे पुरे,' अशा तऱ्हेचे शब्द उच्चारिले, तेव्हां तिचें मुख अत्यंत मनोहर झालें होतें. तिचें मनाप्रमाणें चुंबन घ्यावें तोंच ही पीडा आली! यामुळें मला चुंबन घेण्याला सांपडलें नाहीं.

'आतां कोठें जावें बरें?–अथवा कांहीं वेळ येथेंच प्रियेनें उपभोग घेतलेल्या या लतामंटपांत बसावें; असें ह्मणून चोहींकडे पाहून तेथील स्थितीचें वर्णन करीत तो ह्मणाला, 'ही या शिलेवर तिच्या शरीरानें चुरडलेली पुष्पशय्या आणि नखांनीं कमलपत्रावर कोरलेला–पण कोमेजलेला–हा मन्मथलेख. तसेंच तिच्या हातांतून गळून पडलेलें कमलतंतूंचें हें आभरण.–यांच्या मोहामुळें या शून्य वेतसगृहांतूनही मला जावेंसें वाटत नाहीं.'

हे त्याचे विचार चालले आहेत तोंच बाहेरून पुढील शब्द त्याच्या कानीं आले–'राजा, सायंकालचें यज्ञकर्म चालू झालें असतां

हुताशनयुक्त वेदीच्या आसपास संध्याकाळच्या अभ्राप्रमाणें पिंगट व भयंकर पिशित अशन करणाऱ्या राक्षसांच्या पुष्कळशा छाया दिसूं लागल्या आहेत—त्यांचा नाश कर.'

हें निमंत्रण आलेलें पाहून 'हा पहा, मी आलोंच,' असें ह्मणून तो निघून गेला.

यज्ञ रक्षण करण्याच्या कामांतून विसावा मिळाल्यानें तो शकुंतलेचा शोध करीत यज्ञभूमि सोडून आला होता, व त्याचें शकुंतलेसंबंधीं काम तूर्त आटपतांच तो परत सकारण आपल्या मुख्य कामाला गेला, असें कवीनें दाखविलें आहे. या अंकांतही दोष ठेवण्याजोगें असें कांहींच नाहीं. तो बहुतेक सर्व तऱ्हेनें उत्तम साधला आहे असें ह्मणण्याला मुळींच अडचण नाहीं. यांतील वर्णन केलेल्या सर्व गोष्टी कण्वाच्या आश्रमांत मालिनी तीरावरील लतामंटपाच्या जवळच घडलेल्या आहेत, व काळही एकच दिवसाच्या दोन प्रहरापासून संध्याकाळापर्यंतचा घेतलेला आहे. प्रवेश, भाषण किंवा वर्णन यांच्यांत असंभाव्यपणा किंवा अश्लीलपणा यांचा लेश नाहीं. शेवटपर्यंत प्रेक्षकांच्या उत्सुकतेला खळ पडत नाहीं. कारण बीजस्फोट कोठेंही कोणच्याही पात्राकडून झालेला नाहीं. भाषणें अगदीं वेचक व बेताचीं आहेत.

एकंदरींत हा अंक या नाटकांत उत्तमांपैकीं आहे.

---

## अंक चौथा.

मागील अंकांत वर्णन केल्याप्रमाणें राजा दुष्यंत आणि शकुंतला यांची मोकळेपणीं गांठ लतामंटपांत पडली. पण त्यांना गाढ समागमसुखाचा ला[illegible] होण्याला तितक्यांतच गौतमी आल्यानें व्यत्यय आला. शकुंतलेनें जातां जातां पुनः त्या लतामंटपांत उपभोगाकरितां येण्याचा संकेत ठरविण्यासारखें भाषण केलें. त्याचा अर्थ राजाच्या लक्षांत अर्थातच आला. पुढें उभयतांचा मनाजोगा समागम त्याच लतामंटपांत किंवा दुसऱ्या कोणच्या तरी नेमलेल्या स्थळीं घडला. तो अनसूया व प्रियंवदा यांच्या संमतीनें,—पण आश्रमांतील इतर मंडळीला त्यांतील गंध देखील न लागतां. या दुसऱ्या प्रसंगाचें व त्यावेळीं रहस्यांत झालेल्या भाषणाचें वगैरे वर्णन उत्तम झालें असतें. पण अशा गोष्टींतील खरें सुख केवळ स्वसंवेद्य असल्यानें त्याचें यथार्थ व पाहिजे तसें वर्णन होणें अशक्य; आणि असले प्रसंग वर्णित होण्यापेक्षां त्यांच्याविषयींचें केवळ सूचन झालेलेंच अधिक खुबीदार असतें, असें समजून कवीनें तें सोडून दिलें आहे.

ऋषींचें इष्टिरक्षणाचें व आपलेंही—शकुंतलासमागमाचें—कार्य आटोपून राजा आश्रमांतून हस्तिनापुराला परत गेला. पण पुढें शकुंतलेची खबर घेऊन तिला नेवविण्याची वगैरे व्यवस्था करण्याला तो कां व कसा विसरला व त्याचें एकंदर पर्यवसान निदान शकुंतलेपुरतें कसें काय झालें, त्याचें या अंकांत वर्णन आहे.

एतद्देशीय प्राचीन संस्कृतज्ञ विद्वानांनीं—

> काव्येषु नाटकं रम्यं-तत्रापि च शकुंतला ।
> तन्मध्येतु चतुर्थोकः तत्र श्लोकचतुष्टयं ॥

असें या ग्रंथाविषयीं वर्णन केलें आहे. तें अगदीं योग्य आहे, असें पुढें वाचकांच्या लक्षांत येईलच.

राजा दुष्यंत आश्रमांतून निघून गेल्यावर, अनसूया व प्रियंवदा बागेंत फुलें वेचीत आपसांत याच संबंधानें बोलत होत्या. तेव्हां अनसूयेनें ह्मटलें,—'प्रियंवदे, शकुंतलेला गांधर्वविधीनें योग्य भर्त्याचा समागम झाला यामुळें तिचें कल्याणच झालें, ह्मणून माझ्या

मनाला समाधान वाटतें. तरी, ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे.'

प्रियं०—' ती कोणची?'

अनु०—'अगे, त्या राजर्षीचें येथील इष्टिसंरक्षणाचें काम संपलें व त्याला ऋषिजनांचा निरोपही झाला. आतां तो आपल्या अंत:पुरांत पोंहोंचल्यावर त्याला इकडील वृत्तांताचें स्मरण राहतें कां नाहीं?'

तिचें समाधान करीत प्रियंवदेनें ह्मटलें,—'अगे, खात्री ठेव—त्याच्या अंगीं त्याच्या आकृतीला अननुरूप गुण कधींही असणार नाहींत. तो दिसतो तसाच महानुभाव आहे—तो कधीं इकडील वृत्तांत विसरून—किंवा, बुद्ध्या—आपणाला ठकविणार नाहीं. पण हें ऐकून कण्वबाबा काय करतील कोण जाणें.'

मला त्या राजाविषयीं मुळींच काळजी नाहीं—तो इला विसरेल असें होणार नाहीं—पण मला काळजी वाटते ती, कण्वबाबा हें ऐकून काय करतील याची. प्रियंवदेच्या हौशी व उत्सुक स्वभावाला अनुरूप असेंच हें भाषण आहे.

अ०—'मला तर वाटतें हें त्यांना अनुमत होईल.'

प्रि०—'तें कसें काय?'

अनु०—'अगे, हें पहा, कन्या गुणवानाला अर्पण करावयाची हा पहिला विचार. तो दैवानें आपोआपच जुळून आला तर वडीलधाऱ्यांना आयतीच कृतार्थता मिळाली.'

येथवरचीं सूचक भाषणें झाल्यावर प्रियंवदेनें आपल्या फुलांच्या परडीकडे पाहून ह्मटलें, 'बलिकर्मापुरतीं फुलं वेचलीं गेलीं.'

अ०—'खरें, पण शकुंतलेच्या सौभाग्यदेवतांचें पूजन करावयाचें आहे.' (मंगळागौरी पूजनासारखेंच हें पूजन समजलें पाहिजे. त्याच्याकरितां कांहीं अधिक फुलें वेचलीं पाहिजेत असा भाव.)

प्रि०—'हो खरेंच.' असें ह्मणून दोघीही आणखी फुलें वेचूं लागल्या; थोडे वेळानें आश्रमाच्या दाराशीं कोणी मोठ्यानें 'अहो, हा मी आलों आहें—कोणी आहे कां आंत!' असें ह्मटल्याचें त्यांनीं ऐकिलें. अनसूया ह्मणाली,—'कोणा थोर अतिथीचासा शब्द दिसतो.'

प्रियंवदा—'उटजांत शकुंतला आहेच'—पण तिनें पुन: मनांत विचार केला, 'आहे खरी, पण तिचें चित्त कोठें ठिकाणावर आहे?'

अनसूया ह्मणाली,—'बरें, पुरे झालीं इतकीं फुलें.'

असें ह्मणून दोघीही निघाल्या, तोंच पुढील रागाचें भाषण त्यांच्या कानीं आलें.

'आँ:, काय-अतिथीचा अनादर करणारे दांडगे पोरी! मी तपोधन अतिथी आलेला तुझ्या गांवींही नाहीं! तूं इतकी तन्मयचित्त होऊन ज्याचा निदिध्यास धरून बसली आहेस त्याला तूं स्मरण दिलेंस तरी सुद्धां, प्रथम बोललेली गोष्ट प्रमत्त पुरुष पार विसरून जातो तसें, त्याला तुझें स्मरण होणार नाहीं.'

(हें भाषण परम कोपन दुर्वासाचें होतें. तो अतिथि होऊन आला असतांना शकुंतलेनें घरांत असून त्याला ओ दिली नाहीं, यामुळें त्याला राग येऊन त्यानें हा शाप दिला आहे. ही केवळ कविकल्पना आहे. तरी ती या नाटकाला योग्य रूप आणण्याला अप्रतिम साधलेली आहे.)

प्रियंवदा—'हाय हाय! फारच वाईट झालें. चित्त ठिकाणावर नसल्यामुळें शकुंतलेच्या हातुन कोणा तरी थोर गृहस्थाचा सत्कार न करण्याचा अपराध घडला खचित.' थोडी पुढें होऊन पाहून ती ह्मणाली, 'तोही कोणा सामान्याचा नव्हे!—हा सहज रागावणारा. महर्षि दुर्वास—तसा शाप देऊन मोठ्या वेगानें व गडबडीनें

परतला सुद्धां! अग्नीशिवाय दुसरा कोण दाह करूं शकणार!' दुर्वासऋषि तेव्हांच रागावणारा असल्याचें तत्कालीन आबालवृद्धांना ठाऊक होतें. व तो महर्षि व तपोराशी असल्यानें, हा रागावून काय भलताच त्रास देईल किंवा शाप देईल कोण जाणे, अशी सर्वांना दहशत होती. त्याला अनुसरूनच हें सुरेख भाषण आहे.

अनसूया—'जा जा, त्याच्या पायां पडून कसा तरी त्याला परत आण. तोंवर मी अर्घ्योदक वगैरे तयार करून ठेवितें.'

प्रियंवदा गेल्यावर अनसूया आश्रमाकडे चालली. तिनें गडबडीनें आपणाशीं ह्मटलें, 'अग बाई! गडबडीनें चालण्यांत ठेंच लागून माझ्या हातून ही फुलांची परडी पडली!' असें ह्मणून ती पडलेलीं फुलें गोळा करूं लागली.

( रंगभूमीवर असलेलें कोणचेंही पात्र स्वस्थ उभें करून ठेवणें गौण आहे. प्रियंवदेला दुर्वासांची मनधरणी करून परत आणण्यास्तव पाठविल्यानंतर अनसूयेला आश्रमांत अर्घ्यपात्राची तयारी करण्याला ताबडतोब जाणें भाग होतें. पण ती तशी जाती तर प्रियंवदेच्या जाण्याचा काय उपयोग झाला तें तिला आश्रमांत गेल्यावर कळतें व तेवढ्याकरितां व्यर्थ प्रवेश बदलावा लागता. नाहीं तर प्रियंवदा परत येईपर्यंत अनसूया रंगभूमीवर स्वस्थ तिची मार्गप्रतिक्षा करीत उभी राहिलेली दाखवावी लागती. हे दोन्ही प्रकार गौण समजूनच या अप्रतिम कवीनें ही फुलांची परडी आपोआप पडण्याची व तीं फुलें पुनः अनसूयेनें वेंचण्याची सुरेख व्यवस्था केली आहे. रंगभूमीवरील व्यवस्थेकडे कालिदासाचें किती लक्ष होतें हें या एका प्रसंगावरून सुद्धां स्पष्ट होतें. नाहीं तर भवभूतीचीही व्यवस्था!)

इतक्यांत प्रियंवदेनें परत येऊन ह्मटलें, 'गडे, तो जन्माचा वांकडा कोणाचें ऐकतो! तरी थोडासा आला वळणीवर.'

अनसूया हंसत ह्मणाली, 'खरेंच, हें तरी त्याला अधिकच.—कसें काय सांग तर.'

प्रि०—'तो परत येईचना, तेव्हां मीं त्याला विनंती केली—महाराज, तपप्रभाव ठाऊक नसलेल्या आपल्या कन्येचा प्रथमच अपराध समजून क्षमा करावी.'

तेव्हां 'माझें बोलणें खोटें तर होणार नाहींच. परंतु खुणेचें आभरण दृष्टीस पडतांच शापाची निवृत्ति होईल—' असें सांगून तो गुप्त झाला.

अनसूया—'सखे, तर समाधानाला जागा आहे. त्या राजर्षीनें जातांना आपलें नांव खोदलेली आंगठी स्मरणाकरितां ह्मणून स्वतः तिच्या हातांत घातली आहे. त्यामुळें शकुंतलेच्या स्वाधीनच हा उपाय आहे.'

राजानें अंगठी दिल्याचा हा वृत्तांत किती साहजिकपणें आला आहे!

प्रियंवदा—'गडे चल, देवकार्य उरकूंया.'

असें ह्मणून दोघीही निघाल्या. आश्रमाजवळशा गेल्यावर पुढें पाहून प्रियंवदा ह्मणाली, 'गडे, पहा तर खरी, डाव्या हातावर डोकें टेंकून ही कशी चित्रासारखी बसली आहे ती! ही नवऱ्याविषयीं चिंता व काळजी करीत बसलेली—तिचें चित्त ठिकाणावर नाहीं. तेव्हां बाहेर कोण आलें कोण गेलें याचें तिला भान कोठलें?'

अनसूया अधिक पोक्त व दूरवर विचार करणारी होती, ती ह्मणालीः—'गडे, प्रियंवदे, हें आपणा दोघींनाच ठाऊक बरें. आपली प्रिय सखी मुळचीच नाजूक, तिचें मन स्वस्थ राखलें पाहिजे.' हें ऐकून तिला त्रास होईल, तो तिला सोसवणार नाहीं, याकरितां याविषयीं

चकार शब्द बोलतां कामा नये. वास्तविकपणें या त्यांच्या व बोलण्यानेंच पुढें शकुंतलेला जास्त त्रास झाला आहे. तिला तिच्या सख्या हा वृत्तांत सांगून सावध करून ठेवत्या तर पुढील सर्व त्रास चुकता. पण असें होणार कसें ? भवितव्यता बलवती !

प्रियंवदा–'अगे होयच. मोगरीच्या वेलीला ऊन पाणी कां कोणी घालील ?!'

असें ह्मणून दोघीही निघून गेल्या.

मागील कथेचें पुढील कथाभागाशीं अनुसंधान जुळविण्याकरितां हा एक मध्यंतरीं लहानसा प्रवेश घातलेला आहे. याला नाट्यशास्त्र–परिभाषेंत विष्कंभक ह्मणतात.

या गोष्टीला कांहीं दिवस होऊन गेले.

नंतर एक शिष्य पहांटे झोंपेंतून उठून आपणाशीं ह्मणाला, 'प्रवासाहून परत आलेल्या काश्यप गुरूनीं मला वेळ पाहून येण्यास सांगितलें आहे. तेव्हां बाहेर जाऊन किती रात्र राहिली आहे हें पहावें.

'हा एकीकडून चंद्र अस्ताचलावर पडतो आहे आणि दुसरीकडे सूर्य अरुणाला पुढें करीत आपल्या तेजस प्रभावानें उदय पावतो आहे. या दोन्ही तेजस्वी दैवतांना सुद्धां एका काळीं अस्त व उदय किंवा क्षय आणि वृद्धि प्राप्त होते, यावरून आपली स्थिति किती चंचल व अनिश्चित आहे याचा सर्व लोकांना जणो धडाच मिळतो आहे. तसेंच–

'चंद्र प्रकाशित व संनिहित असतांना कुमुदिनी आनंदानें विकसित असते; तोच त्याचा अस्त झाला ह्मणजे तीही कोमेजते. त्याचप्रमाणें प्रियकर सन्निध असला ह्मणजे अबला जन आनंदांत असतो, पण तोच दूर प्रवासाला गेलेला असला ह्मणजे त्यांला दुःसह दुःख होतें.'

हें शकुंतलेच्या या वेळच्या स्थितीचें सूचक आहे. दुष्यंत आश्रमांतून निघून गेल्याला किती तरी दिवस झाले होते. आणि अद्यापि त्यानें शकुंतलेला नेण्याबद्दल कांहींच व्यवस्था केली नव्हती. नुसता सुखाचा निरोप सुद्धां धाडला नव्हता. यामुळें शकुंतला दुःसह चिंताग्रस्त झालेली होती.

पदलालित्य, अर्थगौरव, सांधेपणा व सरळपणा इत्यादि गुणांमुळें हे दोन्ही श्लोक अप्रतिम झालेले आहेत. पहिल्यांतील संसारिकांच्या स्थितीचें सूचक बोधन, आणि दुसऱ्यांतील सामान्य लोकस्थिति आणि विशेषतः शकुंतलाविषयक अवस्था व कथा यांचें सूचन फारच उत्तम आहे.

हा आपल्याशीं याप्रमाणें बोलत होता, इतक्यांत, दुसरीकडून अनसूया उठून गडबडीनें बाहेर येऊन आपल्याशीं ह्मणाली, 'आम्ही विषयपराङ्मुख तपस्वी, आह्माला या गोष्टी कळत नाहींत खऱ्या, तरी राजानें शकुंतलेशीं हें अगदीं नीचपणाचें वर्तन केलें.'

इकडे शिष्य 'होमाची वेळ झाली असें गुरूला जाऊन सांगावें' असें ह्मणून निघून गेला.

या दोन्ही पात्रांचे प्रवेश एकाच वेळेच्या सुमारास व कण्वाश्रमाच्या अंगणांत निरनिराळ्या जागीं झालेले दाखविले आहेत; व त्यांच्या भाषणांत परस्परसंबंध नसल्यानें त्यांची गांटही पडलेली नाहीं असें दाखविलें आहे. अलीकडील नाटकांत हे दोन निरनिराळे प्रवेश दाखविले गेले असते.

अनसूया–'मी केव्हांची जागी झालें, पण करायचें काय ? रोजच्या कामांत देखील हातपाय चालत नाहींत–कांहीं सुचत नाहीं. मेला काम एकदांचा सकाम होवो ! (हें भाषण

शकुंतलेच्या स्थितीला अनुलक्षून आहे. ) त्या लबाड कामाच्या प्रभावानेंच आमच्या प्रियसखीचें मन मोहित होऊन तिनें त्या लबाडावर विश्वास ठेवून स्वतःला फसवून घेतलें.—किंवा दुर्वासाच्या कोपाचा तर हा परिणाम नव्हे? नाहीं तर त्या वेळीं तशा गुजगोष्टी सांगून आतांपर्यंत नुसती एखादी चिठीसुद्धां पाठवूं नये? त्याला इकडचें स्मरण देणारी त्यानें दिलेली अंगठी तरी त्याच्याकडे पाठवावी. पण सारे तपस्वी कसे विरक्त. त्यांतून कोणाला जा म्हणावें तरी—काश्यप बाबा यात्रेहून परत आले. यांत शकुंतलेचाच दोष आहे.—तिनें दुष्यंताला वरिलें असून तिला दिवस गेले आहेत—हें त्यांना माझ्यानें सांगवत नाहीं. अशा ठिकाणीं करावें तरी काय?'

अनसूया विशेष पोक्त व विचारी असल्यानें तिला राजानें गोड गोड भाषणें करून शकुंतलेशीं गांधर्वविवाह केला आणि तो जो एकदांचा गेला तेव्हांपासून त्यानें इकडील नांव सुद्धां घेतलें नाहीं, याबद्दल मोठीच चिंता पडली होती व फारच वाईट वाटत होतें. शकुंतलेला त्याच्यापासून गर्भ राहिलेला. व राजानें तिचा स्वीकार केलेला नाहीं. यांत शकुंतलेचा अल्लडपणा व दोष तर खराच; पण या सर्व गोष्टी काश्यपबाबांला सांगाव्या कशा?—आणि त्या गुप्त तरी कशा रहाव्या? राजाला कदाचित् दुर्वासाच्या शापामुळें मोह झाला असला तर त्याला स्मरण देण्याला त्यानें दिलेली अंगठी पाठवावी, पण आश्रमांतील सर्व लोक बेपर्वा व त्रयस्थ—तेव्हां हें काम करा असें म्हणावें कोणाला? पुढें शकुंतलेचें होणार कसें?—इत्यादि विचारांमुळें तिचें मन त्रासून व गोंधळून गेलें होतें. तिला कांहीं कामकाज सुचत नव्हतें. या तुटक तुटक भाषणांवरून तिच्या मनांतील दुःख व गडबड चांगली व्यक्त केली गेली आहे.

इतक्यांत प्रियंवदेनें गडबडीनें येऊन आनंदानें म्हटलें, 'सखे, चल. शकुंतला सासरीं जावयाची, तिचें कौतुक व तयारी करण्याला चल.'

अनसूया—'तें गे कसें काय सांग!'

प्रियंवदा—'ऐक, मी आतांच शकुंतलेकडे झोंपबीप कशी काय लागली तें विचारण्याकरितां म्हणून गेलें होतें. तेव्हां ती लाजेनें खालीं मान घालून उभी होती. तिला कश्यपबाबांनीं पोटाशीं धरून अभिनंदन करीत म्हटलें, 'सुदैवानें धुरानें डोळे झांकलेल्या यजमानाच्या हातून सुद्धां आहुती यज्ञाग्नींतच पडावी—किंवा योग्य शिष्याला पढविलेली विद्या नांव न ठेवण्याजोगी व्हावी, तसें झालें. आजच तुला ऋषिजन बरोबर देऊन भर्त्याच्या घरीं पोहोंचवितों'.

यांत, कण्वाला शकुंतलेचा वृत्तांत कळून त्यानें तिचें अभिनंदन केलें आहे व तिला त्याच दिवशीं नवऱ्याच्या घरीं पाठविण्याचें ठरविलें आहे, असें प्रियंवदेकडून वदविलें आहे.

शिष्यानें उठून वेळ पाहून होमाची वेळ झाली असल्याचें जाऊन कळविल्यावर कण्व नित्यनेम उरकून होमशाळेंत गेला. तेथें त्याला आपोआप शकुंतलेसंबंधीं वृत्तांत कळला. नंतर थोड्या वेळानें त्यानें शकुंतलेची गांठ घेऊन तिचें अभिनंदन केलें, त्यावेळीं प्रियंवदा तेथें होती; व तिनें येऊन अनसूयेला ही गोष्ट कळविली आहे. पण शिष्य निघून गेला त्यापूर्वीच अनसूया रंगभूमीवर आली होती; व तिचें हें स्वगत भाषण चाललें होतें एवढ्या अवकाशांत वर वर्णन केलेला सर्व प्रकार घडला, असें घेतलें पाहिजे. त्याला हा वेळ फार थोडा आहे.

शिष्याचें शेवटचें भाषण होऊन तो निघून गेल्यावर कांहीं वेळानें अनसूयेचा प्रवेश झाला असें दाखविल्यानें हा आक्षेप दूर होणार आहे. आणि कदाचित् प्रारंभीं कालिदासानें या प्रमा-

णेव भाषणाचा क्रम ठेविलेला असून तो लेखक-प्रमादामुळें बदलला असेल, असेंही संभवतें.

तसेंच शिष्य उठण्याच्या पूर्वीच कण्व उठून नित्यकर्में उरकून फक्त होमाची वेळ झाली किंवा नाहीं एवढेंच पाहण्याला त्यानें निजलेल्या शिष्याला उठवून पाठविलें, असेंही मानतां येईल.

अ०—' पण कन्येचा वृत्तांत कण्वकाकांना कळविला कोणी ?'

प्रि०—'अगे, ते होमशाळेंत गेले होते. तेथें अशरीरिणी छंदोमयी वाणीनें त्यांना ही गोष्ट कळविली. ती वाणी अशीः—

धरी दुष्यंततेजातें, भूमिकल्याण व्हावया ॥
समजें कन्यका विप्रा अग्निगर्भ शमीपरी' ॥

(किर्लोसकरकृत संगीत शाकुंतल.)

हें ऐकतांच अनसूयेला शकुंतलेसंबंधें असलेली काळजी एकदम नाहींशी झाली. तिनें प्रियंवदेला आनंदानें आलिंगन देऊन ह्मटलें, ' सखे, फार चांगलें झालें. पण आजच तिची पाठवणी व्हावयाची यामुळें बाई कसेंसेंच वाटतें.'

कण्वबाबांना ही मारी गोष्ट अशा अलौकिक रीतीनें कळली, यामुळें आतां ते काय ह्मणतील कोण जाणे ह्मणून जी भीति वाटत होती, ती नाहींशी होंऊन तिला आनंद झाला. पण त्यांत आजच शकुंतलेची पाठवणी होते. याचा तिला खेद वाटला. कारण आतां तिचा वियोग होणार.

प्रि०—' अगे, आपण आपला खेद कसा तरी घालवूं. पण ती बिचारी एकदाची सुखांत पडो.' हें भाषण प्रियंवदेच्या हौसी व उल्लसित स्वभावास अनुरूप असेंच घातलें आहे.

अ०—' तर मग या आंब्याच्या डाहळीला टांगलेल्या नारळाच्या पातीच्या करंटींत अशाच प्रसंगाकरितां ह्मणून पुष्कळ दिवस टिकणारी केसरपुष्पांची माळा ठेविलेली आहे. ती काढून घे पाहूं. तोंवर मी तिच्याकरितां तीर्थ, मृत्तिका, मृगरोचन, कोवळ्या दूर्वा, इत्यादि मंगल अलंकरणसाधनें जमवून आणितें.' असें सांगून अनसूया निघून गेली व प्रियंवदा फुलें वेंचूं लागली. तोंच पुढील शब्द आश्रमांतून तिच्या कानीं आले. ' गौतमी, शार्ङ्गरवादिकांना शकुंतलेला पोंहोंचविण्याला तयार होऊन या ह्मणावें तर.' हें भाषण कण्वानें केलेलें दिसतें. तें ऐकून प्रियंवदेनें गडबडीनें ह्मटलें, ' अनसूये, चल गे चल लौकर—हे पहा हस्तिनापुराला जाणाऱ्या ऋषींना बोलाविताहेत.'

अनसूया अलंकरण—सामग्री घेऊन आल्यावर दोघीही निघाल्या. प्रियंवदेनें पुढेंसें पहात ह्मटलें, ' ही सूर्योदयाबरोबर न्हाऊं घातलेली शकुंतला. तिच्या भोंवती तापसी हातीं नीवाराच्या अक्षता घेऊन स्वस्तिवाचन व अभिनंदन करीत उभ्या आहेत. चल तेथेंच जाऊं.' मोठ्या मुली मासरीं जाऊं लागल्या ह्मणजे माहेरची मंडळी व विशेषतः स्त्रिया पाठवणीच्या वेळीं एकत्र जमतात. आणि तिची ओटी भरून तिला आशीर्वाद देतात. मुलीच्या मनांत भावी पतिसमागमासंबंधें आनंद, आणि जुन्या मैत्रिणी व आपणावर प्रेम करणाऱ्या व आपले लाड करणाऱ्या वडीलधाऱ्यांच्या वियोगासंबंधें खेद-या दोन्ही विकारामुळें बरीच गडबड उडालेली असते. त्या प्रसंगाचें—विशेषतः सामान्यगृहस्थितींतील कुटुंबांतल्या लोकांचें—या वर्णनांत सुरेख चित्र रेखिलें आहे. स्वतः कण्वाच्या घरीं बायकोमनुष्य नसल्यानें शेजारच्या तापसस्त्रियांनीं येऊन पाठवणीची व्यवस्था केली आहे.

शकुंतला आसनावर बसलेली होती व तिच्यां आसपास दुसऱ्या पोक्त तापसस्त्रिया बसलेल्या होत्या, तेथें अनसूया व प्रियंवदा दोघीही पोहोंचल्या. एका तापसीनें शकुंतलेला ह्मटलें, ' बाळे, भर्ता तुझा बहुमान करो आणि तुला महादेवी—

पट्टराणी-पद प्राप्त होवो!' दुसरी ह्मणाली, 'मुली, तुला पुष्कळ वीर असे पुत्र होवोत.' तिसरीनें अशीर्वाद दिला, 'बाळे, भर्त्याकडून तुझा बहुमान होवो.'

याप्रमाणें आशीर्वाद देऊन व शकुंतलेची ओटी भरून गौतमीशिवाय साऱ्या तापसस्त्रिया निघून गेल्या.

तोंच दोघीही सख्यांनीं पुढें येऊन हर्षानें शकुंतलेला ह्मटलें, 'सखे, हें मंगलस्नान तुला सुखाचें घडो.'

शकुंतलेनें आनंदानें व उत्सुकतेनें त्यांचें स्वागत करीत ह्मटलें, 'सख्यांनो, या, बऱ्या आलां. अशा इकडे बसा.'

नंतर दोघीही तिच्याजवळ बसल्या आणि बरोबर अणिलेलें मंगल सामान पुढें करून तिला ह्मणाल्या, 'गडे, चांगली स्वस्थ बैस. आह्मी तुला हे मंगल अलंकार घालतों.'

शकुंतला—'आज तुह्मी माझी वेणीफणी करून मला अलंकार करवितां. याची मी भारीच किंमत समजतें. मी येथून गेल्यावर मला ही तुमच्या हातची प्रेमळ सेवा कधीं व कशानें मिळणार?' त्यांचा आपल्याला वियोग होणार याबद्दल तिला खेद होऊन तिच्या डोळ्यांना पाणी आलें.

दोघींनींही तिचें समाधान करीत ह्मटलें, 'गडे, अशा या मंगल समयीं रडावें काय?' असें त्यांनीं नुसतें तोंडानें ह्मटलें, पण त्यांनाही या होणाऱ्या वियोगाबद्दल वाईट वाटत होतेंच, त्यामुळें त्यांच्याही डोळ्यांना पाणी आलें.

यांत कवीनें मनुष्यस्वभावाचें वास्तविक चित्र मोठ्या खुबीदारीनें रेखलें आहे. एखाद्या वस्तुतः आनंदाच्या प्रसंगीं भावी विरहामुळें परस्पर खेद होत असतो, पण तो विरह एकपक्षीं सुखसाधक असल्यानें त्याबद्दल खेद-निदान मोकळेपणीं—बाह्यतः दाखविणें नीट नाहीं. अशा समजुतीनें पोक्तपणें दुसऱ्याला सांगत असतांना आपल्याही मनाची साहजिक तशीच प्रवृत्ति झालेली असते. तिचा परिणाम आवरतां येत नाहीं असें प्रत्यहीं पाहण्यांत येतें. पण याच्यांतील मर्म लक्षांत घेऊन त्याचें प्रसंगोचित वर्णन करणें सर्वांनाच साधतें असें नाहीं.

प्रियंवदा—'या इच्या रूपाला उंची अलंकार हवेत. पण त्याला येथें आश्रमांत मिळतील तसल्या साधनांनीं कसें तरी साजरें करावयाचें झालें.' इच्या अप्रतिम रूपाला कसे छानदार अलंकार व आभरणें पाहिजेत, पण तीं येथें या आश्रमांत कोठून मिळणार? येथें सहज प्राप्त होणाऱ्या साधनांनीं इला कसें तरी अलंकृत करावयाचें आहे.

हें पुढें आश्रमांतच अलौकिक प्रभावानें अलंकार प्राप्त होण्याचें सूचक आहे.

इतक्यांत दोघे ऋषिकुमार आले आणि अलंकार व अहेर देत ह्मणाले, 'हे अलंकार—यांनीं ताईला अलंकृत करा.'

प्रियंवदेनें अलंकारांसंबंधानें बोलण्याचा अवकाश, तों ते हजर झाले. असें दाखविण्यांत कवीनें आश्रमांतील अलौकिक सिद्धीचें निदर्शन केलें आहे.

ते अलंकार आलेले पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलें आणि गौतमीनें ह्मटलें, 'बाळा मारीच्या, हे रे कोठून आणलेस?'

ऋषिकुमार—'काश्यपबाबांच्या प्रभावापासून.'

गौ०—'काय! हा त्यांच्या मानसिक सिद्धीचा प्रभाव?'

ऋषिकुमार—'तसेंच केवळ नव्हे—ऐका! यांनीं आह्माला ताईसाठीं झाडांवरून फुलें काढून आणण्याला सांगितलें. तसे आह्मी गेलों. तों ही शुभ्र चांदण्यासारखी आणि मंगलदायक

झालमोडी एका वृक्षाकडून मिळाली, आणि चरणाला लावण्याला अप्रतिम योग्य असा हा लाक्षारस दुसऱ्या एका तरूपासून मिळाला. त्याचप्रमाणें निरनिराळ्या वृक्षांच्या शाखामुळांतून कोमल किसलयाप्रमाणें मनोहर भासणारे वनदेवतांचे हात वर आले व त्यांच्याकडून हे दागिने मिळाले आहेत.'

शकुंतला सासरीं जाणार ह्मणून आश्रमांतील मुनिजनांनीं तिची पाठवणी करण्याकरितां हे निरनिराळे जिन्नस--वस्त्रालंकार--आपापल्याजवळून आश्रमांतील विवक्षित झाडांना टांगून ठेवलेले काढून दिले, किंवा खरोखरच कांहीं अलौकिक प्रकार होऊन हे सर्व पदार्थ आयते वेळीं तेथें शकुंतलेची माता मेनका अप्सरा ईच्या सख्या वनदेवता व अप्सरा यांनीं आणून दिले, असेंही मानतां येईल. कवीनें कण्वाश्रमाची महती व्यक्त करण्याकरितां ज्या अनेक युक्ति सहजपणें योजिल्या आहेत त्यांपैकींच ही एक होय.

हें ऐकून शकुंतलेकडे पहात प्रियंवदेनें हर्षानें ह्मटलें,--'गडे, या अकल्पित अनुग्रहावरून तुला नवऱ्याच्या घरीं उत्तम राजलक्ष्मी व वैभव खास मिळणार--समजलीस?'

नवऱ्याच्या घरच्या स्थितीसंबंधाचें हें भाषण ऐकून अर्थातच शकुंतलेला समाधान झालें व ती लाजल्यासारखी झाली.

ऋ० कु०--'गौतमा, चल चल, काश्यप बाबांचें माध्यान्हस्नान आटोपलें असेल. त्यांना ही वनस्पतींनीं केलेली सेवा सांगूं.' असें ह्मणून ऋषिकुमार निघून गेले.

अनसूया व प्रियंवदा ह्मणाल्या, 'बाई, हीं भूषणें कधीं घालण्याचा प्रसंग किंवा अनुभव आह्मांला नाहीं. केवळ चित्रांतला काय तो परिचय--त्याप्रमाणें तुला ते घालतों.'

शकुंतला--'मला तुमचें नैपुण्य ठाऊक का नाहीं?'

हीं दोन्हीं भाषणें सख्या व शकुंतला यांचा परस्पर स्नेहभाव व प्रेम उत्तम व्यक्त करणारीं आणि प्रसंगाला शोभणारीं अशीं आहेत.

नंतर त्या सख्या शकुंतलेला दागिने घालूं लागल्या. इकडे कण्व स्नान संध्या उरकून शकुंतलेची पाठवणी करण्याला येतां येतां ह्मणाला--

'आज शकुंतला जावयाची ह्मणून माझें हृदय उत्कंठित, दुःखानें ऊर भरून आल्यानें गळा दाटून गेलेला, आणि चिंतेमुळें दृष्टि मंद झालेली--अशी माझी स्थिति झाली आहे. मी अरण्यांत राहणारा इच्या स्नेहामुळें असा विकल झालों, तेव्हां गृहस्थ लोकांना नवीनच कन्याविरहदुःखामुळें किती तरी पीडा होत असेल!'

[कण्वासारख्या पवित्र व पोक्त ऋषीला सर्वथैव साजे असेंच हें त्याचें पहिलेंच भाषण आहे. या नाटकांत चौथा अंक अप्रतिम व त्यांतही चार श्लोक बिनमोल मानले जातात; त्यांपैकीं हा अव्वल श्लोक आहे. याची भाषासरणी, यांतील प्रसाद, सर्व कांहीं विलक्षण मनोहर आहे. कन्याविरहासंबंधाचें प्रथमवेळचें दुःख कसें असतें याचा आजकालच्या गृहस्थितींतही चांगलासा अनुभव पुष्कळांना मिळत नाहीं असें नाहीं. पण त्यासंबंधाचें असें उत्तम वर्णन मात्र इतरत्र आढळत नाहीं.]

असें आपल्याशींच बोलत तो शकुंतलेपाशीं येत होता.

दागिने घालणें झाल्यावर सख्यांनीं सांगितल्याप्रमाणें शकुंतलेनें उभी राहून शालमोडी अंगावर घेतली.

गौतमी--'हे पहा, आनंदानें भरून आलेल्या नेत्रांच्या दृष्टिप्रवाहानें जणों तुला आलिंगनच

देत बाबा येताहेत, त्यांना जाऊन भेट,—नमस्कार कर.' शकुंतलेनें लाजत लाजत पुढें होऊन 'बाबा मी नमस्कार करितें—' असें म्हणत नमस्कार केला.

कण्वानें तिला आशीर्वाद देत म्हटलें, 'बाळे, ययातीला शर्मिष्ठा, तशी तूंही स्वपतीला मान्य हो. आणि तिच्या पुरु पुत्राप्रमाणें तुलाही सम्राट् पुत्र प्राप्त होवो.'

अति प्रसिद्ध असा ययाति राजा पौरवांचा मूळपुरुष झाला व त्याच्याहूनही एका हिशेबीं कांकणभर जास्तच असा त्याचाच योग्य व प्रिय पुत्र पुरू होऊन गेला. त्याच्यावरूनच त्या वंशाला हें नांव मिळालें. ययातीला इतर स्त्रिया होत्या, त्यांतच भृगुकन्या देवयानीसारखी मानी व गुणी स्त्री होती. तरी त्यानें केवळ अप्रतिम प्रेमामुळें शर्मिष्ठेशीं विवाह केला होता. म्हणून देवयानीच्या आग्रहावरून शुक्रानें त्याला शाप दिला. पुढें त्या शापापासून, स्वयौवनदानानें त्याला त्याचा पितृभक्त पुत्र पुरु यानें मुक्त केलें.

या ठिकाणींही कवीनें कण्वाच्या मुखीं हा अन्वर्थक आशीर्वाद किंवा वर घातलेला आहे.

त्याचा भाव जाणून गौतमीनें कण्वाचें यथायोग्य गौरव करीत म्हटलें, 'भगवन्, हा नुसता आशीर्वाद नव्हे, आपला वरच—कधीं व्यर्थ होणार नाहीं.'

या भाषणांतील गर्भित स्तुतीकडे लक्ष दिलें न दिलेंसें करून कण्वानें शकुंतलेला म्हटलें—

'बाळे, या आतांच होम दिलेल्या यज्ञाग्नींना प्रदक्षिणा कर.' त्याप्रमाणें अग्निकुंडांना प्रदक्षिणा घालतां घालतां कण्वानें ऋक्छंदानें आशीर्वाद देत म्हटलें,—

'या वेदीच्या आसमंतात्भागीं ज्यांचीं स्थानें आहेत व ज्यांच्यावर नुकत्याच समिधा टाकल्या आहेत व प्रांतभागीं दर्भ पसरलेले आहेत असे हव्य गंधानें दुरिताचा फडशा करणारे ते तुला पावन करोत.'

कण्वाच्या यज्ञ यागादिक कर्मांतील अधिष्ठातृरूप प्रमुख देवता अग्नि. तोही त्यानें स्वतःच नुकताच उपासना केलेला—असा तो तुझ्या पातकाचा नाश करून तुझें पावन करो, असा त्यानें आपल्या आवडत्या कन्येला आपल्या परिस्थितीस अनुरूप आशीर्वाद दिला आहे.

मूळांत असा प्रसंग खराच आला असता तर कण्वानें अशा अर्थाची एखादी अनुरूप ऋचा म्हणूनच आशीर्वाद दिला असता. परंतु रंगभूमीवर हरतऱ्हेच्या प्रेक्षकांसमोर प्रयोग व्हावयाच्या नाटकांत अस्सल ऋचा घालणें निषिद्ध आहे, हें जाणूनच कवीनें ही कृत्रिम ऋचा घातली आहे; व ती अस्सलासारखीच वठविली आहे. यावरून कालिदासाच्या मनांतील वेदाविषयींचा यथायोग्य आदर बराच व्यक्त होतो. तरी त्या आदरामुळें त्यानें आपल्या नाटकाला दोष येऊं दिलेला नाहीं.

'चला निघावें आतां—' असें म्हणून पुनः त्यानें मागें पहात म्हटलें, 'ते शार्ङ्गरवादिक कोठें आहेत?'

यावर ते पुढें होऊन त्यांतील एकानें म्हटलें, 'भगवंता, हे आम्ही तयार आहों.'

कण्व—'आपल्या बहिणीला मार्ग दाखीव.'

नंतर शार्ङ्गरवादिकांच्या मागें सर्वजण निघाले. थोडे दूर गेल्यावर कण्वानें म्हटलें, 'हे तपोवनांतील तरुवरांनो! तुमच्या ठिकाणीं इचें इतकें प्रेम आहे कीं, तुम्हाला पाणी देण्यापूर्वीं ही स्वतः कधीं पाणी पीत नसे; पल्लव तोडल्यानें तुम्हाला दुःख होईल म्हणून, इला अलंकारास्तव पल्लव घेणें मनापासून आवडत

अजूनही जी तुमच्या पल्लवाला धक्का लावीत नसे; आणि तुह्माला प्रथमच पुष्पांचा बहार आलेला पाहून तिला अतिशयच उत्सव वाटे;— ती ही तुमची शकुंतला सासरीं चालली आहे. तिला तुह्मी सारे निरोप द्या कसे.'

हाही श्लोक या अंकांतील चार उत्तम श्लोकांत गणला जातो, व तशीच त्याची योग्यता आहे. याच्यांत ध्वनी व प्रसाद हे गुण किती तरी भरले आहेत. याच्यांत शकुंतलेचें नैसर्गिक सौजन्य व मनाचा मृदुपणा व प्रेम उत्तम व्यक्त केलें आहे.

इतक्यांत कोकिलांचा शब्द ऐकूं आला. त्यावर कण्वानें ह्मटलें—

या इच्या वनवासबंधु तरूंनीं इला जाण्याला या मधुर कोकिलांच्या शब्दांच्या द्वारेंच जणों अनुमत दिलें आहे.'

आपण सर्व तरुवरांना शकुंतलेला निरोप द्या असें ह्मटलें, त्याला मान देऊनच जणों त्यांनीं मधुर कोकिल शब्दाच्या द्वारानें हें तिला अनुमोदन दिलें, असें कण्वानें सुचविलें आहे.

साहजिक घडलेली गोष्ट आपल्या इष्ट हेतुला अनुकूल व बुद्ध्या घडली असें दाखविण्यांत विशेष खुबी व अलंकार दिसतो; तो या ठिकाणीं कवीनें उत्तम साधला आहे.

त्याचप्रमाणें दुरून शब्द झाला कीं, 'जागजागीं कमलिनीच्या योगानें हिरवींगार व रमणीय दिसणारीं सरोवरें, आणि छायादार वृक्ष यांच्या योगानें इला वाटेंत सूर्य किरणांचा ताप कमी होवो; कमलरजांप्रमाणें मृदु वाळू इच्या पायांना सुखकर लागो; आणि वारा शांत, अनुकूल व थंड असा लागून इचा मार्ग इला कल्याणदायक होवो.'

वाटेनें चालणाऱ्याला आसपास रूक्ष व खरखरित भूमि, प्रखर उष्णताप, उंचसखल व वेडावांकडा खडेकंकर असलेला मार्ग, त्रासदायक जोराचा उष्ण वारा, आणि मार्गांत इतर तऱ्हेच्या अडचणी येणें,—इतक्या गोष्टींपासून त्रास व्हावयाचा, तो आसपास हिरव्यागार कमलपत्रांनीं आच्छादित लहान मोठीं सरोवरें, दुतर्फा लागलेले छायादार वृक्ष, मृदु रेती, आणि मंद व शीतल वायु यांच्या योगानें पार नाहींसा होऊन, प्रवास सुखानें होतो:—हें सर्व शकुंतलेला प्राप्त होवो, अशा तऱ्हेचें आशीर्वादात्मक हें भाषण आहे. तें प्रसंगोचित व अप्रतिम आहे, हें निराळें सांगणें नकोच.

हें अनुकूल व आकाशवाणीसारखें भाषण ऐकून सर्वांना सानंद विस्मय वाटला.

गौतमी—'बाळे, या वनदेवतांचें तुजवर कुटुंबांतल्या माणसासारखें प्रेम आहे. त्यांनीं तुला यावेळीं याप्रमाणें आशीर्वादपूर्वक जाण्याला संमति दिली, हा शुभ शकुन आहे. त्यांना नमस्कार कर.'

तसें करून ती चालूं लागली. तिनें एकीकडे प्रियंवदेला ह्मटलें, 'गडे प्रियंवदे, त्यांच्या दर्शनासाठीं मी उत्सुक झालें आहे. तरी हा आश्रम सोडण्याला पाय मोठ्या कष्टानें उचलताहेत.' प्रियदर्शन व प्रियसमागम यांविषयीं मी मोठी उत्सुक झालेली आहें, तरी बालपणापासून सुखाचा सहवास घडलेल्या या आश्रमाला सोडून जाण्याला मला कसेंसेंच वाटतें. पाऊल उचलत नाहीं.

प्रियंवदा—'विरह होणार ह्मणून तूंच केवळ कष्टी झाली आहेस असें नाहीं. तुझ्या विरहामुळें या तपोवनाची सुद्धां तशीच स्थिति झाली आहे. या हरिणींच्या तोंडांतून गवताचे घास गळून पडताहेत, मयूरींनीं नाचणें सोडलें

आहे, आणि या लता जशा, त्वद्विरहामुळें, गळणाऱ्या पानाच्या रूपानें टपटप अश्रु गाळताहेत.'

हेंही वर्णन कसें सुरेख आहे. वस्तुतः वर्णित गोष्टींचा शकुंतलेच्या गमनाशीं कांहींच संबंध नसला तरी त्या मोठ्या चतुराईनें सहजपणें तिच्या विरहामुळेंच होताहेत, असें सुचविलें आहे; आणि हेंही वर्णन प्रियंवदा विशेष चटकदार असल्यानें तिच्याच तोंडीं घातलें आहे—अधिक पोक्त व भारदस्त अशा अनसूयेच्या तोंडीं नाहीं.

थोडेंसें स्मरण झाल्यासारखें दाखवून शकुंतला ह्मणाली—'बाबा, माझ्या भगिनी वनज्योत्स्नेचा निरोप घेऊन येतें.'

काश्यप—'तिच्यावर तुझें सख्या भावंडाप्रमाणें प्रेम मी जाणतों. ही पहा ती उजवीकडे जवळच आहे.'

शकुंतलेनें तिच्याजवळ जाऊन ह्मटलें,—'गडे वनज्योत्स्ने, तूं या आम्रतरूशीं संगत झाली आहेस, तरी या इकडल्या शाखांनीं मला आलिंगन दे! आजपासून मी तुजपासून दूर होणार.'

हेंही भाषण किती सरस व प्रेमळ आहे.

कण्व—'मी पूर्वीपासूनच योजून ठेवलेल्या योग्य वराशीं तुझ्या सुदैवानें तुझा समागम झाला. तशीच ही नवमालिका, इलाही या आम्रवृक्षाचा आश्रय मिळाला. मला आतां तुह्मां दोघींविषयींही कांहीं काळजी उरली नाहीं. अशी इकडून चालूं लाग.'

कण्वाच्या या किंवा पुढील कोणच्याही भाषणांत शकुंतलेला राजाकडे गेल्यावर सोसाव्या लागणाऱ्या प्रतिषेधाची सूचना किंवा भविष्यत् ज्ञान याचा यत्किंचितही उल्लेख नाहीं. यावरून घडलेला प्रकार त्याला संमत व मंजूर तर झालाच. पण त्याबद्दल त्याच्या मनांत कांहीं आकांक्षा आली होती असें सुद्धां ह्मणतां येत नाहीं.

शकुंतला—'सख्यांनों, इला मी तुमच्या हातीं सोंपतें.'

तिला त्यांनीं तत्काळ कळवळ्यानें विचारिलें, 'आणि आह्माला ग कोणाच्या हातीं सोंपतेस?' हें बोलतां बोलतां त्यांना गहिंवर आला व त्यांच्या डोळ्याला खळदिशीं पाणी आलें.

हीं दोन्हीं भाषणें फारच मार्मिक असून त्यांतील व्यंग्य व विचार अप्रतिम आहेत.

कण्वानें त्यांचें समाधान करीत ह्मटलें,—'अनसूये, पुरे—रडावें काय!—अगे तुह्मीच शकुंतलेचें समाधान व समजूत करावयाची.' पुनः सर्वजण चालू झाले.

थोड्या वेळानें शकुंतला ह्मणाली, 'बाबा, ही पूर्णगर्भभारामुळें हळूहळू उटजाच्या जवळपासच फिरणारी माझी हरिणी, इची सुखानें सुटका झाल्याचें आनंदाचें वर्तमान मला कळविण्याकरितां कोणाला तरी पाठवा आँ.'

कण्व—'बाळे, हें मी विसरणार नाहीं बरें.'

या वेळीं शकुंतला गर्भार होती. आपल्या प्रिय हरिणीची—आपल्याच सारखी स्थिति असल्याचें पाहूनच जणों तिनें याप्रमाणें कण्वाला तिच्या सुखप्रसूतीसंबंधें कुशल कळविण्यास्तव कोणाला तरी पाठवा असें ह्मटलें; आणि त्यांतच स्वतःच्या संबंधेंही एतद्विषयक सूचन केलें आहे.

किंचित् अडखळून, 'अगबाई! हें कोण माझ्या पायांमध्यें ओच्याला लुडबुडतें आहे?' असें ह्मणत शकुंतलेनें सहज खुबीनें मागें वळून पाहिलें.

तों तिला कण्वानें उत्तर दिलें—'बाळे, ज्याच्या तोंडाला तीक्ष्ण दर्भाग्रांनीं झालेले व्रण तूं आपल्या हातानें इंगुदीचें तेल लावून बरे केलेस, आणि ज्याला साव्यांच्या मुठी मुठी चारून वाढविलेंस,

तो तुझा कृतक पुत्र हा मृग तुझे पाय सोडीत नाहीं.'

याच्यांत कण्वानें सहजपणें शकुंतलेच्या मनाचें नैसर्गिक कोमलत्व आणि त्याच्यामुळें तिनें केलेली पोरक्या मृगाची जोपासना, व तत्परिणामी मृगाचा तिजविषयींचा लळा व ओढा इत्यादिकांचें सुरेख वर्णन व सूचन केलें आहे.

यावर शकुंतलेनें कांहींसें कळवळ्यानें व गहिंवर येऊन ह्मटलें, 'बाळा, मी तुझा सहवास सोडून चाललेली—माझ्यामागें कशाला बरें येतोस? तूं जन्मतांच तुझी माता तुला सोडून गेली, तरी तुझें पाळणपोषण झालें. तसें मी गेल्यावरही बाबा तुझी काळजी घेतीलच. तर परत जा कसा.' असें ह्मणतांना तिला गहिंवर न आवरल्यामुळें रडूं आलें. ती त्याला मागें परतवून निघाली.

या शकुंतलेच्या भाषणांत कवीनें तिचें स्वाभाविक सौजन्य व मनाचें मार्दव सहज व अप्रतिम व्यक्त केलें आहे.

ही तिची स्थिति पाहून कण्वानें ह्मटलें—'बाळे, तुझे उघडलेले डोळे अश्रुजलानें फार भरलेले असल्यानें दृष्टि मंद होऊन तुला हा उंच सखल मार्ग नीट दिसत नाहीं व तुझीं पावलें अडखळताहेत, तेव्हां मन घट्ट करून हा अश्रुप्रवाह बंद कर.'

हें वर्णन सहजपणें तर केलेलें आहेच, पण त्यांत शकुंतला गर्भवती असल्यामुळेंही तिला वाटेंत पावलें अडखळूं न देण्याबद्दल कण्वानें सुचविलें आहे असें दिसतें.

सर्व मंडळी आपसांत बोलत व निरोप घेत व देत चाललेली होती. ती आश्रमापासून बरीच दूर आली तरी परतत नाहीं, व असेंच बोलत राहिलें तर व्यर्थ उशीर होणार, असें पाहून शार्ङरवानें ह्मटलें, 'भगवंता, स्नेहीमंडळीला उदकाशयापर्यंतच पोहोंचविण्याला जावें, असें शास्त्रांत सांगितलें आहे. तेव्हां हा सरोवराचा तीर—येथेंच निरोप देऊन आपण परत जावें.'

कण्व—'बरें तर, या वडाच्या छायेखालीं थोडा वेळ थांबूं.' सर्वांनीं तसें केल्यावर कण्व 'आपणाला व ह्या दुष्यंत राजाला शोभे असा कोणचा बरें निरोप धाडावा?' असा विचार करूं लागला.

शकुंतला एकीकडे अनसूयेला ह्मणाली, 'गडे, पहा तर खरें! या चक्रवकीला तिच्या व तिच्या सहचराच्या मध्यें नुसतें हें नलिनीपत्र थोडा वेळ आड आलेलें खपत नाहीं. तिनें कोण टाहो चालविला आहे. आणि मी—मला इतके दिवसांचा प्रियविरह झाला आहे, तरी निष्ठुरपणें स्वस्थशी आहें!'

तिचें समाधान करीत तसेंच अनसूयेनें ह्मटलें, 'नाहीं, असें नको ह्मणू! विरहदुःख कठिण तर खरेंच. पण तें भावी सुखाशा असली ह्मणजे सोसवतें. या चक्रवाकीला हा तात्पुरता नलिनीपत्र आड आल्यानें झालेलाच विरह होतो आहे असें नाहीं. तिला याहूनही दीर्घ असा साऱ्या रात्रीचा विरह सोसावा लागतो. तो ती पुनः दिवसा प्रियसमागम होईल या आशेवर सोशीत असते.'

कण्व—'शार्ङरवा, शकुंतलेला पुढें करून त्या राजाला मजकडून असें सांगः—आह्मी तापस. मनोनिग्रह हेंच आमचें धन. याविषयीं नीट विचार कर. (शकुंतलेशीं असें वर्तन ठेव कीं ज्यामुळें आमचा संयम—मनोनिग्रह—चळण्याचा प्रसंग न येई. ही एक तऱ्हेनें राजाला कण्वानें आपल्या खऱ्या योग्यतेची चुणुक दर्शविली आहे. अयोग्य वर्तन करशील तर आमच्या संयमवनाला धक्का बसून कदाचित् तुझेंही नुकसान होईल.) तुझें कुल फारच थोर. (शकुंतलेचा

अनादर केल्यास किंवा तिला नीट न वागविल्यास तुझ्या थोर कुलाला बट्टा लागेल.) तिची तुझ्या ठायीं प्रवृत्ति झाली ती कशी केवळ स्वाभाविकपणानें. कोणी दुसऱ्या बांधवजनांनीं प्रेरणा केल्यामुळें नव्हे; या सर्व गोष्टी लक्षांत आणून निदान तुझ्या इतर दारा आहेत त्यांच्या इतपत तरी तिला वागीव ह्मणजे झालें. याहून अधिक गोष्टी किंवा स्थिति भाग्याधीन. त्याच्याविषयीं वधूच्या बांधवांनीं जास्तीकमी सांगणें ठीक नाहीं.'

हा कण्वानें राजाला पाठविलेला निरोप किती प्रौढ, योग्य व खरा स्वाभिमानद्योतक आणि हवा तसा बेताचा आहे, हें प्रत्येक वाचकाच्या तेव्हांच लक्षांत येईल. त्याच्यांत त्यानें राजाला शकुंतलेसंबंधें खऱ्या स्थितीची सूचना दिली आहे; व तिच्याशीं निदान आपल्या इतर विवाहित स्त्रियांइतपत वर्तन न ठेविलें तर जड जाईल, असेंही ध्वनित केलें आहे.

हाही श्लोक उत्तमांतला आहे.

शार्ङ्गरव—'हो, निरोप लक्षांत आला.'

कण्वानें शकुंतलेकडे वळून ह्मटलें, 'वत्से! या वेळीं तुलाही उपदेश केला पाहिजे. आह्मीं वनांत रहाणारे, तरी लौकिक व्यवहार आह्मांला माहीत आहे.

'तूं सासरीं चाललीस. साऱ्या आयुष्यांत तुला हा अत्यंत महत्वाचा प्रसंग. तेथें त्वां कसें वागावें व काय करावें याविषयीं तूं तेथें एकटीच राहणारी असल्यानें वेळोवेळीं सांगणारा कोणी मिळणार नाहीं. सबब तुला आतांच सांगून ठेवतों.'

यावर त्याची तारीफशी करीत शार्ङ्गरवानें ह्मटलें, 'बुद्धिवानाला समजत नाहीं असें काय आहे?'

आपल्यासारखे बुद्धिमान—त्यांना व्यवहारातल्या वगैरे गोष्टी समजत नाहींत अशा कोणच्या? साऱ्या गोष्टी समजतात.

कण्व—'तूं सासरीं गेल्यावर सासरच्या वडील माणसांची सेवा कर. सवतीशीं न भांडतां प्रियसखीसारखी वाग. पतीवर रुसून किंवा रागावून त्याच्याविरुद्ध वागूं नको. सेवक जनांवर नेहेमी पुष्कळशी दया व कृपा कर. स्वपरभाग्याधिक्य पाहून गर्विष्ट किंवा कष्टी होऊं नको. अशा रीतीनें वागणारीलाच गृहिणी ह्मणतात आणि उलट वागणाऱ्या खरोखर कुलाला कलंक लावणाऱ्या होतात.—गौतमी तुला कसें काय वाटतें?'

नवीनच सासरीं जाणाऱ्या तरुण मुलींना हा उपदेश सर्व तऱ्हेनें योग्य व परिणामीं सुखकर असा आहे, हें कोणाच्याही तेव्हांच लक्षांत येईल. हल्लीं कालपरत्वें बालविवाहाची चाल पडल्यामुळें मुलींना बहुधा तरुणपणींच प्रथम सासरीं जाण्याचा प्रसंग क्वचित् येतो. यामुळें त्यांना प्रथमच हा उपदेश तितका उपयोगी पडण्यासारखा नाहीं. तरी पुढें त्यांना खरें यथार्थपत्नीत्व प्राप्त झाल्यानंतर त्यांनीं याप्रमाणें वर्तन ठेविलें तर त्यांना सर्व तऱ्हेनें सुख होणार आहे. उपदेशपर सुभाषित या नात्यानें सुद्धां हा श्लोक अप्रतिम साधला आहे.

हा सर्व बायकांच्या व्यवहाराचा विषय. तिनें—मुलीच्या आईनें—याबद्दल तिला उपदेश करावयाचा. आईच्या अभावीं घरांतील दुसऱ्या वडील बायकांनीं. तेव्हां आपण सांगितल्याप्रमाणेंच गौतमीचेंही ह्मणणें पडतें किंवा नाहीं, हें पहाण्याकरितां आणि तिलाही मोठेपणा देण्याकरितां कण्वानें तिला हा प्रश्न केला आहे.

गौतमी—'विवाहित मुलींना हा इतका उपदेश हवाच. बाळे, हें सारें नीट लक्षांत ठेव बरें.'

नंतर कण्वानें शकुंतलेला आपणांला व सख्यांना भेटण्याला सांगितलें—तेव्हां तिनें—'या प्रियंवदा वगैरे मैत्रिणी येथूनच कां परतणार?' असें विचारितां त्यानें ह्मटलें—'मुली, यांचीही लग्नें व्हावयाचीं आहेत. ( त्यांनीं तेथें जाणें योग्य नाहीं. त्या कुंवार असल्यानें तुजबरोबर येणें योग्य नव्हे. ) तुजबरोबर गौतमी जाणार.'

हल्लीं सुद्धां नवीनच सासरीं जाणाऱ्या मुलीबरोबर पाठराखणी पाठविण्याची चाल आहे. पाठराखणी बहुधां पोक्त व प्रौढ विवाहित बाई असते. त्याप्रमाणेंच गौतमीचीही शकुंतलेबरोबर रवानगी केलेली दिसते.

नंतर शकुंतलेनें पित्याला आलिंगन देत ह्मटलें, 'बाबा, आपल्या अंकापासून भ्रष्ट होऊन आतां मी दूर देशांत जाणार—तेथें माझे प्राण कसे बरें राहातील? मलयपर्वतापासून भ्रष्ट झालेली चंदनलता नष्ट होते तद्वतच माझी अवस्था नाहींका होणार?'

प्राचीन कवींनीं चंदनाच्या झाडाला प्रसंगविशेषीं लता ह्मटलें आहे. पण हें बरोबर नाहीं. मलयपर्वतावर चंदनाचे मोठमोठे वृक्ष असतात.*

तिला धीर देत कण्वानें ह्मटलें, 'बाळे, अशी भितेस कां? तूं सासरीं गेल्यावर थोर, कुलीन, व गुणी भर्त्याजवळ आवडती गृहिणी—पट्टराणी—होत्साती क्षणोक्षणीं त्याच्या वैभवाला अनुरूप महत्वाचीं कार्यें करण्यांत दंग राहशील, आणि पूर्व दिग्वधूच्या पोटीं भाग्यशाली रविमंडलरूपी पुत्ररत्न उत्पन्न होतें तद्वत् लौकरच तुझ्या पोटीं पावन असा पुत्र होईल. आणि माझ्या विरहापासून होणाऱ्या शोकाचें तुला फारसें जड वाटणार नाहीं.'

* मूळांत 'तरु' पद नाहीं; व कांहीं प्रतींत असेल तर मलयपर्वतापासून तोडलेली 'चंदनलता' 'चंदनाची फांदी' असा अर्थ करितात.

हाही श्लोक एकाअर्थी भावी गोष्टींच्या कथनपर व आशीर्वादपर असा फारच चांगला साधला आहे. याच्यांत प्रसादगुण विशेष आहे आणि तो कण्वासारख्या महर्षींच्या तोंडीं सर्व तऱ्हेनें शोभे असाच आहे.

नंतर शकुंतला पित्याच्या पायां पडली. त्यानें तिला, 'माझी इच्छा आहे तें तुला प्राप्त होवो.'—असा आशीर्वाद दिला. हा आशीर्वादही मोघमच ठेविला आहे. कारण कण्वासारख्या महर्षींच्या तोंडीं सामान्य लौकिक गोष्टीसंबंधें आशीर्वाद घालणें योग्य नव्हे. ह्याच्या थोर व प्रौढ विचाराप्रमाणें शकुंतलेला ज्या ज्या श्रेयस्कर गोष्टी प्राप्त होणें अवश्य त्याबद्दल त्याच्या तोंडून मोघम आशीर्वाद मिळाला आहे.

शकुंतला सख्यांजवळ जाऊन, 'दोघीही मला एकदमच आलिंगन द्या,' असें ह्मणाली. त्याप्रमाणें त्यांनीं करून तिला ह्मटलें, 'गडे, कदाचित् राजानें तुला ओळखण्यांत विलंब लागला तर त्याला ही त्याच्या नांवची अंगठी दाखीव.'

शकुंतला आतां बहुतेक निघाली असें पाहून अगदीं शेवटीं असा हा तिच्या सख्यांनीं तिला निरोप सांगितला. तोही फक्त तिलाच. गौतमी, शार्ङरव, कण्व इत्यादिकांना ऐकूं जाई असा नव्हे. तो ऐकून शकुंतलेनें साशंकपणें ह्मटलें, 'या तुमच्या संशयाच्या भाषणानें मला बाई कसें कांपविलें आहे!'

सख्यांनीं उत्तर दिलें, 'अगे, भिऊं नको. स्नेहामुळें भलत्याच शंका मनांत येतात.' स्नेही असले ह्मणजे त्यांच्या मनांत आपल्या प्रिय मित्राला अमुक झालें असेल तमुक झालें असेल अशा व्यर्थ नानातऱ्हेच्या भीतिदायक शंका येत असतात.

असें सख्यांनीं तिचें समाधान केल्यावर शार्ङरवानें कांहींसें घाई करीत ह्मटलें, 'सूर्य चार हात वर आला. बराच उशीर झाला. आतां लौकर आटपा चला.'

शकुंतलेनें आश्रमाकडे पाहून ह्मटलें, 'बाबा, मला पुनः केव्हां बरें हें तपोवन पाहण्याला सांपडेल ?।'

अलीकडच्या मुली प्रथम सासरीं जातांना आईला किंवा बापाला—मला कधीं आणवाल—असें विचारीत असतात त्याचेंच हें उत्कृष्ट रूप आहे.

कण्व—'ऐक. आतां येथून गेल्यावर तूं दुष्यंताची पट्टराणी होशील. सारी सागरान्त मही तुझी सवत होईल. तुझ्या पोटीं अप्रतिरथ पुत्र होईल. पुष्कळ दिवस राज्यसुखोपभोग घेतल्यावर तुह्मी पृथ्वीचें राज्य व पौरवकुल यांचा भार पुत्रावर सोपवून शांत व स्वस्थ होत्साते पुनः अखेरचे दिवस घालविण्यासाठीं या आश्रमांत परत याल.'

कण्वानें हें जणों सहजपणें शकुंतलेच्या भावी सुखकर स्थितीचें वर्णन केलें आहे. तें आशीर्वादपरही घेतां येण्याजोगें आहे.

गौतमी,—'बाळे, निघण्याला उशीर होतो. बाबांना परत जा ह्मणावें. (कण्वास)—किंवा, ही अशीच किती वेळ तरी हेंच ह्मणणार—तेव्हां आपणच परता आतां.'

शार्ङरव व गौतमी यांना पुढील मार्ग कंठण्याची काळजी लागलेली—दिवस वर येऊन ऊन अधिक होत जाईल तसा आपणालाच जास्त त्रास होणार. यामुळें जास्त चेंगटपणा होऊं देणें योग्य नाहीं, असें वाटून त्यांनीं हीं अशीं भाषणें केलीं आहेत. शकुंतला व कण्व यांचीं या वेळचीं भाषणें अत्यंत हृदयंगम आहेत. यामुळें वाचकांचीं व प्रेक्षकांचीं मनें त्यांच्यांत तल्लीन होऊन त्यांना सुद्धां होत असलेल्या कालातिपाताचें भान नाहींसें होतें. तेव्हां शकुंतलेला तसें होण्यांत आश्चर्य नाहीं. पण वस्तुतः ज्यांचें लक्ष मार्ग कंठण्याकडेच लागलेलें आहे अशा शार्ङरव व गौतमी वगैरेंना त्याचा कंटाळा येणें मानवस्वभावास अनुसरून आहे. हीं यांचीं भाषणें कवीनें मोठ्या मार्मिक रीतीनें घातलीं आहेत.

'बाळे, आतां तपोनुष्ठानाला व्यत्यय होतो. जा बरें'

हें ऐकून शकुंतलेनें पुनः त्याला भेटून ह्मटलें, 'बाबा आपलें शरीर तपाचरणामुळें फारच क्षीण झालेलें, तेव्हां मजकरितां आणखी अधिक काळजी करून शरीर क्षीण करून घेऊं नका आं! (याच्यांत मुलीच्या मनाच्या नैसर्गिक कोमलपणाचें उत्कृष्ट दिग्दर्शन केलें आहे.)

हें ऐकून कण्वानें उसासा टाकीत ह्मटलें,—'बाळे, तूं या पर्णकुटीच्या दारापुढें चतुराईनें लावलेला निवाराचा बाग डोळ्यांसमोर असतांना माझ्या मनाचा शोक कसा बरा नाहींसा होईल ? बरें जा—तुझा मार्ग तुला सुखकर होवो.'

हें ऐकून शकुंतला व तिच्या बरोबर जाणारी मंडळी रवाना झाली.

थोड्या वेळानें दोघी सख्यांनीं मार्गाकडेच पहात ह्मटलें,—'हाय हाय, शकुंतला वनांतील झाडांच्या आड दिसेनाशी झाली कीं!'

कण्वानेंही उसासा टाकीत ह्मटलें, 'अनसूये, ती तुमची सखी गेली, आतां शोक आवरा, नी माझ्या मागून चला कशा—' यावर सख्यांनीं ह्मटलें—

'बाबा, शकुंतलेशिवाय हें तपोवन कसें शून्य दिसतें, त्याच्यांत कशा हो आह्मी जावें ?'

कण्व—'अगे, स्नेहामुळें तुह्माला असें वाटतें.' थोडा वेळ विचार करून चार पावलें गेल्यावर तो पुनः ह्मणाला—'अहो, शकुंतलेला एकदांची

तिच्या पतीच्या घरीं पाठवून मी आतां स्वस्थ झालों. कारण–

'कन्या दुसऱ्याचें धन. तें तिच्या परिग्रह करणाऱ्याकडे पाठविलें. ठेव मालकाला परत देऊन मोकळें व सुखी व्हावें, तसा आतां माझा जीव स्वस्थ झाला आहे.'

असें ह्मणून सर्वजण निघून गेले.

हा अंक या नाटकांतच काय पण इतर साऱ्या नाटकांत अप्रतिम साधलेला आहे. त्याच्यांत वास्तविकपणें प्रत्येक गृहस्थाच्या घरीं हल्लीं सुद्धां नेहमीं घडून येणाऱ्या प्रकाराचें–मुलींना सासरीं रवाना करण्याच्या प्रसंगाचें–वर्णन आहे. पण तें इतक्या चतुराईनें, स्वाभाविकपणें आणि उदात्तपणानें केलें आहे कीं, तें वाचतांना व प्रयोग होत असलेला पाहतांना मन अगदीं तल्लीन व एक तऱ्हेच्या विलक्षण आनंदानें प्रफुल्लित होऊन जातें. या अंकांत मूळ कथा पाहण्यास गेलें तर थोडीच आहे. कण्व सोम तीर्थाला गेले होते. ते बरेच दिवसांनंतर परत आल्यावर त्यांना शकुंतलेनें दुष्यंत राजाशीं गांधर्वविवाह केल्याचें व त्याच्यापासून तला गर्भ राहिला असल्याचें कळून आलें. त्यानें तिला आपल्या आश्रमांत न ठेवितां तावडतोब तिच्या नवऱ्याकडे–दुष्यंत राजाकडे–पोहोंचविण्याचें ठरवून बरोबर तापस शिष्य व गौतमी पाठराखणी देऊन रवाना केलें. तिला याप्रमाणें तावडतोप रवाना करण्याचें कारण—कदाचित् शकुंतलेनें आपल्याला किंवा आपल्यामागें दुसऱ्या कोणा वडील माणसांना याबद्दल न विचारितां एकदम राजाशीं गांधर्वविवाह केला, तेव्हां इतःपर ती आपल्या आश्रमांत राहिल्यास वाच्यतेला कारण होईल, ह्मणून कांहींशीं नाराजीच असेल. तिनें असा विवाह केला तो दुष्यंतासारख्या पृथ्वीपतीशीं, यःकश्चित् पुरुषाशीं नव्हे. यामुळें ही नाराजी तितकी अधिकशी नव्हती. कण्वाच्या एकंदर भाषणांवरून तो शकुंतलेशीं सख्ख्या बापासारखेंच वर्तन करीत होता असें दिसतें; पोसक्या बापासारखें नव्हे. ती उपवर झाल्यानंतरही केव्हां एकदा कोणातरी सुपात्राच्या पदरीं बांधली जाईल असें त्याला वाटत होतें, असें दिसतें. हे त्याचे विचार तितके उत्तानपणें व्यक्त केलेले नाहींत; कारण त्यांत कदाचित् त्याच्या महर्षीपणाला कांहींसा उणेपणा येता.

या अंकाच्या आरंभींचा प्रवेश व त्यानें केलेलें प्रभातवर्णन, नंतरचें अनसूयेचें स्वतःशीं कांहींसे काळजीचे व राजासंबंधाचे किंचित् तिरस्काराचे उद्गार, पुढें शकुंतलेचा सचिंत तरी एका हिशेबीं बाह्यतः आनंदकारक प्रवेश, तिचें ओटी भरणें, कण्वाचा प्रवेश, त्याचीं स्वतःशीं व पुढें शकुंतलेशीं व तिच्यासंबंधाचीं भाषणें, राजाला पाठविण्याचा निरोप, शकुंतलेला सासरीं कसें वागावें या संबंधाचा उपदेश आणि शवटीं एकदाची शकुंतला गेलेली पाहून त्यानें काढलेले दुःखोद्गार, हे सर्व भाग सुरेख व अप्रतिम साधलेले आहेत.

कण्वाचा प्रवेश या एकाच अंकांत आलेला आहे, व तो सहजगत्या तरी पण अतिशय उत्कृष्ट असा आहे. त्याच्यांत नांवें ठेवण्याला किंवा सुधारणा करूं ह्मणण्याला यत्किंचित् सुद्धां जागा नाहीं.

## अंक पांचवा.

मागील अंकांत कण्वाश्रमांतील घडलेल्या किंवा घडत असलेल्या गोष्टींचें व कण्वानें शकुंतलेला बरोबर तापस व गौतमी यांना देऊन दुष्यंताकडे पाठविण्यापर्यंतचें वर्णन आहे. ती राजाकडे पोहोंचल्यानंतर काय काय प्रकार घडला तो या अंकांत वर्णन केला आहे.

दुष्यंत राजा कण्वाश्रमाजवळची शिकार व नंतर आश्रमवासी तापसांच्या इष्टीचें रक्षण आटपून हस्तिनापुराला परत आला, व आपल्या नेहमींच्या राजकार्यांत व ऐषआरामांत गुंग झाला. दुर्वासाच्या शापामुळें त्याला शकुंतलेसंबंधें पार विस्मरण पडलें होतें. आश्रमांतून निघतांना त्यानें शकुंतलेच्या बोटांत आपलें नांव कोरलेली आंगठी घालतांना तिला आपण ताबडतोब हस्तिनापुराला बोलावून घेण्याचें वचन दिलें आहे, ही गोष्ट त्याच्या गांवींही राहिली नव्हती. शकुंतला हस्तिनापुरास पोहोंचावयाची त्या दिवशीं तो सहज विदूषकाशीं बोलत बसला होता. तों जवळच अंतःपुरांतील संगीतशाळा होती, तेथून सुरेख रागदारीचें गायन, त्या दोघांच्याही कानीं पडलें. तें ऐकून विदूषकानें त्याला ह्मटलें, 'मित्रा, संगीतशालेकडे तर लक्ष दे. बोल मधुर आणि स्पष्ट, अशा गायनाचे सुरेख सूर एकूं येताहेत. मला वाटतें हंसपदिका राणी तालीम घेते आहे.' राजानें ह्मटलें 'अरे, थांब, मला नीट ऐकूं दे तर खरें.'

इतक्यांत पुढील अर्थाचें अप्रतिम रागदारीचें गायन किंचित् दुरून असें त्यांच्या कानीं पडलें.

'मधुकरा, तूं नेहमीं अभिनव मधूविषयीं लोलुप. तेव्हां तशा तऱ्हेनें तूं चूतमंजरींतील मधुर मधुर रसाचें आवडीनें आस्वादन केलेंस, आणि आतां तुला कमलिनीमध्यें वसति करण्याला सांपडलें. तेवढ्यानेंच सुखी होत्साता त्या आम्रमंजरीला कसा बरें पार विसरलास?'

यांत मधुकराच्या अन्योक्तीनें राजाला सहजगत्या टोला दिला असून पुढें येणाऱ्या शकुंतलेच्या प्रत्याख्यानाची सूचनाही केली आहे. मधुकर नेहमीं नेहमीं नवीन नवीन आम्रमंजरीवर जाऊन मधुर मधुर रसाचें यथेच्छ पान करितो, त्याचें खरें वास्तव्य कमलिनीमध्यें. तेथें त्याला नुसतें वसतिस्थान मिळतें, मधु चाखण्याला मिळत नाहीं. तरी तो आम्रमंजरीला पार विसरून जातो. तद्वत् राजाची स्थिति आहे. असें येथें ध्वनित केलें आहे. तें कसें तें राजाच्या पुढील भाषणावरून स्पष्ट होईलच.

हें गायन ऐकून राजानें आनंदानें व आश्चर्यानेंसें ह्मटलें, 'वाः काय बहारीची रागदारी आहे पण!'

वि०—'रागदारींत काय आहे तें राहूं दे; पण यांतील अर्थ आला का ध्यानांत?'

हें भाषण विदूषकानें कदाचित् बुद्ध्या केलेलेंही असेल. हंसपदिका खिन्न होऊन याबद्दल विदूषकाशीं बोलली असेल व तिचें हें अन्योक्तिरूपी गायन ऐकून राजाला तिच्यासंबधानें स्मरण देण्याच्या हेतूनेंच विदूषकानें हें भाषण केलें असेल.

राजानें त्याचा भाव ताडून हंसतसें ह्मटलें, 'इच्यावर एकदाच प्रणय झालेला, व वसुमती—पासून मी क्षणभरसुद्धां वेगळा असत नाहीं: ह्मणून हा उपालंभ माझ्या लक्षांत आला.'

'गड्या माढव्या. जा, हंसपदिकेला मजकडून जाऊन सांग—टोला सुरेख मिळाला, ह्मणून.' (तुझ्या गायनाचा गर्भितार्थ माझ्या लक्षांत आला व त्यांतील टोला मला कळला ह्मणून).

विदूषक,—'जशी आपली आज्ञा.' असें ह्मणून तो उठला आणि जातां जातां ह्मणाला, 'अहो राव, तुह्मी मला तिच्याकडे असा निरोप सांगून धाडतां, पण तो ऐकून ती माझी शेंडी धरून मला दासींकडून खूप बडवील. संन्याशाला अप्सरेची गांठ पडली ह्मणजे मोक्ष होत नाहीं, तद्वत् त्यांच्या तावडींतून सुटणें मला कठिणच.'

राजानें त्याची समजूत करीत ह्मटलें, 'अरे,

जा, नागरिक वृत्तीनें-कशी तरी चतुरपणानें-तिची समजूत करून निसटून ये.'

वि०—'बरें, उपाय काय, गेलेंच पाहिजे.' असें ह्मणत विदूषक निघून गेला.

पुढें शकुंतलेसह तापस येणार, त्यावेळीं विदूषक जवळ असता, तर तो राजाला तपोवनांतील शकुंतलागत वृत्तांताचें स्मरण करून देता. तो प्रसंग टाळण्याकरितां या वेळीं कवीनें मोठ्या खुबीदारीनें राजाकडून विदूषकाला, सहजपणें, त्यालाच करण्यास योग्य अशा कामगिरीवर पाठविलें आहे.

तो गेल्यावर राजानें स्वतःशीं ह्मटलें, 'या गायनांतील अर्थ लक्षांत आल्यापासून इष्टजनांचा विरह झालेला नसूनही माझें मन इतकें विलक्षण उत्कंठित कां बरें झालें आहे? अथवा एखादी सुंदर रमणीय वस्तु अवचित पाहिली किंवा मधुर मनोहर शब्द ऐकिले कीं मनावर चमत्कारिक परिणाम होतो. ऐकणारा चांगला सुखी कां असेना, त्याचें मन विलक्षण उत्सुक व उत्कंठित होतें. याचें कारण जन्मांतरींचे स्नेह स्वभावतःच जीवाबरोबर जन्मोजन्मीं सामान्यपणें कायम राहणारे असतात, त्यांचें त्याच्या चित्ताला जणों स्मरण होतें.'

या ठिकाणीं कवीनें आपल्या लोकांमध्यें फार प्राचीन कालापासून चालत आलेल्या एका समजुतीचें मोठ्या मार्मिकपणानें सहज व थोडक्यांत उपलक्षण केलें आहे.

इकडील थोर प्राचीन विद्वान् लोकांच्या मतानें प्रत्येक प्राण्याला, देव, मनुष्य, तिर्यक् पशु, पक्षी, स्थावरादिकांचे असंख्य जन्म प्राप्त होतात. प्रत्येक जन्मांत त्याच्या निरनिराळ्या वासना असतात व निरनिराळीं बरीं वाईट कर्मे त्याच्या हातानें घडतात. त्या त्याप्रमाणें त्याला पुढें दुसरा जन्म प्राप्त होतो. पूर्वजन्मांतील अनेक वासना व वृत्ति, -त्यांची तृप्ति त्या त्या जन्मीं झालेली नसली किंवा होणें बाकी राहिली असली, तर, पुढें त्या त्या तऱ्हेचा दुसरा जन्म प्राप्त झाला ह्मणजे त्या जन्मांत पूर्वजन्माच्या वेळीं अनुभूत व आवडत्या अशा सुंदर वस्तु किंवा मधुर शब्द पाहण्यांत किंवा ऐकण्यांत आले ह्मणजे, त्याला तत्पूर्वजन्मानुभूत स्नेहाचें व सौहृदाचें सामान्यपणें स्मरण होतें, व त्या वेळीं त्याचें मन अत्यंत पर्युत्सुक व आकुल होतें; पण तें कां व कसें होतें याचें कारण त्याच्या लक्षांत येत नाहीं. ही केवळ कविकल्पनाच आहे असें नाहीं. याचा हल्लींसुद्धां पुष्कळांना अनुभव येत नाहीं असें नाहीं. अशाच तऱ्हेच्या पर्युत्सुकपणाचें वर्णन भवभूतीनें मालतीमाधवांत माधवाच्या तोंडीं कांहींसें खडबडीत शब्दांनीं घातलें आहे, आणि बाणानें कादंबरींत वैशंपायनाच्या अच्छोद सरोवरावरील शिवालय पाहतांच झालेल्या मनोवृत्तीच्या वर्णनांत व्यक्त केलें आहे. हा वेदान्त व योगशास्त्रासंबंधाचा विषय असल्यानें गहन आहे. तरी त्याचें कालिदासानें केलेलें उपलक्षण सुरेख व साधें साधलेलें आहे.

असा विचार करीत राजा कांहीं वेळ उत्सुक, उत्कंठित व आकुल, असा होऊन स्वस्थ बसला होता.

त्याच्याकडे कांहीं कामानिमित्त येतां येतां कंचुकी ह्मणाला,—

'अहो, खरेंच. काय तरी ही माझी अवस्था झाली आहे! राजाच्या अंतःपुरांत संचार करितांना ही छडी मी प्रारंभीं केवळ लोकाचाराकरितां हातीं घेतली. चांगला सशक्त असल्यामुळें मला तिचा टेका मिळण्याचा उपयोग मुळींच नव्हता. पण मी याच कामावर

झातारा झालो. चालतांना वेडीवांकडी पावलें पडतात. तेव्हां आतां ही आधाराची झाली आहे.

हा कंचुकी राजाच्या अंतःपुरांत याच कामावर सारखा लहानाचा थोर व आतां म्हातारा झाला होता. राजवाड्यांत संचार करणाऱ्या अशा नोकर लोकांच्या हातीं सोन्याचांदीच्या, विशिष्ट तऱ्हेच्या, भालदार चोबदाराच्या, काठ्या असण्या—त्यांचें काम व अधिकार द्योतक—राहण्याचा परिपाठ होता व तो अद्यापि राजे लोकांकडे जारी आहे. प्रथमतः पूर्ववयांत कंचुकीला ही काठी केवळ चालीकरितां घ्यावी लागे. पण तीच, तो आतां अगदीं म्हातारा व अशक्त झालेला असल्यानें, चालतांना अडखळून पडूं नये म्हणून धरण्याला आधारभूत झाली!

कंचुकीचें लक्षण नाट्यशास्त्रांत 'अंतःपुरचरो वृद्धो' इत्यादि दिलें आहे, त्याला अनुसरून कवीला तो वृद्ध होता असें दाखवावयाचें होतें. तें त्यानें या भाषणांत—श्लोकांत—साहजिकपणें ध्वनित केलें आहे.

कंचुकी म्हणाला, 'महाराजांच्या धर्मकार्यामध्यें अतिक्रम करणें योग्य नाहीं हें खरें. तरा पण आतांच ते धर्मासनावरून उठले. त्यांना त्रास देणाऱ्या कण्वशिष्यांचें आगमन कळविण्याला माझें मन घेत नाहीं. पण या लोकतंत्राधिकारांत विश्राम कोठून मिळणार! कारण भानु नेहमीं घोडे जोडलेल्या रथांत बसलेला आहे, आणि गंधवाह वायु सारखा रात्रंदिवस वहात असतो. तसेंच शेषाला सदोदित भूमीचा भार मस्तकावर धरावाच लागतो. षष्ठांशवृत्तीवाल्यांचा हा धर्मच आहे.'

पृथ्वीवरील सर्व लोकांवर मुख्य अधिकार चालविण्याचें काम ज्याच्यावर असतें त्यांना विश्रांतीला फुरसतच असत नाहीं. सर्व पृथ्वीवरील लोकांचें जीवन; नियमन आणि संरक्षण करणारे,—सूर्य, वायु व शेष,—हे तरी सतत नियत कामांत गढलेले—त्यांना एक क्षणभराची विश्रांति नाहीं. प्रजेपासून त्यांच्या उत्पन्नाचा षष्ठांश राजाला मिळतो, त्याच्या या वृत्तीऐवजीं त्यांला याप्रमाणें प्रतिक्षणीं अविश्रांत परिश्रम करावेच लागतात.

यांत कवीनें कंचुकीच्या मुखानें राजाची योग्यता सूर्यादिक लोकपालाइतकी असल्याचें सुचविलें आहे. व त्यांतच राजा इतका अश्रांत प्रजापालनीं दक्ष असल्याचें व तोही तें काम आपलें कर्तव्य समजून करीत असल्याचें वदविलें आहे.

'तेव्हां आपण आपलें काम—वर्दी देण्याचें—करावें.' तो थोडासा पुढें होऊन म्हणाला, 'हे आमचे महाराज. सर्व प्रजेचें पोटच्या पुत्राप्रमाणें पालन करून मन स्वस्थ नसल्यानेंच जणों असे एकीकडे येऊन बसले आहेत. एखादा द्विपेंद्र आपल्या कळपाला चोहोंकडे फिरवून आणिल्यावर उन्हाच्या तापामुळें दिवसा एखाद्या थंडशा जागीं विश्रांति घेत बसतो, तद्वत् यांची स्थिति आहे.'

कंचुकीच्या तोंडीं घातलेले हे तीन्ही श्लोक फार चांगले साधले आहेत. त्यांच्यांतील विचार पोक्त व त्याच्या तोंडीं शोभणारे व मार्मिक आहेत. म्हाताऱ्या माणसांचीं भाषणें कांहींशीं कंटाळवाणीं होतात, तोही दोष या भाषणांत नाहीं.

हें कंचुकीचें लांबलचक भाषण संपेपर्यंत राजाला स्वस्थ बसावें लागलें आहे. पण यांत गौणपणा कांहीं नाहीं. एकाहून अधिक पात्रें संभाषण करीत असतांना मध्येंच त्यांचें भाषण बंद करून त्यांना रंगभूमीवर प्रेक्षकासारखें ठेवणें हा दोष आहे. पण एकच पात्र खिन्न व स्वतःशींच विचार करीत बसलेलें रंगभूमीवर राहण्यांत कांहीं दोष नाहीं. कारण अशा

एकांताच्या स्थितींत वेळ कसा व किती जातो याचें कोणालाही भान राहात नाहीं; व त्याच्यापासून दुसऱ्या कोणच्याही प्रवेशाला किंवा कार्याला हरकत होत नाहीं. राजा व विदूषक भाषण करीत असतांना त्यांचें भाषण बंद ठेवून कंचुकीचें हें भाषण संपेपर्यंत ते स्वस्थपणें त्याची मार्गप्रतीक्षा करीत राहिले असें दाखविलें असतें, तर मात्र दोष होता.

असा विचार करीत कंचुकीनें पुढें होऊन राजाचा जयजयकार केला आणि ह्मटलें, 'हिमगिरीच्या पायथ्याशीं अरण्यांत राहणारे तापस काश्यपाचा निरोप घेऊन आले आहेत. त्यांच्याबरोबर बायकाही आहेत. तेव्हां जशी महाराजांची मर्जी.'

यावर राजानें आदरानें ह्मटलें, 'काय ? काश्यपाकडून निरोप घेऊन आले आहेत!' काश्यपाचें नांव घेतांच राजानें आदरबुद्धि व्यक्त केल्याचें दाखविलें आहे तें राजाच्या थोरपणाचें व प्राचीनकाळीं ऋषिजनांला राजे लोकांकडून मिळत असलेल्या मानाचेंही द्योतक आहे.

कंचुकीनें—होय—ह्मटल्यावर राजानें त्याला सांगितलें, 'सोमरात उपाध्यायांना जाऊन सांग, त्यांचा श्रौत विधीनें सत्कार करून त्यांना मजकडे आणा, ह्मणून. मीही इकडे तपस्विजनांची भेट घेण्याला उचित अशा जागीं त्यांची वाट पहात राहतों.'

काश्यपाकडील मंडळी आश्रमवासी असल्यानें, त्यांचा उपाध्यायाकडून प्रथम योग्य आदर करवून, नंतर उपाध्यायानें स्वतः त्यांना आपल्याबरोबर आणावें हा भावार्थ.

कोणी सामान्यजन किंवा नोकर भेटीला आले तर त्यांना कंचुकी, दौवारिक इत्यादिकांनीं त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें राजाकडे नेण्याचा पाठ असे. पण असे कोणी विशिष्ट लोक—शास्त्री, वैदिक, पंडित वगैरे—आले असतां त्यांचा बहुमान करून कुलोपाध्यायासारख्या मोठ्या गृहस्थाच्या मार्फत त्यांनीं राजाची भेट घेण्याची चाल होती. ती अद्यापिही बहुतेक लहान मोठ्या संस्थानांत नाहीं असें नाहीं.

कंचुकी—'जशी आपली आज्ञा.' असें ह्मणून निघून गेल्यावर राजानें उठून, 'वेत्रवतिके, चल.' असें ह्मटलें. जातां जातां आपल्याला जणों राज्याधिकाराचा त्रास वाटतो असें दाखवीत तो ह्मणाला, 'सामान्यतः प्रत्येक मनुष्य इच्छित वस्तु प्राप्त झाली ह्मणजे सुखी होतो. पण आह्मां राजेलोकांची स्थिति सारखी दुःखाची. कारण, त्यांच्या मनांत एखादी गोष्ट येऊन तिच्या विषयीं कांहींशी उत्कसुता वाटते न वाटते तोंच ती प्राप्त होऊन सारी उत्सुकता नाहींशी होते; आणि उत्सुकता नाहींशी झाली कीं तद्विषयक सुखही कमी होतें. पुढें प्राप्तवस्तूचें रक्षण करण्याच्या कटकटीमुळें त्याला त्रास वाटतो. स्वतःच हातीं धरलेल्या छत्रीप्रमाणें राज्य हें श्रमाचा परिहार करून केवळ सुख देणारें नव्हे, त्यापासून श्रमच होतो.'

आपल्याच हातीं छत्री धरली तर त्याच्यापासून उन्हाचें निवारण होतें, पण त्याबरोबरच छत्री धरण्याचे श्रमही होत असतात.

छत्रधारणापासून केवळ सुखच होतें असें नाहीं. तद्वत् राज्याचीही स्थिति आहे. तें प्राप्त झालें ह्मणजे त्याच्याविषयींची उत्सुकता संपते, व उत्सुकता संपल्यानें तितकें सुख वाटण्याचें कमी होतें. व तें प्राप्त झाल्यावरही त्याचें रक्षण करण्याच्या खटपटीची दगदग असतेच.

या वेळीं राजाचें मन एकाएकीं कांहींसें उद्विग्न झालें असल्यानें त्याला हे अशा तऱ्हेचे उदासवाणे विचार सुचले आहेत; ते उदास खरे तरी पण चांगले प्रौढ आहेत.

असे त्याचे विचार चालले आहेत, तों एका स्तुतिपाठकानें त्याचा जयजयकार करून ह्मटलें,–

'आपली स्थिति सच्छाय वृक्षाप्रमाणें आहे. वृक्षाच्या माथ्यावर सारखें प्रखर ऊन पडलेलें तो सोशीत असतो, तरी आपल्या छायेखालीं बसलेल्यांचा तो ताप दूर करीतच असतो. तसें आपण प्रतिदिवशीं स्वतःच्या सुखाविषयीं पर्वा न करितां प्रजेच्या हिताकरितां सारखी काळजी करीत असतां.'

यांत कवीनें राजाची अत्यंत योग्य व मान्य अशी प्रशंसा केली आहे, व त्यावरून त्यानें दुष्यंत राजा कसा होता हें दाखविलें आहे; किंबहुना राजे लोक कसे असावेत याविषयींचें निदर्शन केलें आहे.

दुसऱ्या वैतालिकानें ह्मटलें,–

'महाराज, आपण नेहमीं हातीं दंड धरून कुमार्गी जाणाऱ्यांचें नियमन करितां, त्यांच्यांतील वाद मिटवितां आणि त्यांच्या रक्षणाविषयीं तजवीज करितां; प्रजेला संपत्ति वगैरेच्या संबंधानें हित करणारे ज्ञातिबांधव अनेक असले तरी खऱ्या बंधुकार्याविषयीं आपली हद्द आहे.'

हें ऐकून राजाच्या मनाला बरें वाटलें व तो ह्मणाला, 'याच्यामुळें आपण जसे पुनः ताजेतवाने झालों. पुनः राज-प्रजाकार्य करण्याला जसा मला हुरूप आला.' असें ह्मणून तो थोडा वेळ इकडे तिकडे फिरूं लागला.

त्याला प्रतिहारीनें ह्मटलें, 'ही होमाची जागा, नुकतीच सारविलेली व होमधेनु जवळच बांधलेली असल्यानें, सुरेख दिसते आहे. वर चढून जावें.'

होमाच्या जागेजवळच होमाची गाय बांधण्याची जागा असे व ती नित्य सारवून स्वच्छ ठेवली जात होती; व त्याच जागीं ब्राह्मणादिक श्रेष्ठ अतिथि किंवा याचक यांची राजे लोक भेट घेत असत. अद्यापिसुद्धां अग्निहोत्रिलोकांकडे विशिष्ट होमशाळा व अग्निकार्याला लागणारी पय, घृत, गोमय इत्यादि सामग्रीचें साधन ह्मणून पवित्र मानलेली होमधेनु आढळून येते.

त्याप्रमाणें राजा होमाच्या ओट्यावर चढून नोकर लोकांच्या खांद्यावर टेकून उभा राहिला आणि थोड्या वेळानें ह्मणाला, 'वेत्रवती, पण भगवान् काश्यपानें मजकडे हे ऋषि कां पाठविले असावेत बरें?

'या धर्मारण्यांत तपाचरण करणारांच्या तपाला कांहीं विघ्न आलें आहे? किंवा तेथील प्राण्यांशीं कोणी दांडगाई केली? कां माझ्या पातकामुळें तेथें वृक्षवेलींना फुलें व फळें येणें बंद झालें आहे? काय, आहे तरी काय? असे अनेक विचार माझ्या मनांत येतात. त्यांची संशयनिवृत्ति होत नाहीं, यामुळें माझें मन आकुलसें झालें आहे.'

एखाद्याचें मन उत्कंठित झालेलें असलें ह्मणजे त्याच्या मनांत कसकसे विचार येत असतात व सामान्य व्यवहारांतील गोष्टीविषयींही त्याचें मन कसें साशंक होत असतें, याचें हें उत्तम उदाहरण आहे. तसेंच शकुंतलादिकांच्या आगमनापूर्वींच राजाची वृत्ति उत्सुक व उत्कंठित होत्साती तो त्यांची संभावना करण्याला कसा तयार झाला होता व त्याचें मन कसें सारखें तद्रूपसें झालें होतें, याचेंही कवीनें सहजपणें द्योतन केलें आहे.

प्रतिहारीनें 'आपण सदाचरणी. सच्चारित्रापासून अशा ऋषिमंडळीला आनंद होतो. सबब ते आपल्याला धन्यवाद देण्याला येत आहेतसें वाटतें.' यांत प्रतिहारीनें स्तुति करून त्याचें मन प्रसन्न ठेवण्याचा यत्न केला आहे.

नंतर शकुंतला, गौतमी व मुनि आले. त्यांचे-

पुढें कंचुकी मार्ग दाखवीत-आणि पुरोहित होते.

त्यांना राजाकडे आणीत असतांना शार्ङ्गरवानें ह्मटलें, 'शारद्वता, हा राजा मोठा महाभाग व कधींही मर्यादेबाहेर न जाणारा; ब्राह्मणांहून कमी वर्णाचा तरी केव्हांही कुमार्गानें न जाणारा असा आहे हें सारें खरें, तरी नेहमीं एकांतवासाची सवई असल्यानें हें गजबजलेलें स्थान मला आग लागलेल्या स्थळासारखें भासतें.'

या वर्णनांतलें स्वारस्य सहजपणें लक्षांत येत नाहीं. शार्ङ्गरवानें राजाची एका हिशेबीं स्तुति तर केली आहे. पण ह्यांतच तो वर्णानें कमी असल्याचेंहीं ह्मटलें आहे, तें कोणच्या उद्देशानें? व हें सारें स्थळ आग लागलेल्या जागेसारखें-आग लागलेल्या जागीं खूप गर्दी जमलेली असते व येथेंही फार गर्दी आहे ह्मणून हेंही त्यासारखें-दिसतें असें ह्मणण्याचा हेतु कोणचा? किंवा हीं एका हिशेबीं जंगलांत राहणारीं माणसें, शार्ङ्गरव नगरांतील व राजवाड्यांतील गडबड पाहून गांगरून जाऊन कांही तरी आपल्या तऱ्हेवर बरळतो आहे, असें समजावयाचें किंवा काय?

शारद्वत—'या नगरांत प्रवेश केल्यापासून तुझी ही अशी वृत्ति झालेली दिसते. मला तर—

'हे सर्व लोक सुखासक्त असलेले पाहून कसेंसेंच वाटतें आहे. तेलानें लडबडलेला, किंवा अशुद्ध, किंवा गाढ झोपीं गेलेला, किंवा बांधून जखडून टाकलेला असा मनुष्य पाहतांच, स्वच्छ स्नान केलेला, शुद्ध, उत्तम, जागरूक आणि स्वतंत्र अशा मनुष्याच्या मनाची स्थिति होते तद्वत् मला या वेळीं वाटतें आहे.'

'या सर्व सुखैकपरायण लोकांची स्थिति पाहून मला फारच कीव येते. व आपण या सर्वांपेक्षां किती तरी शुद्ध, स्वतंत्र, मुक्त व अनासक्त आहों असें वाटतें आहे.'

याच्यांत कवीनें बुद्ध्या स्वतःच्या श्रेष्ठपणाविषयीं मनाची नैसर्गिक खात्री असलेल्या तापसाच्या मनांत येणारे विचार उत्तम व्यक्त केले आहेत.

येतां येतां शकुंतलेचा उजवा डोळा लवला. तेव्हां तिनें दचकूनसें ह्मटलें 'अगबाई! हा माझा उजवा डोळा कां लवतो?' बायकांचा उजवा डोळा लवणें अशुभ मानलें जातें. पुढील शकुंतलेच्या प्रत्यादेशाचें हें सहेतुक सूचन आहे.

तिचें समाधान करीत गौतमीनें ह्मटलें 'बाळे, इडापिडा टळो, तुझ्या नवऱ्याच्या गृहदेवता तुला सुखदात्या होवोत!'

असें बोलत सर्वजण राजाकडे येत होते. त्यांना पुरोहितानें राजाला दुरूनसें दाखवीत ह्मटलें, 'अहो तापस, हे पहा महाराज वर्णाश्रमाचें रक्षण करणारे, पूर्वींच आपलें आसन सोडून आपली मार्गप्रतिक्षा करीत उभे आहेत.'

शार्ङ्ग०—अहो उपाध्येबोवा, याविषयीं त्यांचें अभिनंदन करण्यासारखें खरेंच. तरी पण याविषयीं आह्मी केवळ मध्यस्थ आहोंत. हें पहा—

'फळांनीं लादलेला वृक्ष व नवीन जलानें भारावलेला मेघ, तसाच समृद्धि प्राप्त झालेला सत्पुरुष, हे सारे परोपकारी असल्यानें हीं परोपकारी साधनें अधिकाधिक प्राप्त होतील तसतसे ते जास्त नम्र व विनीत होतात. हा त्यांचा जन्मस्वभावच आहे.'

हा श्लोक फारच चांगला साधला आहे. सुभाषित या नात्यानेंही तो अप्रतिम आहे. रचना साधी व मनोरम असून त्यांत अर्थगांभीर्य किती तरी आहे.

ते समोरून येत असलेले पाहून प्रतिहारीनें ह्मटलें, 'महाराज, हे सारे प्रसन्न दिसताहेत.

कांहीं त्रास झाल्यानें व गडबड उडाल्यानें आलेले नसून कांहीं सौम्य कार्याकरितांच ते आलेले दिसतात.'

त्यांमध्यें बहुतेक अग्रभागींच शकुंतला होती. तिला पाहून राजानें ह्मटलें, 'फिकट पानांच्या मध्येंच एखादें कोमल किसलय निघालेलें असतें तद्वत्—अवगुंठण घेतलें असल्यामुळें शरीरशोभा फारशी व्यक्त दिसत नसलेली—ही या तपोधनांमध्यें कोण बरें असावी?'

प्रतिहारी—'महाराज, ती कोण असावी याविषयीं तर्क चालवितांना, मध्येंच कौतुक वाटून, तो बंद पडतो. तरी इची आकृति सुंदर, पाहण्याजोगी दिसते खरी.'

राजा—'पुरे राहूं दे. परस्त्रीविषयीं असली चिकित्सा करणें योग्य नाहीं.'

या भाषणावरून राजाच्या मनाचा स्वाभाविक थोरपणा व पोक्तपणा हे व्यक्त केले आहेत.

शकुंतलेनें उरावर हात ठेवून उरांत धडकी भरलेली असल्यानें हृदय धडधडत असलेलें दाबीतच जणों स्वतःशीं ह्मटलें, 'हृदया, असें कां कांपतेंस? आर्यपुत्राचा अभिप्राय तर कळूं दे. धीर धर.'

तिचें हृदय कांपत होतें. यावरून परिणामीं तिला दुःखच होणार असल्याचें सुचविलें आह. मागें तिचा उजवा डोळा लवत असल्याचें लिहिलें आहे, त्याचेंच हें दृढीकरण आहे. अशा प्रसंगीं कांहींशी धडकी भरणें साहजिकही आहे.

पुरोहितानें पुढें होऊन राजाला ह्मटलें, 'यांची विधिपूर्वक पूजा झाली आहे. यांच्या उपाध्यायाचा निरोप आहे. तो महाराजांनीं ऐकावा.'

राजा—'मी ऐकण्याला तयार आहें.'

तापसांनीं हात वर करून त्याचा जयजयकार केला आणि 'तुला इष्ट गोष्टी प्राप्त होवोत' असा आशीर्वाद दिला.

राजा—'आपलें तप निर्विघ्न चाललें आहे ना?'

शा०—'आपण प्रत्यक्ष सूर्यासारखे प्रखर व दैदिप्यमान—सज्जनांचें रक्षण करणारे—असतांना धर्मक्रियेला विघ्नरूपी अंधकाराचा संपर्क कोठून होणार?'

यांत राजाचा न्याय व जागरूकपणा यांची स्तुति केली आहे.

रा०—'तर मग मला राजा हा शब्द अन्वर्थक झाला ह्मणावयाचा. लोकानुग्रहकारी भगवान् काश्यप कुशल आहेतना?'

ऋषि—'सिद्ध पुरुषांचें कुशल त्यांच्या स्वाधीनच असतें. त्यांना त्याच्याकरितां बाह्योपकरण साधनांची अपेक्षा नसते. आपलें कुशल विचारून त्यांचें असें ह्मणणें आहे—'

रा०—'भगवंताची काय आज्ञा आहे?'

शार्ङ्गरव—'श्रेष्ठ पुरुषांमध्यें तूं प्रमुख, तशी ही शकुंतला प्रत्यक्ष साक्षात् सत्क्रियेचा अवतार. अशा तुह्मा दोघां अनुरूप व गुणी वधूवरांचा प्रजापतीनें हा समागम घडविला आहे. यांत फारा दिवसांनीं त्याला नांवें न ठेवण्यासारखा योग्य प्रकार त्याच्या हातून घडला ह्मणावयाचा'

(सामान्यतः वधूवरांचा समागम घडविण्याच्या संबंधांत प्रजापतीला नांवें ठेवावीं लागत नाहींत असें क्वचितच घडतें. कारण—

"यः सुंदरस्तद्वनिता कुरूपा या सुदरी सा पतिरूपहीना ॥
यत्रोभयं तत्र दरिद्रता च विधेर्विचित्राणि विचेष्टितानि॥"

असें सुभाषित कालीदासाच्या वेळीं ही प्रसिद्ध असावें असे वाटतें. पण यावेळीं त्याला नांवें ठेवण्याला जागा नाहीं.) 'तेव्हां ही आपली पत्नी गर्भिणी आहे. इचें गृहण करून इच्यासह धर्माचरण करावें.

गौतमी—'आर्या, कांहीं बोलावें ह्मणतें. पण बोलण्याला जागाच नाहीं. इनें गुरुजनांची अपेक्षा ठेविली नाहीं, किंवा बंधुजनांला विचारिलें नाहीं; परस्पर असाच हा व्यवहार केला. तेव्हां तुह्मांला सांगायाचें तें काय?'

गौतमीच्या पोक्तपणाला शोभे असें व कांहीं अंशीं राजा व शकुंतला यांना थोडेंसें टोचण्याजोगें हें भाषण आहे.

हीं भाषणें ऐकून शकुंतलेनें मनांत उत्सुकतेनें ह्मटलें, 'यावर आर्यपुत्र काय ह्मणतात बरें?'

राजानें आश्चर्यानेंसें एकदम ह्मटलें—'हें काय भलतेंच कुभांड!'

त्याच्या बोलण्याची तऱ्हा व त्यांतील आशय पाहून शकुंतलेनें आपल्याशीं ह्मटलें, 'हें यांचें भाषण! भाषण कसचें,—केवळ आग पाखडणें!'

त्याला शार्ङ्गरवानें कांहींसें आश्चर्यानें ह्मटलें, 'असें कर्में बरें ह्मणतां? आपण लोकवृत्तांत उत्तम तऱ्हेनें जाणतां. स्त्री कितीही सती साध्वी असो, ती सारखी माहेरींच राहिली तर तिच्याविषयीं लोक शंका घेतात. ती प्रिय अप्रिय, कशीही असो, तिनें पतीजवळच राहावें अशी तिच्या आप्तांची उत्कट इच्छा असते.'

राजा शकुंतलेला कबूल करीत नाहीं तें ती त्याला अप्रिय असल्यामुळें, असें समजून शार्ङ्गरवानें हें भाषण केलें आहे. लग्न झालेल्या मुलींनीं आपल्या सासरीं पतीजवळ सुखानें किंवा कशाही स्थितींत राहणेंच बरें, ही आपल्या लोकांची दृढ व योग्य समजूत हल्लीं सुद्धां कायम आहे. व ती इकडील एकंदर कुटुंबसंबंधी व्यवहाराच्या मानानें गैर आहे असें नाहीं.

यावर राजानें आश्चर्यानें ह्मटलें, 'काय ह्मणतां? माझें इच्याशीं लग्न झालेलें आहे?'



हें ऐकून तर शकुंतलेला मोठाच धक्का बसला, व ती मोठ्या खेदानें व त्रासानें मनांत ह्मणाली, 'मना! तुला शंका आली ती ठीकच!'

राजा बुद्ध्या टाळाटाळी करितो आहे असें समजून शार्ङ्गरवानें कांहींसें रागानें व झिटकाऱ्यानें ह्मटलें, 'केलेली गोष्ट न आवडली ह्मणून धर्माविषयीं पराङ्मुख होणें योग्य आहे का?' इच्याशीं गांधर्वविवाह केलेला आतां तुला आवडत नाहीं ह्मणून अशा तऱ्हेनें धर्माविषयीं—लग्न झाल्याविषयीं—विमुखता दाखविणें राजे लोकांना योग्य आहे काय?

यावेळीं ही गोष्ट राजाच्या गांवींही नसल्यानें त्यानें जास्तच आश्चर्यानें ह्मटलें, 'ही भलतीच शंका घेऊन हा प्रश्न काय?'

शार्ङ्गरव—'असले हे मनोविकार प्रायः ऐश्वर्यानें प्रमत्त झालेल्या लोकांच्या मनाला मोह पाडीत असतात.'

तूं ऐश्वर्यानें मत्त झालेला असल्यानें तुझ्या मनाला हा असा मोह पडला आहे.

राजा—'यांत तर मला जास्तच दूषण दिलें गेलें आहे.'

हा प्रकार पाहून गौतमीनें, ही मुखावरून अवगुंठण घेतलेली स्त्री कोण आहे तें ठाऊक नसल्यानें राजा कदाचित् असें बोलत असेल, पण तिचें मुख पाहिल्यावर ओळख पटेल, अशा समजुतीनें शकुंतलेला ह्मटलें, 'बाळे, थोडा वेळ लाजूं नको, तुझा बुरखा काढूं दे, ह्मणजे तुझा भर्ता तुला ओळखील.'

बुरखा काढल्यावर शकुंतलेचें रूप निरखून पाहून राजानें ह्मटलें—'हें इचें रूप मनोहर व तिची कांति किंचित् ही उणी न झालेली, ती मजकडे चालून आलेली. सकाळच्या प्रहरीं आंतले बाजूस तुषार सांठलेलें कुंद-पुष्प पाहून भ्रमराला त्याचा उपभोग घेववत नाहीं आणि त्याला

सोडूनही जाववत नाहीं, तद्वत् या वेळीं माझ्या मनाची स्थिति झाली आहे. इचा परिग्रहही करवत नाहीं आणि इला टाकवतही नाहीं.' असें ह्मणून तो विचार करूं लागला.

ही त्याची स्थिति पाहून प्रतिहारीनें ह्मटलें, 'वाः! आमच्या महाराजांची कोण तरी धार्मिक वृत्ति ही—असें आपोआप सुखानें चालून आलेलें रूप पाहूनही! नाहीं तर दुसरा कोण इतका विचार करणार?'

हें भाषण प्रतिहारीसारख्या सामान्य पात्राच्या तोंडीं शोभे असेंच आहे.

शाङ्गरव—'राजा असा स्वस्थ कां?'

राजा—'तापसहो, मी पुष्कळ विचार केला, पण पूर्वीं परिग्रह केला असल्याचें मला स्मरत नाहीं. आणि ही गर्भवती—तो गर्भ माझ्याचपासून असल्याविषयीं मला शंका असतांना, मी इचा कसा स्वीकार करावा?' (कदाचित् ही कुमारी असती तर गोष्ट निराळी. तिचा स्वीकारही करितां येता.)

हें राजाचें भाषण ऐकून शकुंतलेनें एकीकडे त्रासून ह्मटलें, 'यांना मुळीं परिणयाविषयींच शंका, तेव्हां आपली दूरवर ओढ घेणारी आशा कसली न् काय!'

शकुंतला आश्रमांतून निघाली तेव्हां तिनें राजापाशीं पोहोंचल्यावर आपल्या भावी सुखाविषयीं नाना तऱ्हेच्या कल्पना—गोड वाटतील अशा —केल्या होत्या. पण राजानें मुळीं तिच्याबरोबर लग्न झालें याविषयींच शंका घेतली, तेव्हां त्याची प्रियतमा पट्टराणी होत्साती पुढील सुखोपभोगाची आशाच खुंटली. असें तिच्या मनांत या वेळीं येऊन तिला अर्थातच अतिशय दुःख झालें.

शाङ्गरव—'हें ठीक नाहीं. तूं या मुनिकन्येचा दांडगाईनें अपहार केलास, तरी त्या परम श्रेष्ठ मुनीनें थोरपणानें त्या गोष्टीस अनुमोदन दिलें. आणि तूं आतां जसा त्या गांवचाच नव्हे असें बोलतो आहेस. एखाद्यानें चोरीस गेलेलें धन तें चोरून नेणाऱ्यालाच सत्पात्र समजून आदरानें अर्पण करावें, तशासारखीच ही गोष्ट झाली.'

हें शाङ्गरवाचें भाषण फारच आवेशाचें व योग्य आणि प्रसंगोचित आहे. यांत त्यानें राजाला धडधडीत चोराची उपमा दिली आहे. तो राजाचें भाषण व वर्तन यांवरून बराच रागावला होता.

त्याची समजूत करीत शारद्वतानें ह्मटलें, 'शाङ्गरवा, पुरे कर.—शकुंतले, आह्मीं सांगायाचें तें सांगितलें. हे राजेश्री असें ह्मणतात, तेव्हां त्यांना खूण पटेल असें कांहीं सांग.'

यावर शकुंतलेनें एकीकडेस ह्मटलें, 'तें तसलें प्रेम या थराला आलें, तेव्हां आठवण देऊन तरी काय? हें माझेंच कर्म मला भोवतें. कायमचें दुःख झालें—व होणार, हें मात्र खरें!'

नंतर ती राजाला ह्मणाली, 'आर्यपुत्रा!—' असें संबोधन स्त्रीनें आपल्या पतीला करावयाचें, आणि येथें नुकताच राजानें तिच्याशीं लग्न झाल्याविषयीं संशय घेतलेला. तेव्हां त्याला अशा आदरानें बोलणें योग्य नाहीं असें हे शब्द उच्चारिते तोंच तिच्या मनाला वाटलें व तिनें संशय घेणाऱ्याविषयीं असा समुदाचार उपयोगी नाहीं, असा विचार करून ह्मटलें, 'पौरवा, तेव्हां आश्रमांत आल्यावेळीं प्रसंगोपात्त गोड गोड भाषणें करून भोळ्या मनाची मी, तिला तसें फुसलावून आतां जणों त्या गांवचेच नाहीं अशीं भाषणें करून धिक्कार करणें योग्य ना?' अद्यापि शकुंतलेच्या मनांत राजाविषयीं थोडा आदर वाटत होता. सबब तिनें हें भाषण नरम व प्रौढपणानेंचसें केलें आहे.

यावर राजानें एकदम कानांवर हात ठेवून ह्मटलें, 'छेः छेः भलतेंच! उद्दाम झालेली नदी

पुराच्या पाण्यानें किनारा ढासळवून आपलेंच स्वच्छ पाणी गढूळ करते, आणि किनाऱ्या वरील तरूंचेंही उल्लंघन करिते, तद्वत् हा भलताच आरोप करून, स्वतः पतित होत्साती मलाही कलंक लावण्याचा हा तूं काय प्रकार मांडला आहेस ?'

या भलत्याच भाषणानें तूं तर पतित झालेली दिसते आहेसच, पण मलाही तसेंच करण्याचा हा काय भलताच यत्न करिते आहेस ? यांत राजानें धडधडित शकुंतलेला तूं पतित झालेली आहेस असें ह्मटलें आहे, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

हें ऐकून व त्याची ती बोलण्याची तऱ्हा पाहून शकुंतलेनें ह्मटलें—'बरें, जर खरोखरच परमार्थबुद्धीनें, परस्त्रीचा आपण कसा स्वीकार करावा अशा शंकेमुळें, असें बोलत असलास, तर ही पहा खुणेची वस्तु. ही तुझी शंका दूर करील.'

राजा बुद्ध्या आपली वंचना करण्याकरितां असें बोलतो आहे असें नसून कदाचित् त्याला खरेंच घडल्या गोष्टीचें विस्मरण पडून तो असें बोलत असेल. त्याच्या या भाषणावरून तो वाटतो तितका वाईट मनाचा खचित नाहीं. दुसऱ्याचें खटलें कसें स्वीकारावें अशी शंका येऊनच तो हें बोलला असेल असें समजून, निघते वेळीं, राजानें तुला कदाचित् दाद दिली नाहीं तर त्यानें दिलेली आंगठी त्याला दाखीव, असें तिच्या सख्यांनीं तिला बजाविलें होतें, त्याचें स्मरण होऊनच तिनें सहजपणेंसें हें भाषण केलें आहे.

राजा—'वाः फार उत्तम तोड—कबूल.'

नंतर शकुंतलेनें बोटांतून आंगठी काढून घेण्याकरितां बोट चाचपडलें, तों आंगठी नाहीं! असें पाहून एकदम गडबडून घाबऱ्या घाबऱ्या ती ह्मणाली—'हाय! हाय! माझ्या बोटांत आंगठी नाहीं कीं!'

गौतमी—'तूं शक्रावताराजवळ शचीतीर्थावर जलाभिवंदनाला गेली होतीस तेथें आंगठी पडली खचित.'

हें ऐकून राजानें हसत ह्मटलें, 'स्त्रियांना साहजिक तात्कालिक स्फुर्ति असते ह्मणतात ती ही.'

खुणेची आंगठी दाखवितें असें शकुंतलेनें ऐटीनें—खोटेंच—सांगितलें. त्याची बतावणी करण्याकरितां या वृद्धेनें हें आपल्या जातिस्वभावास अनुसरून चांगलें चापल्य दाखविलें. ही तरी इचीच साथीदार. स्त्रिया तेथून साऱ्या जात्याच चपल व चलाख, अशा अर्थानें त्यानें गौतमीलाही हा टोला दिला आहे.

शकुंतलेनें निरुपायानें ह्मटलें, 'इथें दुर्दैवानें आपलें कर्तब दाखविलें. असो. दुसरें तुला सांगतें.

राजा—'हं, आतां ऐकण्यावर आलें!'

शकुंतला—(तिनें राजाच्या या टोचून बोललेल्या शब्दांकडे लक्षच दिलें नाहीं; कारण यावेळीं निरुपायामुळें तिची स्थितिच तशी झालेली होती.) 'एके दिवशीं आपण नवमालिकामंडपांत होतों; आणि पाण्यानें भरलेला कमलपत्राचा द्रोण आपल्या हातीं होता.'

राजा—'बरें, ऐकतों आहों.'

शकुंतला—'तोंच मी पुत्रासारखा मानलेला दीर्घापांग नांवाचा बालमृग आला. तेव्हां तुह्मी त्याच्यावर दया व प्रेम करीत, यालाच आधीं पिऊं दे, असें ह्मणून पाण्याचा द्रोण त्याच्यापुढें केला. पण तुमचा परिचय नसल्यानें तो जवळ सुद्धां येईना. मग मीं हातांत पाणी घेण्याबरोबर तो तें प्याला. तेव्हां तुह्मी थट्टेनें व हसत ह्मटलें, 'सारे स्वतः सारख्यावर विश्वास ठेवतात. दोघेही जंगलीच!'

हें भाषण शकुंतलेच्या तोंडीं किती साधें व सहज आणि सरळपणाचें वाटतें! त्याच्यांत नखरा, खोटसाळपणा किंवा कृत्रिमपणा यांचा गंध नाहीं. वर्णित प्रसंग तरी शकुंतलेच्या परिस्थितीला व अवस्थेला शोभे असा,—राजाच्या नव्हे. हिनें राजाला रहस्यप्रसंगांतील लक्षांत राहण्याजोग्या अशा गोष्टींचें ह्मणून स्मरण करून दिलें आहे.

यावर राजानें कांहींसें ऐटीनें व तिरस्कारानें उत्तर दिलें, 'असल्या स्वकार्यसाधु गोडगोड भाषणांनीं विषयी लोक भुलतात. मी त्यांतला नव्हे.'

सहज वेचक उत्तर देऊन, आपण अशांतले कामुक नव्हे, त्याहून फार निराळे आहों, असें ध्वनित केलें आहे. व यांत शकुंतलेला केवळ कार्यसाधु व लबाड असें स्पष्टपणें ह्मटलें आहे. हें ऐकून गौतमीनें पोक्तपणें व कळवळ्यानें ह्मटलें, 'महाभागा, असें नको रे बोलूंस. ही तपोवनांत वाढलेली; कपटाविषयीं अगदीं अजाण.'

तिला राजानें आपल्याच तऱ्हेवर उत्तर दिलें, 'अहो वृद्ध तापसीबाई, स्त्रियांच्या अंगीं उपजतच शहाणपण—माणसांशिवाय अशा प्राण्यांत सुद्धां—दिसून येतें; तेव्हां सज्ञानाविषयीं बोलावयाला कशाला पाहिजे! कोकिला आपलीं लहान पिलें उडूं लागण्यापूर्वीं दुसऱ्या पक्ष्यांच्या हातून पोसवितात.'

कोकिला आपलीं पिलें कावळ्यांच्या घरट्यांत नेऊन ठेवितात. तेथें त्यांचें कावळ्यांकडून आपलींच पोरें समजून पोषण होतें. पुढें तीं मोठीं होऊन उडूं फिरूं लागलीं ह्मणजे निघून दुसरीकडे जाऊन घरटीं करून राहतात, अशी समजूत आहे. ती कितपत खरी आहे तें समजण्याला मार्ग नाहीं. बहुधा कोकिला व कावळे यांच्यामध्यें बाह्यतः बरेंच सादृश्य—निदान बाळपणीं—दिसत असतें, त्यावरूनच ही समजूत झाली असावी.

या श्लोकांत एकंदर स्त्रीजातीवर राजानें ताशेरा झाडला आहे. पण शिवाय याचा अर्थ शकुंतला परभृतेची पोरगी, दुसऱ्या द्विजाकडून—कण्वाकडून—पोषित झालेली. व बाह्यतः रमणीय कोकिलेसारखी, पण अंततः काकासारखी अपवित्र आहे, असेंही गूढार्थानें सुचविलें आहे असें ह्मणतां येईल.

हें ऐकून व त्याचा भाव ताडून व समजून शकुंतला रागानें लाल होऊन त्वेषानें ह्मणाली, 'अनार्या!—नीचा!—आपल्या मनाच्या मानानें दुसऱ्याला मानतोस! तूं केवळ लबाड, धर्माचें पांघरूण घेतलेला, तृणानें तोंड झांकलेल्या कूपाप्रमाणें घातकी!—अशा तुझें दुसरें कोण अनुकरण करणार? तुजसारखा लबाड व घातकी तूंच!'

हें तिचें खऱ्या रागाचें व आवेशाचें बोलणें ऐकून, व तिची स्थिति पाहून राजानें मनांत ह्मटलें, 'माझ्या बुद्धीला संशयांत टाकणारा इचा कोप कृत्रिम नसून अगदीं खरा दिसतो. तसेंच इनें मला एकांतांतील घडलेल्या रहस्य गोष्टींचें स्मरण दिलें, पण माझी चित्तवृत्ति विस्मरणामुळें अतिशय दारुण झालेली असल्यानें मी त्याच्यावर विश्वास ठेवित नाहीं, हें पाहून इला अत्यंत कोप आला आहे व त्याच्या सपाट्यांत इचे डोळे इंगळासारखे लाल व इच्या भृकुटि वेड्यावांकड्या झाल्या आहेत; त्या जणो स्मरधनुष्य मोडून तुकडे करून टाकल्यासारख्या वाटतात. हा इचा कोप कृत्रिम दिसत नाहीं.'

शकुंतलेच्या या वेळच्या स्थितीचें हें अप्रतिम वर्णन आहे. राजानें तिच्या वक्र भृकुटीला स्मरधनुष्याची उपमा दिसेली आहे तीही सरस व लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

हे विचार क्षणमात्र त्याच्या मनांत आले,

पण पुनः तो आपल्या प्रकृतीवर येऊन, तिला ह्मणाला—'बाई, दुष्यंताचें चरित्र प्रसिद्ध आहे. त्यांत असें—कपटाचें वर्तन—घडल्याचें किंवा त्यानें केल्याचें कोठें आढळत नाहीं.'

हें ऐकून शकुंतलेनें निराशेनेंसें ह्मटलें, 'वाः चांगलें! एकून मी स्वच्छंदचारिणी झालें! एकंदरींत पुरुवंशावर विश्वास ठेवून मुखांत मधु पण हृदयांत विष असलेल्या याच्या हातीं पडून मी स्वैरिणी झालें ह्मणायाची!' असें बोलत असतांना तिच्या मनाची विलक्षण स्थिति झाली व ती तोंडावरून पदर घेऊन रडूं लागली.

हा सर्व प्रकार पाहून शार्ङ्गरव कांहींसा त्रासानें व त्वेषानें ह्मणाला, 'कोणाशींही स्नेहसंबंध व प्रेमसंबंध करणें तो नीट विचार करून व त्याची सर्व तऱ्हेनें परीक्षा करूनच करावा. मन खरोखर कसें आहे तें न कळून घेतां केलेला संबंध हा असा घातक व दुःखद होतो.'

सामान्यतः उपदेश या नात्यानें आणि शकुंतलेच्या एकंदर स्थितीला विशेष दूषण या नात्यानेंही हा श्लोक ह्मणीसारखा उत्तम साधला आहे. त्याची रचना प्रौढ व त्यांतील विचार पोक्त आहेत.

हें त्याचें भाषण आपल्यालाच टोचणारें व दोष देण्याचें आहे, असें पाहून राजानें ह्मटलें, 'अहो वाः !ही सांगते तें सारें खरें व मी दोषी, असें जाणूनच जणों तुह्मी मला हा दोष देतां!'

त्याला शार्ङ्गरवानें टोचूनसें व कांहीं ईर्षेनें ह्मटलें, 'अहो, हा दूषणाचा व त्यावरील उत्तराचा प्रकार ऐकिला.

'जन्मापासून लबाडी कशी ती ठाऊक नाहीं, किंवा कोणी शिकविलेली नाहीं तिचें—शकुंतलेचें—भाषण खोटें आणि हे राजेश्री, दुसऱ्याला कसें फसवावें हें राजनीतिशास्त्र ह्मणून अध्ययन करणारे, ते यथार्थ भाषण करणारे होऊं पाहतात!'

हा श्लोक या ठिकाणीं फारच जोरदार व मार्मिक आहे. आणि त्याचें संगीत भाषांतर कै० अण्णा किर्लोस्कर यांनीं अप्रतिम केलें आहे. त्यांचा स्वतःचा या भाषणासंबंधाचा अभिनय तर फारच बहारीचा होत असे.

या धडधडित शिव्याचशा ऐकून राजानें ह्मटलें—( ऋषिजनांशीं भाषण करीत असल्यामुळें राजानें अगदीं सौम्यपणा धरला आहे; व सभ्यपणा व निदान बाह्यादर यांत कसर पडूं दिलेली नाहीं. )

'अहो खरें बोलणारे! समजा, तुह्मी ह्मणतां तेंही मानलें. पण इला ठकवून आह्मांला मिळणार काय?'

शार्ङ्गरव—'अधःपात.'

अशा लबाडीचा परिणाम अधःपात. हा विनिपात ऐहिक किंवा पारमार्थिक याचा विचार आहे. यावेळीं ऋषि लोक कसे प्रबळ असत हें लक्षांत आणिलें ह्मणजे हा विनिपात ऐहिकही होण्याचा—दुष्यंत अशा वर्तनानें राज्यभ्रष्टही होण्याचा—संभव नव्हता असें नाहीं.

राजा—'पौरवांनीं विनिपाताची इच्छा केली ही गोष्ट कोणीही खरी मानणार नाहीं.'

पौरव कुलांतील राजे इतके कांहीं थोर व प्रौढ आहेत कीं, ते अधःपाताची इच्छा करतील असें केव्हांही होणार नाहीं, व कोणी असें ह्मटलें तर त्याच्यावर विश्वासही पटणार नाहीं.

ही बाचाबाची वाढत जाणार असें पाहून शारद्वतानें ह्मटलें, 'शार्ङ्गरवा, व्यर्थ उत्तरें देण्यांत फल काय? आपण गुरूचा निरोप कळविला. चला परत जाऊं.'

नंतर तो राजाकडे वळून ह्मणाला, 'ही तुझी विवाहित स्त्री, इला सोडून दे किंवा बाळग.

पत्नीच्याठायीं पतीची प्रभुता सर्वतोमुखीं प्रसिद्ध आहे. गौतमी, चल पुढें हो.' असें ह्मणून ते निघाले.

स्त्रियांची परावलंबनाची स्थिति सर्वतः रूढ व मान्य झाल्याविषयींचे दाखले आपल्याकडील अगदीं प्राचीन ग्रंथांत देखील आढळतात. स्त्रीस्वातंत्र्य--त्यांतही विवाहित स्त्रीचें स्वातंत्र्य--याच्याविषयींची कल्पनासुद्धां लुप्तप्राय होऊन गेल्याला किती तरी काळ लोटला आहे. या संबंधानेंही हें भाषण विचारार्ह आहे-

ही मंडळी निघाली तशी शकुंतला ह्मणाली, 'या धूर्तानें मला अशी फसविली, आणि तुह्मी ही मला सोडून चाललां?!' असें ह्मणून तीही त्यांच्या मागून निघूं लागली. तेव्हां गौतमीनें थांबत ह्मटलें, 'वत्सा, शार्ङ्गरवा, ही पहा बिचारी माझी बाळ शकुंतला, दीनपणें रडत आपल्याच मागें येत आहे. नवऱ्यानें कठोर होऊन तिचा असा त्याग केला असतां तिनें काय बरें करावें?'

हें ऐकून व मागें वळून पाहून शार्ङ्गरवानें एकदम रागानें ह्मटलें--'कायगे ए दांडगे पोरी, स्वतंत्र वागूं पाहतेस?'

त्याची त्यावेळची मुद्रा, आवेश व भाषण ऐकून व पाहून शकुंतलेची तर गाळण उडाली. ती भिऊन थरथर कांपूं लागली. तिला शार्ङ्गरवानें पुनः ह्मटलें--

'राजा ह्मणतो तशीच तूं कुलकलंक असलीस तर तुला घेऊन तुझ्या पित्याला करावयाचें काय? पण तुझ्या शुद्धपणाविषयीं तुला खात्री असली तर पतीच्या घरीं दास्य करीत राहणें सुद्धां तुला योग्य व भाग आहे. रहा येथें; आह्मी जातों.'

या शार्ङ्गरवाच्या जोराच्या व आवेशाच्या भाषणावरून तर कालिदासाच्या वेळच्या स्त्रियांच्या अधिकाराविषयीं व सामाजिक स्थितीविषयीं चांगलेंच निदर्शन होतें. यासंबंधाच्या विचारांत अद्यापि तरी फरक पडलेला आहे असें नाहीं. व तो पडणें इष्ट किंवा अवश्य आहे कीं काय याचाही विचारच आहे.

राजा--'अहो तापस, या बिचारीला कां असे फसवितां?

'सूर्य व चंद्र, पंकज व कुमुदें यांनाच आल्हाद देणारे व स्वीकार करणारे. एक दुसऱ्याच्या परिग्रहाचा स्वीकार कधीं करीत नाहीं. तशीच माझी स्थिति आहे. ही शकुंतला परोपभुक्त दिसते. तिचा मी कधींही स्वीकार करूं शकणार नाहीं. तेव्हां व्यर्थ आशा धरून येथें राहण्याला तिला सांगून कां बरें फसवितां?'

शार्ङ्गरव--'कदाचित् इतर संबंधांमुळें पूर्व वृत्ताचें विस्मरण पडलें असलें तर आपण अधर्मभीरु कसे?'

इकडे आल्यावर दुसऱ्या स्त्रियांच्या सहवासानें शकुंतलेसंबंधाचें आपणाला विस्मरण पडलें असलें तर धर्मभीरुता कशी ह्मणतां येईल?

राजा--'यांतील कमजास्तीपणा मी आपणालाच विचारितों. मी मूढ झालों असेन कां ही खोटें बोलत असेल ही शंका. तेव्हां मी दारत्यागी व्हावें किंवा परस्त्रीस्पर्शदूषित होऊं?' हे दोन्ही दोष, यांतून कमीजास्ती कोणचा व मीं कोणच्यानें ग्रहण करावें तें तुह्मीच ठरवा.

पुरोहित तेथवर सर्व प्रकार पहात व भाषणें ऐकतच होता. त्यानें हें राजाचें बहुतेक त्यालाच उद्देशून केलेलें भाषण ऐकून विचार करून ह्मटलें, 'मी ह्मणतों, असें करा.'

राजा--'तें कसें काय, आज्ञा द्यावी.'

पु०--'इचा हल्लीं तुह्मी स्वीकार करीत नाहीं. ही तपस्वि मंडळी तिला बरोबर परत जाऊं देत

नाहीं. तेव्हां तुर्त असें करावें. प्रसूत होईपर्यंत इला आमच्या इथें राहूं दे. तुह्माला प्रथम चक्रवर्तीलक्षणयुक्त पुत्र होईल असें साधु व सिद्ध यांनीं ठरविलेलें आहे.

'ही ह्मणते तसाच खरा प्रकार असला तर इला पुत्र होईल तो चक्रवर्ती लक्षणांनीं युक्त होईल. तसें झालें असतां इचें तुह्मी अभिनंदन करून इला अंतर्गृहांत घ्यावी, नाहींतर इनें आपल्या बापाकडे परत जावें.'

ही व्यवस्थाच यावेळीं सामान्य लौकिकदृष्ट्या साध्य व योग्य होती. ती पुरोहितानें आपल्या भारदस्त तऱ्हेनें सुचविली. ती ऐकून राजानें, 'जशी गुरूजींची मर्जी' असें ह्मणून तिला आपली प्रतिकूलता नाहीं असें दर्शविलें. नंतर पुरोहितानें शकुंतलेला आपल्याबरोबर चलण्यास सांगितलें.

हें ऐकून शकुंतलेला आपल्या ह्या स्थितीबद्दल फारच वाईट वाटलें व तिनें विव्हळपणानें ह्मटलें, 'आई भूमिमाते, मला आपल्या पोटांत तरी जागा दे.' आणि ती रडत रडत पुरोहिताबरोबर निघून गेली. तसेंच तपस्वीही सर्व निघून गेले.

नंतर थोडा वेळ राजास शापामुळें विस्मरण पडलेलें होतें, तरी शकुंतलेसंबंधीं विचार करीत तो स्वस्थ उभा होता. इतक्यांत बाहेर 'आश्चर्य, हो आश्चर्य!' असा शब्द झाला. तो ऐकून, राजा—'हें काय बरें असावें' असा विचार करितो, तों पुरोहितानें गडबडीनें येऊन, 'राजा, मोठें अद्भुत वर्तमान घडलें!' असें ह्मटलें. राजानें—'तें कसें काय' ह्मणून विचारितां पुरोहित ह्मणाला, 'राजा, कण्वशिष्य परत फिरल्यावर ती मुलगी बिचारी आपल्या दैवाला नांवें ठेवीत हात आपटीत आक्रोश करूं लागली; तेव्हां अप्सरस्तीर्थाच्या जवळ स्त्रीच्या आकाराच्या एका ज्योतीनें तिला अंतरिक्षांत उचलून नेलें.' हें ऐकून सर्वांनाच मोठें आश्चर्य वाटलें.

राजा—'भगवंता, आह्मी त्याचा पूर्वींच नाद सोडून दिला आहे; त्याच्याविषयीं व्यर्थ तर्क करून फल काय? आपण जाऊन विश्रांति घ्यावी.' यावर राजाला आशीर्वाद देऊन पुरोहित निघून गेला.

राजा—'वेत्रवती, मी त्रासूनसा गेलों आहें; शयनभूमिकडे चल.' तिकडे जातां जातां राजा ह्मणाला,

'या मुनितनयेचा मी असा हा निषेध केला; तिच्याशीं लग्न केलें असल्याचें मला मुळींच स्मरत नाहीं; पण माझ्या मनाला याबद्दल फारच चटका लागला आहे, आणि तिच्या खरेपणाविषयीं माझ्या हृदयाला विश्वाससा वाटूं लागला आहे.'

हा अंक सुद्धां नाटकप्रयोगदृष्ट्या फार चांगला साधला आहे. राजाचा नित्यक्रम, व त्यापासून त्याला होणारें सुखदुःख, व त्याची आपल्या कर्तव्याविषयीं—प्रजापालनाविषयीं—दक्षता इत्यादिकांचें वर्णन कंचुकी व वैतालिक यांच्या भाषणांत चांगल्या तऱ्हेनें केलेलें आहे. पुढें शकुंतलेसह आलेल्या कण्वशिष्यांच्या भाषणाचा प्रकार; राजवाड्यांतील ऐश्वर्य व गडबड पाहून त्यांच्या मनांत येणाऱ्या विचारांचें प्रदर्शन; त्यांची व राजाची भेट होऊन झालेला भाषणप्रकार; राजाचें शांत व गंभीर व स्वतःविषयीं योग्य आदर आणि आपल्या कर्तव्याविषयीं जागृति इत्यादिकांनीं युक्त असें वर्तन; शार्ङ्गरव, गौतमी व शारद्वत यांचीं भाषणें; शकुंतलेच्या मनाची स्थिति दाखविणारीं थोडथोडींच पण हृदयद्रावक स्वगत व प्रगट भाषणें;

व शेवटचें दीनपणाचें व निराशेचें भाषण;--वगैरे सर्व प्रकार अप्रतिम साधलेले आहेत. या अंकांत स्थलांतर फारसें--किंबहुना मुळींच--नाहीं. तरी घडलेल्या गोष्टींचें वैचित्र्य असावें तितकें योग्य व चांगलें असेंच साधलें आहे.

---

## अंक सहावा.

मागील अंकांत वर्णन केल्याप्रमाणें दुष्यंत राजानें शकुंतलेला प्रत्यादेश करून घालवून दिल्यावर कांहीं दिवसांनीं या अंकांत वर्णन केलेल्या गोष्टी घडून आलेल्या आहेत. या सर्व हस्तिनापुरांत व तेथील राजवाड्यांत घडल्या आहेत.

एके दिवशीं हस्तिनापुर शहरचा कोतवाल, एका धीवराला कैद करून दोघां शिपायांसह राजवाड्याकडे चालला होता. वाटेंत जातांजातां दोघेही शिपाई त्या धीवराला मारीत होते.

बहुधा नगरच्या कोतवालाचें काम बरेंच विश्वासाचें, महत्वाचें, चांगल्या प्राप्तीचें, आणि मानाचें असे. त्या कामावर राजाच्या विशेष वशील्याच्या मनुष्याचीच नेमणूक करण्याचा परिपाठ होता. त्यांतही हें काम राजाच्या मेव्हण्यालाच बहुतकरून सांगितलें जाई. कारण राजाजवळ राणीच्या इतका दुसरा मोठा वशीला आणखी कोणचा असणार! हे लोक बहुधा मूर्ख, दारूबाज, गर्विष्ठ, व कुचकामाचे असावयाचे अशी सामान्यतःच समजूत असल्यानें बहुतेक प्राचीन कवींनीं त्यांचें याला अनुसरूनच वर्णन केलें आहे.

शिपायांनीं दरडावून ह्मटलें, 'अरे ए चोर', महाराजांचें नांव कोरलेला खडा बसविलेली ही आंगठी तुला कोठें, कशी सांपडली सांग.'

धीवर भिऊन गांगरून ह्मणाला, 'अहो शिपाईदादा, क्षमा करा; माफ करा. मी असलें काम करणारा नव्हे." शिपायाच्या प्रश्नांवरून ते ही आंगठी आपण कोठून तरी चोरून आणली असें समजताहेत असें जाणून धीवरानें, आपण चोर नव्हे, अशा अर्थाचें हें उत्तर दिलें आहे. त्याचा भाव ओळखून एका शिपायानें ह्मटलें, 'तर तूं जाडा विद्वान् ब्राह्मण समजून महाराजांनीं तुला हें दान दिलें होय?'

धीवर--'ऐका दादा, मी शक्रावताराच्या जवळच राहणारा एक धीवर आहें.'

यावर दुसऱ्या शिपायानें दरडावून ह्मटलें, 'कायरे चोरा, तुला आम्ही तुझी जात विचारली होय?'

हें ऐकून कोतवालानें शिपायाला कांहींसें दाबीत ह्मटलें, 'सूचका, त्याला सारें क्रमानें सांगूदे. मध्येंच असा अडवूं नकोस.'

शि०--'जशी हुजूरची आज्ञा.'

धीवर--'मी जाळीं, गळ वगैरे साधनांनीं मासे धरून कुटुंबपोषण करितों.'

कोतवालानें हसून ह्मटलें, 'कुटुंबपोषणाचा मोठा शुद्ध व उत्तम मार्ग.' हें भाषण अर्थातच धीवराच्या धंद्याविषयीं तिरस्कारद्योतक आहे.

धीवर--'पिढीजाद धंदा लोकांनीं नांवें ठेवण्याजोगा असला तरी सोडतां नये. श्रोत्रिय लोक यज्ञांत पशु मारतांना क्रूर होतात तरी ते दयाळू व मृदु मनाचेच असतात.'

कोळ्यानें कोतवालाला या ठिकाणीं सहजपणें पण स्पष्ट व खरा टोला दिला आहे. या भाषणावरून कवीचा सर्वत्रसमदर्शीपणा व पोक्त विचार उत्तम तऱ्हेनें दिसून येतात. सुभाषित या नात्यानेंही हा श्लोक वाईट नाहीं.

कोतवाल--'बरें पुढें?'

धी०--'एके दिवशीं मी एक रोहित मासा धरला. तो चिरतांना त्याच्या पोटांत ही रत्नखचित अंगठी मला दिसली. ती मी विकण्याकरितां दाखवित फिरत होतों, तों आपण मला

धरिलें. मला मारा कां सोडा. ही याविषयींची खरी हकीकत.'

हें भाषण अगदीं साधें, भोळेपणाचें, खरें आणि स्पष्ट आहे.

कोतवाल—'जानुका, हा हाडखाऊ, याच्या अंगाला तशी घाण येते. जातीचा कोळी खरा दिसतो. याला अंगठी आढळण्याचा प्रकारही संभवतो. चला राजवाड्यांत जाऊं.'

शि०—'जशी आज्ञा.—चल रे ए घंटीचोरा!' असें ह्मणत सर्वजण राजद्वाराजवळ आले.

कोतवाल—'सूचका, दोघेही याला या वेशीच्या द्वाराशीं नीट धरून ठेवा. तोंवर या अंगठीसंबंधें सर्व हकीकत यजमानांना कळवून व ती त्यांस दाखवून त्यांचा हुकूम घेऊन येतों.'

शिपायी—'आपण स्वामीच्या प्रसादासाठीं चलावें.'

नंतर कोतवाल राजवाड्यांत गेला. कांहीं वेळानें एक शिपाई ह्मणाला, 'जानुका, धनीसाहेबांला उशीर झाला.'

दुसऱ्यानें उत्तर दिलें, 'राजेलोकांजवळ त्यांच्या सवडीप्रमाणेंच प्रवेश होत असतो, समजलास?'

शि०—'जानुका, या रांडलेकाच्या गळ्यांत वध्य-योग्य माळा बांधण्याला माझे हात कसे फुरफुरताहेत.' असें ह्मणून त्यानें धीवराकडे हात केला.

धीवर—'भाऊ, विनाकारण मज गरिबाला मारण्याची इच्छा कां करितां?'

जानुक—'हे आपले धनीसाहेब हातीं महाराजांचा हुकूम घेऊन इकडेच येताहेत. अरे ए हरामखोरा! तूं गिधाडाना बळी पडणार किंवा कुत्र्यांच्या तोंडीं लागणार ग्रास, मग जलाम?'

या भाषणांत कवीनें अशा प्रतीच्या लोकांतील नेहमीं दिसून येणाऱ्या साहजिक भिन्न भावांचें चांगलें द्योतन केलें आहे. सूचकाचा दांडगेपणा व क्रौर्य, जानुकाचा किंचित् विचारीपणा व पोक्तपणा—तरी बहुतेक सूचकाप्रमाणेंच थोडीशी आलेली क्रूरता, आणि धीवराचा गरीब व साधा भोळा तरी निर्भीड स्वभाव, हे सर्व बरेच चांगले व्यक्त झाले आहेत.

कोतवाल—'अरे सूचका, या धीवराला सोडून दे. याला अंगठी सांपडल्याचा प्रकार खरा आहे.'

शि०—'जशी धनीसाहेबांची आज्ञा. यमाच्या घरीं जाऊन परत आला ह्मणतात तो हा.' असें ह्मणत त्यांनीं धीवराला मोकळा केला.

त्यानें कोतवालाला प्रणाम करून ह्मटलें, 'धनीसाहेब, कां माझा धंदा कसा!?'

को०—'अरे, महाराजांनीं तुला अंगठीच्या किंमतीइतकें हें इनामही दिलें आहे—घे.'

तें घेऊन धीवरानें ह्मटलें, 'ही महाराजांची मजवर मोठीच मेहरबानी.'

सूचक—'याचें नांव अनुग्रह. सुळावरून उतरून हत्तीच्या पाठीवर बसविणें तें हें!'

जानुक—'धनीसाहेब, महाराजांना कसा काय आनंद झाला तें सांगा तर खरें. अंगठी फार आवडीची होती वाटतें?'

को०—'ती त्यांना इतकी प्यारी आहे ती तिच्यांतील रत्न मोठेंसें मौल्यवान आहे ह्मणूनच नव्हे, तर तिच्या दर्शनानें त्यांना कोणा प्रियमाणसाचें स्मरण झालें असावें. ते जात्याच मोठे गंभीर, तरी मुहूर्तभर व्याकुळसे झाले.'

सूचक—'तर मग धनीसाहेबांनीं महाराजांची मोठीच नोकरी बजाविली!'.

त्याला जानुकानें कांहींसें असूयेनें धीव-

राकडे पहात म्हटलें, 'अरे, या बेट्या मासे धरणाऱ्या धीवराकरितांच कां म्हणेनास?'

कौ०—'धनीसाहेब, यांतून अर्धे फूल-फुलाची पाकळी म्हणून—स्वीकार करावें.'

जानुक—'हो, हा ठीक म्हणतो.' कोतवालानें तसें करीत म्हटलें, 'धीवरा, वाः तूं तर आमचा मोठाच दोस्त झालास गड्या. आज पहिल्या प्रथम कादंबरीसख्य करूं—चला गुत्यावरच जाऊं'. असें म्हणून सर्वजण निघून गेले.

हा प्रवेश तत्कालीन—किंबहुना इकडे सार्वकालीन—अशा संबंधांत चाललेल्या प्रकाराचा अत्युत्तम द्योतक आहे. आजकालसुद्धां हा प्रकार पुष्कळशा ठिकाणीं संस्थानांत बहुतेक असाच व इंग्रजी अमलदारींत थोड्याशा पर्यायानें आढळून येत नाहीं, असें कोण म्हणेल?

अशा तऱ्हेचें वस्तुस्थितिद्योतक वर्णन मृच्छकटिकांत कांहींसें आहे. इतर नाटकांत तें क्वचितच आढळतें.

---

नंतर आकाशयानांत— विमानांत—बसलेली सानुमती नांवाची अप्सरा आकाशांतून हस्तिनापुरांतील राजवाड्याकडे येतां येतां म्हणाली,—'अप्सरा तीर्थाजवळ पाळी पाळीनें आम्हांला हजर राहावें लागतें, त्यांत आज माझी पाळी होती. ती मी साधुजनांच्या अभिषेककालापर्यंतची उरकली. आतां जाऊन राजर्षि दुष्यंताकडील हकीकत प्रत्यक्ष पाहावी. मेनकेच्या संबंधामुळें शकुंतला मला माझ्या देहासारखीच प्रिय. मेनकेनेंही मला आपल्या मुलीच्यासाठीं म्हणून याविषयीं पूर्वींच सांगितलें आहे.' चोहींकडे पाहात ती पुनः म्हणाली, 'या ऋतूत्सवकालींदेखील या राजवाड्यांत सर्वत्र सामसूम व निरुत्सव असा प्रकार कां बरें? हें सर्व अंतर्ज्ञानानें जाणतां येईल. तरी पण सखीचा आदर केला पाहिजे.—बरें, या दोघी उद्यानपालिकांच्या मागेंच गुप्तपणें राहून माहिती काढून घ्यावी.' असें म्हणून ती विमानांतून उतरून अदृश्य होत्साती व विमानही अदृश्य करून उभी राहिली.

शकुंतला सोमरात उपाध्यायाच्या बरोबर आक्रोश करीत जात असतांना तिला कोणी एका ज्योतीनें उचलून नेली असें मागें वर्णन केलें आहे. त्यानंतर तिचें काय झालें त्याचें येथें कवीनें नुसतें सूचन केलें आहे. तिला तिची माता मेनका अप्सरा इनें उचलून नेलें. व आपली सखी सानुमती इला दुष्यंत राजाची स्थिति व व्यवस्था कशी काय आहे, तें फुरसतीनें समजून घेऊन येण्याकरितां सांगितलें.

हें अप्सरातीर्थ गंगेवर होतें असें वर्णन आहे. व पुरोहिताच्या भाषणावरून तें राजवाड्यापासून फारशा अंतरावर नव्हतें असें ठरतें. राजवाडा हस्तिनापुरांत होता. तेव्हां हस्तिनापुरही गंगेच्या कांठीं होतें असें मानलें पाहिजे. हस्तिनापूर म्हणून गंगातीरावरच एक नगर होतें असें 'भारतस्थलादर्शा'त कनिंगहाम साहेबांच्या भूगोलावरून लिहिलें आहे. अप्सरस्तीर्थावर साधुजन नित्य स्नानाला येत. त्यांची स्नानसंध्या उरकेपर्यंत तेथें आसपास एकेका अप्सरेनें पाळीपाळीनें रहाण्याचा ठराव होता. त्यांत आज सानुमती अप्सरेची पाळी होती. व तीर्थावरील हजिरीचें काम उरकून ती राजवाड्यांतील शोध काढण्याकरितां आली होती.

आकाशयान— विमान— याविषयींची कल्पना फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे, व ती बहुतेक राष्ट्रांत आहे. ती केवळ कविकल्पनाच आहे किंवा तिच्यांत कांहीं तथ्य

आहे. तें मात्र कळत नाहीं. हीं आकाशयानें बसणाऱ्याच्या मनोगतीनें आपोआप चालत असें दिसतें.

सानुमतीनें तिरस्करिणी विद्येच्यायोगें स्वतः-लाच अदृश्य केलें असें नसून आपलें विमानही अदृश्य केलें आहे.

अशाच तऱ्हेची, स्वतःला अदृश्य करून पुढें चाललेला प्रकार स्पष्टपणें स्वतः दुसऱ्याला न दिसतां पाहण्याची तऱ्हा भवभूतीनें उत्तरराम-चरितांत तिसऱ्या अंकांत सीता व तमसा यांच्या संबंधानें केली आहे. पण त्यांत व यांत फरक इतकाच कीं, येथें सानुमती एकटीच व स्वतःशीं भाषण करीत असल्यानें तिला आपला शब्द-सुद्धां तिरस्करिणी विद्येनें दुसऱ्याच्या कानीं पडूं न देण्याची व्यवस्था करावी लागली नाहीं. पण सीता व तमसा यांचा बरेच वेळ संवाद झाला, व तो राम आणि वासंती यांच्या समक्ष झालेला असूनही त्यांना ऐकूं आला नाहीं असें मानावें लागलें आहे. यांत भवभूतीनें ही तिरस्करिणीची कल्पना एक दोन पायऱ्या पुढें नेलेली आहे. पण मूळांत ही कल्पना त्यानें कालिदासापासूनच घेतली असें ह्मणण्याला अवकाश आहे.

नंतर बागेचें रक्षण करणाऱ्या दोघी दासी आल्या. त्यांतून एक आंब्याच्या मोहोराकडे उत्सुकतेनें पहात होती व दुसरी तिच्या मागें जवळच होती.

पहिलीनें आंब्याच्या मोहोराला उद्देशून ह्मटलें, 'हा आंब्याचा मोहोर किंचित् लालवट, हिरवा व पांढरा आहे. तो या वसंत मासाचें जीवितसर्वस्व आणि या ऋतूचें मंगल—तो आ-तांच माझ्या दृष्टीस पडला, त्याचें अभिनंदन व प्रार्थना करितें.'

वसंतमासाच्या आरंभीं सर्व तरुण स्त्रीपुरु-षांच्या मनाला मोठा उल्हास वाटत असतो. व ते वसंतमासाचे द्योतक आंब्याचे मोहोर वगैरे पदार्थ पाहून हौसेनें त्यांचें गानात्मक सेवन व तद्द्वारा ज्यों वसंत-ऋतूचें पूजन व स्तवन करूं लागतात, अशी कवीची कल्पना आहे. तिला अनुसरून हें व राजाच्या प्रवे-शापर्यंतचीं पुढील सर्व भाषणें आहेत.

पहिल्या दासीचें हें गायन व पुटपुटणें ऐकून दुसरी उद्यानपालिका ह्मणाली, 'परभृतिके, अशी एकटीच काय पुटपुटते आहेस ती?'

पर०—'मधुकरिके, अगे मोहोर पाहून पर-भृतिका-कोकिला-उन्मत्त होते.'

मोहोराचें नांव घेतांच वसंतमास लागला असें ध्यानांत येऊन मधुकरिका गडबडीनें पुढें येऊन आनंदानें तिला ह्मणाली, 'काय मधुमास—वसंत-मास लागला?'

पर०—'मधुकरिके, हो, आतां तुझ्या नाचण्या-बागडण्याचा व चैनीनें भाषण करण्याचा काल आला पहा!'

तिकडे लक्ष दिलें न दिलेंसें करून मधुकरि-केनें ह्मटलें, 'गडे, मला थोडा टेका दे. पुढच्या पावलावर उभी राहून आंब्याच्या मोहोराच्या कळ्या काढतें आणि कामदेवाची पूजा करितें.'

पर०—'मला त्याचें अर्धे फल देशील तर!'

मधु०—'अगे, हें न सांगतां सुद्धां ठरलेलेंच. आपले देह मात्र दोन, जीवित एकच नाहीं का?'

नंतर तिनें परभृतिकेचा आधार घेऊन मोहोर काढला व तो पाहून ह्मटलें, 'अग बाई! कळ्या उमलल्या नाहींत तरीसुद्धां त्यांचा किती घम-घमाट सुटला आहे!' कपोतकतऱ्हेचा नम-स्कार करीत हात जोडून तिनें ह्मटलें, 'हे चूतां-कुरा, मी तुला धनुर्धारी कामाला अर्पण करितें. त्याच्या पांचही बाणांहून वस्ताद व पथिक जनांच्या युवतींवर नेम मारण्याला उत्कृष्ट साधन असा त्याचा सहावा बाण हो.' कोणी

प्रवासाला गेले असले ह्मणजे त्यांना व त्यांच्या स्त्रियांना विरहबाधा विशेष होते. तशांत वसंतादि उपभोगक्षम दिवस व चूतांकुरादिक उपभोगाचीं व उन्मादक साधनें असलीं ह्मणजे तर त्यांना अधिकच त्रास होतो. याला अनुलक्षून हें वर्णन आहे.

असें ह्मणून तिनें चतांकुर कामदेवाला ह्मणून अर्पण केला.

या उद्यानपालिकांची नांवें व त्यांच्या भाषणाचा विषय व भाषणें हीं सर्वच उद्यान व वसंत ऋतु वगैरेना उत्तम साजतील अशा तऱ्हेची कवीनें योजना केली आहे.

तोंच एकदम गडबडीनें व रागानें प्रवेश करीत कंचुकीनें तिला ह्मटलें, ' हंः ! मूर्ख दांडगी कुठली ! शुद्धीवर नाहींस वाटतें ? महाराजांनीं वसंतोत्सव बंद केला असतांना तूं आंब्याच्या कळ्या तोडते आहेस ? ! '

त्याला दोघींनींही भीत भीत उत्तर दिलें, ' आर्या, क्षमा करा ! आह्मांला हें ठाऊक नव्हतें.

कं०—' महाराजांनीं वसंतोत्सव बंद करावा ह्मणून हुकूम केला आहे तो मनुष्यांनींच मानला आहे असें नाहीं, तर वसंतांत फुलणाऱ्या व बहारीला येणाऱ्या तरूंनीं व त्यांच्यावर वास करणाऱ्या पक्ष्यांनींही निमूटपणें मानला आहेसें दिसतें. असें असून तो तुह्मी ऐकिला नाहीं असें कसें ह्मणतां ? हें पहा, या आंब्याचा मोहोर, त्याच्या कळ्या कधींच आलेल्या, पण जणों महाराजांचा हुकूम ऐकून तटस्थ राहिल्या आहेत—उमलून पराग बांधीत नाहींत. तीच स्थिति या कुरबकांची—अगदीं उमलण्याला तयार असूनही त्याच कारणाकरितां कळी जशीच्या तशीच राहिलेली आहे. शिशिर जाऊन वसंत लागल्याला बरेच दिवस झाले, तरी कोकिल आपला मनोहर शब्द करीत नाहींत. तो जणों महाराजांच्या आज्ञेला मान देऊन त्याच्या गळ्यांत अटकून राहिला आहे. फार तर काय, पण या सर्वांना उल्हास देणारा आणि अशी अवस्था आणणारा प्रत्यक्ष कामदेव—तो देखील महाराजांच्या आज्ञेमुळें चकित होत्साता आपले बाण भात्यांतून अर्धवट ओढलेले आंवरून बसलेला आहे. '

कंचुकीनें सहजपणें महाराजांच्या अनुशासनाची प्रौढी व योग्यता अशा सुरेख व अलंकारिक प्रकारानें व्यक्त केली आहे. वर्णन फारच मजेदार आणि कंचुकीच्या मानानें भारदस्त असें आहे.

त्याला दोघींनींही उत्तर दिलें, ' खरेंच, यांत संदेह नाहीं. महाराजांचा प्रभावच तसा आहे. ' एकीनें पुनः ह्मटलें, 'आर्या, राष्ट्रीय मित्रावसूंनीं आह्मांला राणीसाहेबांच्या पायापाशीं नुकतेंच पाठविलें. येतांच आह्माला या प्रमदवनपालनाचें काम सांगितलें गेलें. नवीनच आलेल्या असल्यानें हा वृत्तांत आम्हीं ऐकिला नव्हता. '

कंचुकी—' बरें, पुनः नका असें करूं. '

त्याचें हें सौम्य व पोक्तपणाचें भाषण ऐकून त्या मुलींना धीर आला व त्यांनीं ह्मटलें, 'दादा, आह्माला कौतुक वाटतें ह्मणून विचारतों, आह्मी ऐकण्यासारखें असलें तर सांगा,—धनी साहेबांनीं वसंतोत्सव बंद कां केला ? '

वसंतोत्सवप्रतिषेधाविषयीं हा कसा प्रसंगोपात्त व सहज प्रश्न करविला आहे. हीं सर्व भाषणें सानुमती ऐकतच होती. तिलाही राजानें वसंतोत्सव बंद करविल्याचें आतांच कळलें होतें. याचें कारण काय असावें, असें तिलाही वाटून ती आपल्याशीं ह्मणाली, ' मनुष्यमात्राला उत्सव प्रिय असतो. तसेंच कांहीं विशेष कारण असेल.'

कंचुकी—' सगळीकडे त्याची वाच्यता झालेली, त्यांत न सांगण्याला काय झालें ?-शकुंतलेला घालवून दिल्याचा लोकापवाद तुमच्या नाहीं कां कानीं आला ? '

उद्यानपालिका—'राष्ट्रियाच्या तोंडून अंगुलीयक दर्शनापर्यंतची हकीकत कळली आहे. '

कं०—'तर थोडेंच सांगावयाचें बाकी आहे. आपली अंगठी पाहतांच महाराजांना आपण खरोखरच शकुंतलेशीं गंधर्वविवाह केला असल्याचें स्मरण झालें, व आपण मोहानें तिला व्यर्थ घालवून दिलें, अशी त्यांची खात्री झाली. तेव्हांपासून त्यांना असा कांहीं पश्चात्ताप झाला आहे. त्यांना प्रत्येक रम्य वस्तूचा द्वेष झाला आहे.कामाकाजांत मुळींच लक्ष नसल्यानें अमात्य, प्रजाजन, व सेवक यांच्याकडून पाहिल्याप्रमाणें ते सेवाचाकरी घेत नाहींत. रात्रंदिवस विरहामुळें व विवंचनेमुळें अस्वस्थ असतात. रात्रीं अंथरुणावर तळमळत सारखे जागे पडत असतात. अंतःपुरांतील इतर राण्यांशीं बोलण्याचा प्रसंग येतो तेव्हां त्यांचें अगदींच मन न मोडावें ह्मणून कांहीं तरी दाक्षिण्यानें बोलतात. त्यांत भलतीला भलतेच नांवानें हाक मारतात, आणि मग शुद्धीवरसे आले ह्मणजे बराच वेळ लज्जित, खिन्न व सुन्न होतात.'

हें राजाच्या विरहातुरपणाच्या स्थितीचें फार चांगलें वर्णन केलेलें आहे.

सानुमती—' राजाची शकुंतलेसंबंधीं ही स्थिति झालेली ऐकून मला किती तरी प्रिय वाटतें. कारण यांत त्याचें शकुंतलेवर असलेलें आत्यंतिक प्रेम व्यक्त होतें. '

कचुंकी—' या मानासिक त्रासामुळें त्यांनीं उत्सव बंद केला आहे.'

त्याला दोघींनींही—'हो, जुळतें.'—असें ह्मटलें, तोंच—' असे इकडून यावें महाराज '—असे शब्द त्यांच्या कानीं पडले. ते नीट कान देऊन ऐकल्यासारखे करून कंचुकी ह्मणाला, ' महाराज इकडेच येताहेत,—काम करूं लागा, जा. '

हें ऐकून दोघीही निघून गेल्या.

राजा, विदूषक आणि प्रतिहारी त्या प्रमदवनांत येत होते. राजानें पश्चात्तापाला सदृश वेश केला होता. त्याची ती अवस्था पाहून कंचुकीनें ह्मटलें, 'थोर व महानुभाव लोक कशाही अवस्थेंत असले तरी रमणीय व प्रेक्षणीयच दिसतात. हे महाराज असे आतुर व पर्युत्सुक आहेत तरी कसे चांगले प्रेक्षणीय दिसतात !

'तसेंच या वेळीं महाराजांनीं आपल्या शरीरावर विशेष अलंकार किंवा संस्कार केलेला नसून फक्त डाव्या हातांत एकच सोन्याचें चमकदार सलकडें घातलें आहे. वरचेवर विरहदुःखामुळें दीर्घ व उष्ण श्वास सोडीत असल्यानें ह्यांचा अधरोष्ठ लालबट झाला आहे. सारखी चिंता व जागरणें चाललीं असल्यानें त्यांचे नेत्रप्रांत आरक्त झाले आहेत. व ते एकंदरींत क्षीण झालेले दिसतात. तरी आपल्या अंगच्या अद्वितीय तेजोगुणामुळें—साहाणेवर घासून पैलू पाडले गेलेल्या उत्कृष्ठ रत्नाप्रमाणें—कृश झालेले असूनही तसे भासत नाहींत. ' हेंही वर्णन राजाच्या सद्यःस्थितीला अक्षरशः लागू, व मार्मिक आणि उत्तमांतलें आहे. मुळचेंच प्रेक्षणीय रूप मदनानें पीडित व क्षीणसें असलें तरी तें एक तऱ्हेनें अधिकच मोहक व सुंदर दिसतें. याचा हल्लींही अनुभव येत नाहीं असें नाहीं.

सानुमतीनें राजाला पाहून ह्मटलें, 'यानें घालवून दिली व अवमान केला असूनही याच्याकरितां शकुंतला अशी झुरते तें ठीकच आहे. याचें रूप, लावण्य व आकृति तशींच आहेत.'

राजा व्यग्रचित्त होत्साता कशीं तरी पावलें टाकीत हळू हळू. येतां येतां ह्मणाला,

'माझें मूर्ख व दुर्दैवी हृदय त्या सारंगाक्षी प्रियेनें जागें करण्याचा यत्न केला असूनही गाढ झोंपीं गेलें. आणि आतां पश्चात्तापदुःखाचा अनुभव घेण्याला जणों जागें झालें आहे!' आपल्या हृदयाचा उपालंभ करण्याचें हें प्रथमचेंच भाषण राजाच्या त्यावेळच्या स्थितीचें व व्यथेचें चांगलें द्योतक आहे.

सानुमती, 'खरेंच त्या बिचारीचें हें असें भाग्य—तिची कींव करण्याजोगी आहे खरीच. याची ही अशी अवस्था तिच्यासंबंधानेंच झालेली दिसते, तेव्हां ती बिचारी भाग्यवान खरीच!'

राजाचें हें कांहींसें स्वगत भाषण ऐकून विदूषकानें आपल्याशीं ह्मटलें—'या राजश्रीना पुनः शकुंतलाव्याधीनें घेरिलें. याची चिकित्सा कशी काय होणार कोण जाणे!'

इतक्यांत कंचुकीनें येऊन विनंती केली—'महाराजांचा जयजयकार असो! महाराज, या प्रमदवनांतील सर्व भाग तपासून आलों. महाराजांनीं वाटेल त्या जागीं जाऊन आराम करावा.' प्रमदवनांत कोठेंही कोणीही महाराजांना त्रास होईल असें संचार करीत नाहीं; किंवा वसंतोत्सवाचे प्रकार—ज्यांना पाहून आपणाला उद्वेग होईल असे—चाललेले नाहींत. वाटेल तिकडे खुशाल संचार करावा.

राजा—'वेत्रवतिके, अमात्य आर्यपिशुन यांना जाऊन सांग, फार वेळ जागरण झाल्यामुळें आज धर्मासनावर यावयाला व्हावयाचें नाहीं. तेव्हां आपण ज कांहीं पौरकार्य पाहिलें असेल त्याबद्दल टिपण करून पाठवावें.'

यांत, राजा नेहमीं धर्मासनावर जाऊन प्रजेचें कार्य—न्याय इन्साफाचें—करीत असे, पण कधीं कधीं प्रकृति नीट नसली, किंवा जागरण वगैरे घडलें असलें, ह्मणजे न जातां अमात्यालाच काम करण्याला सांगून पाठवून त्यानें केलेल्या कामाचें टिपण तो मागवून घेत असे, व त्यावरून कांहीं कमजास्त असल्यास हुकूम देत असे, असें दाखविलें आहे. व यावरून राजाची प्रजेच्या कार्याविषयीं दक्षता स्पष्ट केली आहे.

वेत्रवती,—'जशी हुजूरची आज्ञा' असें ह्मणून निघून गेल्यावर, राजानें कंचुकीलाही आपल्या कामाला जाण्यास सांगितलें. तो निघून गेला तसें विदूषकानें ह्मटलें, 'आपण तर येथें कोणी चिटपाखरूं राहूं दिलें नाहीं. आतां या रमणीय प्रमदवनांत दाट व शीतळ छायेंत खुशालपणें करमणूक करून घेत फिरावें.'

त्याच्याकडे लक्ष दिलें न दिलेंसें करीत राजानें ह्मटलें, 'मित्रा, अनर्थ रंध्रारंध्रातून एकदम येऊन हल्ला करूं लागतात हें कांहीं खोटें नाहीं. कारण—

'माझें मन मुनिसुतेच्या प्रेमाच्या स्मृतीला आड येणाऱ्या तमानें युक्त झालें असतां नीच मदनानें प्रहार करण्याकरितां हा आम्रमंजरीरूपी प्रखर शर धनुष्यावर चढविला आहे.'

राजाची स्थिति यावेळीं अगदीं वेड्यासारखी झाली होती. त्याला शकुंतलेला घालवून दिल्याबद्दल फारच वाईट वाटत होतें व ती पुनः प्राप्त होण्याची बहुतेक निराशाच होती. त्याचें तिजविषयक प्रेम अत्यंत बळावत चाललें होतें. प्रत्येक बाह्य गोष्ट आपल्यालाच त्रास देण्याला कारण होत आहे, व एका मागून एक अनर्थपरंपराच आपल्यामागें लागली आहे, असें त्याला वाटत होतें. आपलें मन, स्मृतिरोधी अशा गाढ तमानें व्याप्त आहेच, तशांतच मदनानें आपल्यावर जास्त प्रहार करण्याकरितां आंब्याच्या मोहोररूपी नवीन दृढतर शराची धनुष्यावर योजना केली आहे, असें त्याला वाटलें.

हें ऐकून विदूषकानें तत्काळ आपल्या तऱ्हेवर ह्मटलें, 'थांब तर—हा पहा—या दंडकाष्टानें मी या साऱ्या कंदर्पव्याधीचें मुख्य कारण व प्रहार करण्याला मुख्य साधन आम्रमंजरीचाच फडशा पाडतों ह्मणजे झालें.' आणि तो हातांतील काठी आवेशानें उगारून तसें करण्याला तयार झाला. तेव्हां राजा हंसत ह्मणाला, 'अहो आपलें ब्रह्मतेज पुरें झालें. पण मित्रा, नाजूकपणा व प्रेक्षणीयपणा यांच्या संबंधांत प्रिया शकुंतलेचें लता कांहींसें अनुकरण करितात. त्यांच्याकडे पहात बसल्यानें कदाचित् तिचेंच स्मरण होऊन मनाची समजूत होईल, अशा लता कोठें बरें पाहण्यास सांपडतील?'

विदूषक—'पण आपणच चतुरिका दासीला नाहीं कां सांगितलें, कीं माधवीमंडपामध्यें ही वेळ घालवीन—तर मी स्वतः शकुंतलेची तसबीर काढलेली पाटी तेथेंच घेऊन ये ह्मणून?'

राजा—'मनाला करमणूक होण्याचें तें स्थान आहे खरें. चला तिकडच जाऊं.'

नंतर दोघेही तिकडेच जाऊं लागले. सानुमतीही त्यांच्या मागें चालली.

विदूषक—'हा माधवी मंडप, त्याच्यांत मणिशीलेचा चौरंग चहूंकडे पुष्पांनीं शोभित केला आहे, त्यामुळें तो कसा रमणीय वाटतो आहे. जणों आपलें स्वागत करण्याची तो वाट पाहतो आहे. तेव्हां चला आंत बसा.'

राजवाड्याच्या आसपासच्या उपवनांत अशा तऱ्हेचे मंडप व कुंज पुष्कळसे तयार करविलेले असतात. व त्यांच्यांत संगमवराच्या बैठकी घातलेल्या असतात. हा प्रकार हल्लींसुद्धां इंदूर, ग्वाल्हेर, बडोदें, जयपूर इत्यादि ठिकाणीं आढळून येतो.

दोघेही मंडपांत जाऊन बसले. तेव्हां सानुमतीनें ह्मटलें, 'वेलीच्या आडून प्रियसखीची तसबीर पाहूं दे तर—ह्मणजे तिच्या भर्त्याचें तिजवरील नानाप्रकारचें दिसलेलें प्रेम वर्णन करण्याला ठीक पडेल.' असें ह्मणून तिनें तसें केलें.

राजा,—'मित्रा, शकुंतलेचा सारा वृत्तांत आतां मला आठवतो. तो तुलाही मी सांगितला होता. तिला मी घालवून दिली त्यावेळीं तूं जवळ नव्हतास. पण पूर्वी सुद्धां कधीं तूं मला स्मरण दिलें नाहींस—तिचें नांव सुद्धां काढलें नाहींस—तुलाही विस्मरण पडलें वाटतें.'

विदूषक—'मी कांहीं विसरलों नाहीं. पण मला सरें सांगून शेवटीं ह्मणालास, 'गड्या ही सारी थट्टा बरें—यांत खरें कांहीं नाहीं.' माझी बुद्धि काय मातीच्या ढेकळासारखी, मीही तें सारें तसेंच समजलों—अथवा भवितव्यता बलवती—होणार चुकत नाहीं झालें.'

हें विदूषकाचें भाषण किती साधें, भोळेपणाचें व सहज आहे. यांत त्यानें आपल्याकडे थोडासा दोष घेऊन राजाला आपल्याशीं कपट केल्याबद्दल टोलाही दिला आहे.

सानुमती, 'हो असेंच खरें!'

राजानें थोडा वेळ विचारसा केला; विदूषकानें सुचविल्याप्रमाणें शकुंतलेला घालवून देण्यासंबंधांत सर्वथैव आपलाच दोष आपणच आपल्या दुःखाला कारण झालों व हें दुःख आतां अपरिहार्य आहे असें जाणून त्याचें मन कासावीस झालें व त्यानें ह्मटलें, 'मित्रा, मला आतां तूंच तार.'

विदू०—'अरे, हें काय! थोर लोक असे इतके शोकग्रस्त व दुसऱ्यांनीं नांवें ठेवण्यासारखे गाफिल कधीं होत नाहींत. कसाही सपाट्याचा वारा सुटला तरी पर्वत निष्कंपच राहतात—नाहीं का?'.

हेंही विदूषकाचें भाषण राजाला समजुतीचें तर आहेच, पण चांगलें भारदस्त व मार्मिकही आहे.

राजा०—'मित्रा, मी प्रियेला विनाकारण दुःख दिलें. त्यावेळच्या तिच्या अवस्थेचें स्मरण होऊन मी यावेळीं फारच व्याकूळ झालों आहें.

'शकुंतलेला मी झिडकारिलें, व स्वीकार करीत नाहीं असें कठोरपणानें साफ सांगितलें. तेव्हां ती आपल्या मंडळीमागें जाऊं लागली. तोंच तिला तिच्या गुरूसारख्याच पूज्य गुरूच्या शिष्यांनीं एकदम दरडावून—थांब, येथेंच रहा—असें ह्मटलें. तेव्हां ती अगदींच दीन झाली व तिनें मजकडे परतून पाहिलें. त्यावेळीं तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आलेले व चेहरा गोरामोरा झालेला होता. त्यावेळची ती तिची दृष्टि विषदिग्ध शल्यासारखी सलते आहे.'

हें राजानें केलेलें वर्णन फारच हृदयंगम आहे. हाही श्लोक या नाटकांत उत्तमांतला आहे.

हें भाषण ऐकून व राजाची दीन स्थिति पाहून सानुमतीला यावरून राजाचें शकुंतलेवरील प्रेम व्यक्त होत असल्यानें आनंदच वाटला. पण याचें तिलाच आश्चर्यसें वाटून ती ह्मणाली. 'वाः काय गंमत पहा—स्वकार्यपरता ही अशी—याच्या संतापाला व दुःखाला पाहून मला उलटा आनंद होतो आहे!'

विदूषक, 'अहो, मला वाटतें, तिला कोणी तरी स्वर्गींच्या अप्सरेनें नेली.'

राजा०—'अरे, त्या प्रतिदेवतेला इतर कोण स्पर्श करूं शकणार? तुझी सखी मेनकेच्या पोटीं जन्मलेली, तिच्या सख्यांपैकींच कोणी तरी तिला उचलून नेलें असावें.'

सानुमती—'याला विस्मरण पडलें याचेंच आश्चर्य, हा शुद्धीवर आला याचें नव्हे.' याचा स्वभावच असा शुद्ध व प्रेमळ आहे कीं ह्याला अशा गोष्टींचें विस्मरण कसें पडलें याचेंच आश्चर्य. तो पुनः शुद्धीवर आला हें ठीकच आहे. सानुमतीला दुर्वासाचा शाप झाला असल्याचें माहित नव्हतें.

विदूषक—'असें असेल तर तिचा आपला पुनः समागम होणार खास.'

राजा०—'तो कसा काय?'

विदू०—'कन्येला पतिवियोगदुःख झालेलें वडिलांना पाहवत नाहीं. ते त्यांचा समागम घडवून आणण्याचा होईल तेथवर प्रयत्न करितात.'

राजानें निराशेनेंसें ह्मटलें, 'शकुंतलेच्या समागमाचा घडलेला सर्व प्रकार स्वप्न, माया किंवा मतिभ्रम, यांच्यासारखा क्षणभंगुर व पुनः केव्हांही परत न येणारा असा होऊन गेला. तो तूं ह्मणतोस तसा परत कसचा प्राप्त होतो! माझ्या पुण्याईचें फलच तितकें, नदीकांठच्या कडे पुरामध्यें कोसळल्याप्रमाणेंच हे सारे मनोरथ आहेत. त्यांना खळ नाहीं व अंतही नाहीं.'

हेंही वर्णन कितीतरी यथार्थ व मनोहर आहे. यावरून राजाच्या मनाची या वेळची खिन्न, उत्कंठित व निराशेची स्थिति उत्तम व्यक्त होते.

त्याचें समाधान करीत विदूषकानें ह्मटलें 'असें नका ह्मणूं. पुनःअवचित पण अवश्य समागम होणार याचें ही अंगठीच उत्तम प्रमाण आहे.' ती माशाच्या पोटांत गेलेली आपोआप आपल्या हातीं परत आली व तिनें आपल्याला शकुंतलेशीं घडलेल्या पूर्व वृत्ताचें स्मरण दिलें यावरूनच पुनः तिचा खचित समागम होणार अशी साक्ष पटते.

याप्रमाणें अंगठीचें स्मरण सहजपणें होतांच तिच्याकडे पहात पूर्वीची विचारसरणी पार विसरून राजानें तिलाच उद्देशून ह्मटलें:—

'अरे, हीच पहा ती मूर्ख, सहज प्राप्त न होणारें स्थान मिळालें असूनही तेथून भ्रष्ट झालेली—शोचनीय अंगठी!

'हे मुद्रिके, तुला अरुण—आरक्त—नखांनीं युक्त व मनोहर अंगुलीवर स्थळ मिळालें असूनही तूं तेथून च्युत झालीस, यावरून मजप्रमाणेंच तुझेंही पुण्य तितकें कमी हें खास.'

हा राजानें मुद्रिकेचा खासा मार्मिक उपालंभ केला आहे.

सानुमती—'ही तेथून भ्रष्ट होऊन दुसऱ्या कोणाच्या हातीं पडती तर खरीच अभागी होती.' ती पुनः तुझ्याच हातीं परत आली तेव्हां ती मोठीशी अभागी आहे असें नाहीं.

विदूषकानें सहज कौतुकानें विचारिलें, 'पण कां हो, आपण ही अंगठी काय ह्मणून तिच्या हातांत घातली होती!'

सानुमती—'मला तरी याविषयीं कौतूहल होतेंच, त्यालाच अनुसरून जणों यानें हें विचारिलें.'

राजानें शकुंतलेला अंगठी कांहीं उद्देशानेंच दिली असावी, पण उद्देशाविषयीं विदूषकाला व सानुमतीलाही शंका वाटली. विदूषकानें प्रश्न केला तो आपल्या मनोगतानुरूपच केला असें तिला वाटलें.

राजा—'ऐक. मी नगराला येण्याला निघालों, तेव्हां प्रियेनें डोळ्यांत पाणी आणून पुनः किती दिवसांनीं समाचार घेणें होईल, असें विचारिलें. तेव्हां ही अंगठी तिच्या बोटांत घालीत मीं तिला ह्मटलें, 'तूं प्रतिदिवशीं यांतील एकेक अक्षर मोजीत जा. तूं त्यांच्या शेवटाला पोहोंचण्यापूर्वीच तुला माझ्या अंतःपुरांत नेण्याला माझीं माणसें येऊन पोहोंचतील.' पण मी कठोरहृदयी—हें सारें विसरलों.'

सानुमतीनें साश्चर्य खेदानें ह्मटलें, 'अवधि उत्तम व रमणीय ठरविला होता, पण त्याला दैवच आड आलें!'

विदूषक—'पण धीवरानें धरलेल्या रोही माशाच्या पोटांत ही कशी पोहोंचली?'

राजा—'तुझी सखी शची तीर्थावर वंदन करण्याला गेली होती. तिच्या हातांतून तेथें ती गळून पडली.'

हें ऐकून सानुमतीनें कांहींसें समाधानानें ह्मटलें, 'तरीच बिचाऱ्या शकुंतलेशीं लग्न केलें न केलें याविषयीं या अधर्मभीरु राजर्षीच्या मनांत संशय आला तो.—पण असल्या अनुरागाला अभिज्ञानाची अपेक्षा कां लागावी?'

दुसऱ्याची परिणत स्त्री आपण स्वीकारण्यांत अधर्म होईल अशी शंका येऊनच राजानें तिचा स्वीकार केला नाहीं, व त्याला खुणेच्या वस्तूची अपेक्षा लागली. पण असें हें दृढ प्रेम, याला खुणेची अवश्यकता कां लागावी? दुर्वासशापामुळेंच असें घडलें, हें सानुमतीला माहित नव्हतें. व राजाही निष्कारण शकुंतलेचा प्रत्यादेश करील इतका लबाड नाहीं. हें दाखविण्याकरितांच कवीनें सानुमतीच्या तोंडीं हें भाषण घातलें आहे. यांत नायकाचा धीर, उदात्त व ललित स्वभाव त्याच्या एकपक्षीं विरुद्धच असणाऱ्या पात्राच्या तोंडून ध्वनित केला आहे.

नंतर राजाचें लक्ष पुनः त्या अंगठीकडे गेलें व तो ह्मणाला, 'या अंगठीची तरी चांगली निर्भर्त्सना करितों.'

विदूषकानें आपल्याशीं ह्मटलें 'या राजश्रीनीं आतां वेड्याचा मार्ग धरिला!'

राजा अंगठीला उद्देशून ह्मणाला—'ह्या सुंदर

व कोमल कराच्या अंगुलीचा त्याग करून तूं पाण्यांत बुडून नष्ट झालीस ती काय ह्मणून ?'

इतक्यांत विचार पालटून तो ह्मणाला, 'पण ही अचेतन, तिनें गुणाची पारख केली नाहीं हें ठीकच.–आह्मी शाहाणसुरते–मीं कां तिला झिटकारून घालवून द्यावी ?'

राजाच्या मनाची या वेळची स्थिति कांहीं चमत्कारिकशी झाली होती. शकुंतलेविषयीं दृढ प्रेम, तिला घालवून दिल्याबद्दल अनावर खेद व पश्चाताप, आणि त्याची साहजिक प्रज्ञा इत्यादिकांचे परिणाम त्याच्या मनावर सतत व एकदम होत होते. त्यामुळें इकडे अंगठीला ज्ञानवान, सचेतन समजून तिची निर्भर्त्सना करितां, तोंच ती अचेतन--तिला गुणाची पारख ती कसली–मी स्वतः शहाणा शुद्धीवर असलेला त्या मी कां तिचा त्याग केला, याचें त्याला स्मरणमें होऊन त्यानें यासंबंधें आपलीच निर्भर्त्सना अधिक केली आहे.

हाही श्लोक उत्तमांतला आहे.

विदूषकानें स्वतःशींच ह्मटलें, 'माझी भुकेनें कोण खायखाय व कासावीस झाली आहे, आणि हे असे वेडेपीर झालेले–सोडून जाण्याची सोय नाहीं.'

राजा शकुंतलेला उद्देशून ह्मणाला–'तुझा निष्कारण परित्याग केल्याचा मला भारीच पश्चात्ताप होत आहे. तर पुनः दर्शन देण्याची दया कर.'

हें वाक्य भवभूतीच्या सरणीचें, दीर्घ समासयुक्त व अवजड शब्दांनीं भरलेलें आहे. हें कालिदासाचें आहे किंवा नाहीं याची शंकाच वाटते. त्याच्यांत तितकें स्वारस्य किंवा त्याची या स्थळीं विशेष अवश्यकताही नाहीं. इतक्यांतच शकुंतलेचें चित्र काढलें असलेला चित्रफलक घेऊन गडबडीनें चतुरिका ह्मसी आली. तिच्या प्रवेशाचें सूचक व राजाच्या आर्तवचनाला मान देऊन शकुंतलेनें प्रत्यक्ष नाहीं तरी चित्रगत दर्शन दिल्याचें सूचक, असें हें भाषण आहे ह्मणून समजावें, तर कालिदासाची तऱ्हा अशी दीर्घसूत्री नाहीं. त्याची रचना सहजमनोहर असते. कदाचित् हें भाषण प्रक्षिप्त असेल. तें नसलें तरी पुढील चतुरिकेच्या प्रवेशाला अडचण पडण्याजोगी नाहीं.

हें भाषण संपतें तोंच चतुरिका गडबडीनें येऊन ह्मणाली–'ही चित्रगत भट्टिनी.' असें ह्मणून तिनें तसबीर दाखविली.

या चतुरिकेच्या गडबडीनें येण्याचेंही स्वारस्य कळत नाहीं. राजानें तिला पूर्वींच, मी अमुक ठिकाणीं असेन, तेथें तो चित्रफलक घेऊन ये, असें सांगितलें असावें व त्यावरूनच ती तो घेऊन आली. पण इतकी घाई व गडबड कां व कशाकरितां तें स्पष्ट नाहीं. त्या तसबिरीचें वर्णन करीत विदूषकानें ह्मटलें—

'वाः मित्रा! ही आकृति इतकी कांहीं सुंदर आहे व तिच्यांत सर्व भाव असे स्पष्ट व सुरेख रेखलेले आहेत कीं, त्यांच्याकडे पाहतांना त्यांतील उंच सखल भागांवर–जणों प्रत्यक्ष मूर्तीकडे पहात असल्याप्रमाणें–माझी दृष्टि अडखळते. तुझें कौशल्य अप्रतिम असून पात्र ही तसेंच मिळालें आहे!'

सानुमती—'वाः काय तरी या राजर्षीची ही निपुणता! माझी सखी जशी प्रत्यक्ष पुढें उभी आहे, असा भास होतो.'

राजा—'या चित्रामध्यें जें जें कांहीं उणें आहे तें तें नीट करण्याचा मी सारखा यत्न करितों. पण तिच्या लावण्याची थोडीशीच झाक यांत आली आहे. तिचें रूपलावण्य चित्रित होणें शक्यच नाहीं इतकें अप्रतिम आहे.'

सानुमती—'हें याचें भाषण याला झालेला पश्चात्ताप व याचें तिजवरचें अत्यंत प्रेम व या-

चा निगर्वी स्वभाव, या साऱ्यांना अनुरूपच आहे.'

विदूषक—'येथें तिघी जणी दिसतात. सर्वच प्रेक्षणीय व सुंदर, यांतली शकुंतला कोणची?'

सानुमती—'हा असल्या–सुंदर–रूपाचा अनभिज्ञ–शुंठ!'

राजा—'पण तुला कोणची वाटते?'

विदू०—'ही, केशबंधन शिथिल होऊन त्यांच्या अग्रांतील फुलें लडबडीतशीं झालेली, तोंडावर घर्मबिंदु आलेले, बाहु विशेष गळलेले, अशी या नुकतेंच पाणी घातल्यामुळें स्निग्ध व मनोहर दिसणाऱ्या तरुण आम्रवृक्षाखालीं थोडी थकलेलीशी काढलेली दिसते ती शकुंतला, व दुसऱ्या तिच्या सख्या असाव्यात.'

हें चित्र राजानें शकुंतलेला ज्या विशेष मनांत ठसणाऱ्या सुंदर अवस्थेंत प्रथम उभी असतांना पाहिली होती त्यावेळचें आहे. याबद्दलचें वर्णन मागें पहिल्या अंकांत आलेंच आहे. हें चित्र खरोखरच रमणीय असलें पाहिजे यांत शंका नाहीं.

राजा—'तूं निपुण खराच. तरी पण, या चित्रांत मी एक चूकी केली आहे. येथें वरचेवर स्वेदामुळें ओलसर झालेल्या अंगुलीचे प्रांत मलिन दाखविले आहेत. कपोलावर रंगाचा थेंब पाडून ती जागा फुगल्यासारखी दाखवून अश्रु पडल्याचें चिन्ह दर्शविलें आहे.'

यांत राजानें या चित्रगत शकुंतलेला पाहून व तें चित्र काढतांनाही प्रेम व विरहदुःखामुळें आपली कशी अवस्था झाली होती व आहे, याचें सहज निदर्शन केलें आहे.

राजा—'चतुरिके, हें विनोदाचें स्थान अर्धेंच काढलें गेलें आहे. जा, कलमें व रंग घेऊन ये.'

चतु०—'आर्य माढव्या, तोंवर हा चित्रफलक धरा तर.'

राजा—'कशाला? मीच तो धरतों, आण.'

राजा—'काय पहा, पूर्वी प्रिया प्रत्यक्ष प्राप्त झालेली सोडली आणि आतां या चित्रगत प्रियेलाच विशेष मानीत बसलों आहें! तुडुंब भरलेली नदी मागें सोडून मृगजलामागें आस्थेनें लागावें तशांतलेंच हें!'

हाही श्लोक चांगल्यांतला आहे. यांतील विचार साहजिक तरी प्रौढपणाचे आहेत, व सरणी साधी व मनोरम आहे.

हें ऐकून विदूषकानें आपल्याशीं ह्मटलें, 'हे गृहस्थ नदी सोडून मृगजलामागें लागले खरेच.' पुनः मोठ्यानें ह्मणाला, 'पण कां हो, यांत आणखी काय काय काढावयाचें राहिलें आहे?'

यांतील पूर्वभाग राजाच्या भाषणाचाच अनुवादसा आहे. तेव्हां तो आत्मगत कां घातला आहे व विदूषकाकडून असा याचा अनुवाद करविण्यांत स्वारस्य कोणचें, तें लक्षांत येत नाहीं. ही गोष्ट कालिदासाच्या एकंदर काव्यरचनेच्या प्रकाराला जुळणारी वाटत नाहीं. कदाचित् एवढा हा भाग क्षेपक असेल.

राजानें रंग व कलमें मागविलीं, व चित्र अर्धवट राहिलें असें ह्मटलें; तेव्हां विदूषकाचा पुढील प्रश्न साहजिक आहे.

सानुमतीनें—'माझ्या सखीला आवडीचा वाटत असेल तो तो प्रदेश याच्यांत काढण्याचा विचार आहेसें वाटतें.' हें पुढील श्लोकाचें सूचन आहे.

राजा—'ऐक.

'येथें वाळवंटावर हंसमिथुनें बसलेलीं आहेत अशी मालिनी नदी, आणि तिच्याजवळच हरिण स्वस्थ बसलेले गौरीगुरु हिमाचलाचे पावन व रम्य प्रान्तभाग काढावयाचे आहेत. तसेंच, शाखांवर

वल्कलें टांगलेलीं आहेत अशा वृक्षाखालीं, काळवीटाच्या शृंगावर डावा डोळा हळूच खाजवीत असलेली हरिणीही काढावयाची आहे.'

चित्र पुरें करण्याला काढावयाच्या ह्मणून सांगितलेल्या या सर्व गोष्टी खरोखरच मोठ्या रमणीय, चित्राच्या संबंधानें व राजाच्या विरहावस्थेला व तत्कालीन विप्रलंभ शृंगाराला पोषक अशाच आहेत. कोणी चतुर चितारी कालिदासानेंच वर्णन केल्याप्रमाणें हें चित्र तयार करील तर तें खरोखर प्रेक्षणीय होईल. या वर्णनावरूनही, चित्र कसें असावें ह्मणजे मोहक अधिक होईल, ही गोष्ट कालिदासाला उत्तम अवगत होती असें स्पष्ट दिसून येतें.

विदूषक–( स्वगत ) 'मला वाटलें होतें, ही चित्राची सारी पाटी लांब लांब दाढी मिशा व जटा असलेल्या तापसांचे कळपांचे कळप काढून हे भरून टाकणार.'

राजाच्या हल्लींच्या मनाच्या स्थितीच्या मानानें पाहतां हें विदूषकाचें भाषण स्वगत नसतें तर त्याच्यांत राजाची थट्टा केल्यासारखें होणार. हें योग्य नाहीं. हें आहे तसेंच स्वगत भाषण धरलें तर त्यांत विदूषकाला राजाचें मन ओळखण्याची अक्कल नव्हती इतका तो मूर्ख किंवा अजागळ होता असें म्यावें लागणार. पण त्याच्या इतर भाषणांवरून व कृतीवरून तो असा वेडा किंवा अजागळ होता असें मनांत येत नाहीं. यामुळें या स्वगत भाषणाचें स्वारस्य लक्षांत येत नाहीं.

राजा–'मित्रा, आणखीही यांत शकुंतलेला योग्य अलंकार घालावे असें आह्मी मनांत आणिलें आहे.'

विदूषक–'ते कसे काय?'

सानुमतीनें आपल्याशीं ह्मटलें, 'वनवासांतील साहजिक सौकुमार्य व स्वतंत्रपणा यांना अनुरूप असें कांहीं असेल.'

राजा–'अरे, कपोलापर्यंत लोंबत असलेलें शिरीष पुष्पाचें कर्णभूषण, तसेंच स्तनांच्या मध्यभागीं शरद् ऋतूंतील चंद्रकिरणांप्रमाणें मनोहर आणि कोमल बिसतंतुही काढलेले नाहींत.'

शकुंतला राजाला तपोवनांत प्रथम दृष्टीस पडली तेव्हां तिच्या शरीरावर तिच्या त्यावेळच्या अवस्थेस अनुरूप अशीं साधीं पण मनोहर आभरणें होतीं. त्यांतीलच हीं शिरीष पुष्पांचीं आभरणें असावीत. तिनें मृणाल तंतूचे हार घातले असावेत.

नंतर विदूषकानें तिच्याकडे पहात पुनः ह्मटलें, 'पण अहो, आपला कोमल कुवलपल्लवाप्रमाणें आरक्त तळहात मुखाआड धरून ही अशी घाबरल्याघाबरल्यासारखी कां उभी आहे ती?' ( एकाच चित्रांत हे दोन्ही प्रकार दाखविणें शक्य नाहीं. हें सर्व काल्पनिक वर्णन घेतलें पाहिजे. )

पुनः पाहिलेंसें करून तो ह्मणाला, 'अंः हा पहा रांडलेक.–फुलांतील मधुर मधुर रस चोरणारा भ्रमर–तिच्या तोंडाभोंवतीं घिरट्या घालतो आहे!'

राजा—'अरे. ह्या दांडग्याला हांकून दे!'

विदूषक–'दांडगे लोकांचें शासन करण्याचा अधिकार आपला.'

राजा–'होय. खरें ह्मणतोस. अरे ए पुष्पित लतेवराल प्रिय अतीथि! इथें व्यर्थ आगंतुकीचा श्रम व खेद कां करितोस?

'ही पहा पुष्पावर बसलेली भ्रमरी तुजवर आसक व तृषित आहे, आणि मधुरसही तयार आहे. तरी ती तुझी वाट पहात आहे–एकटी मधुप्राशन करीत नाहीं. जा तिकडे.'

राजाचें हें भाषण त्याच्या कामी व विरही स्थितीला अनुरूप असेंच आहे. त्यानें भ्रमराला तुजकरितां तुझी प्रिया भ्रमरी वाट पाहते आहे, तिजकडे जा, व तिच्यासह मधुपान कर. व्यर्थ इच्या–शकुंतलेच्या–नादीं कां लागलास ? अशा अर्थाचें हें भाषण भ्रमर ऐकतो आहे व समजतो आहे असें समजून केलें आहे।

सानुमती–' वाः हें योग्य व न्यायाचें असेंच निवारण झालें ह्मणावयाचें ! '

विदूषक—' हांकून लावलें तरी लोंचट व वक्र अशी भ्रमराची जात ! '

राजानें जणों तन्मय होत्साता ह्मटलें, ' काय रे ए–माझी आज्ञा ऐकत नाहींस कां? ऐक तर आतां––

'माझ्या प्रियेच्या बिंबाधराचें मी सुरतप्रसंगीं मोठें जपून जणों प्राशन केलें. तिचा अधर अक्लिष्ट व अनन्यस्पृष्ट अशा बालतरूच्या पल्लवाप्रमाणें मोहक–त्याला तूं दांडगाईनें स्पर्श तर कर, कीं तुला मी कमलोदरांत कैद करून टाकतों !'

कमलोदरांतून भ्रमराला सुटून जातां येत नाहीं, तें आपोआप उमलेपर्यंत त्याला आंतच पडून राहावें लागतें, अशी कविकल्पना आहे.

राजाच्या या वेळच्या अगदीं तल्लीन स्थितीला अनुरूप असेंच हें त्याचें भाषण व वर्णन आहे.

विदूषक—' अशा जबर शिक्षेला तो कां नाहीं भिणार ?!' नंतर त्यानें मोठ्यानें हंसत आपल्याशीं ह्मटलें, ' हे तर राव वेडे झाले ! आणि त्यांच्या संगतीनें मीही पण त्यांतलाच होतों आहें !' ( प्रेम व विरह यांच्यामुळें वेडा होत्साता तल्लीन होऊन हा चित्रांतील सारा प्रकार खरा समजून चालला आहे, आणि त्याच्या संगतीनें माझीही त्याच्यासारखीच स्थिति झालेली आहे. ) नंतर त्यानें मोठ्यानें ह्मटलें, ' अहो, हें चित्र आहे–चित्र !'

यावर राजानें शुद्धीवर आल्यासारखें करून आश्चर्यानें व खेदानें ह्मटलें, ' काय चित्र ?! '

सानुमतीनें चकितसें होऊन ह्मटलें, ' या वेळीं मी देखील तन्मय होऊन गेलें होतें. मग याला तर यांत दर्शविलेल्या सर्व गोष्टींचा प्रत्यक्ष अनुभव घडलेला. '

चित्रांत दाखविलेला व काढलेला प्रकार इतका कांहीं हुबेहुब होता, व त्यांतच राजा व विदूषक यांच्या तत्संबंधीं भाषणानें इतका कांहीं त्याला खरेपणा आला होता कीं, राजा व सानुमती यांना त्या प्रसंगाचा प्रत्यक्षतः अनुभव घडतो आहे, असें झालें होतें. असें होण्याचें कारण चित्राचा उत्कृष्टपणा तर खराच, पण त्यांतही राजा व सानुमती यांना शकुंतलाविषयक गोष्टींचा प्रत्यक्षसा अनुभवही होता. विदूषकाचा प्रकार तसा नसल्यानें तो केवळ त्रयस्थासारखा व शुद्धीवर होता.

कवीनें हा प्रसंग फार उत्तम साधला आहे.

राजानें खेदानें व कष्टानेंसें ह्मटलें, ' मित्रा, काय हा दुष्टावा केलास बरें ? अरे, यावेळीं मी तन्मय होऊन तिच्या दर्शनसुखाचाच अनुभव घेत होतों. पण तूं खऱ्या स्थितीचें स्मरण देऊन ही माझी कांता–मला खरी भासत होती ती पुनः चित्ररूप केलीस ! '

असें बोलतां बोलतां त्याच्या डोळ्यांतून अश्रुपूर लोटला. कारण त्याला यावेळीं खरोखरच अत्यंत खेद होत होता.

ही त्याची स्थिति पाहून सानुमतीनें आश्चर्यानें ह्मटलें,

' हा याचा विरहमार्ग पाहावा तो पूर्वापर विरोधी–अपूर्व आणि कांहीं विलक्षण आहे–कशास कांहीं मेळ नाहीं.' ··

राजा—'मित्रा, अरे, हें मी सतत साहूं तरी कसें? सारख्या जागरणामुळें तिचा स्वप्नांत समागम होणें शक्य नाहीं. आणि चित्रांत तरी तिला पाहावें ह्मटलें, तर हे अश्रु तेंही घडूं देत नाहींत.'

सानुमती—'या तुझ्या निर्मळ शोक व खेद यांच्या द्वारानें त्वां शकुंतलेचा परित्याग करून तिला दुःख दिलेंस, त्याचा तूं सर्वपरी उतराई झालास.'

इतक्यांत चतुरिकेनें येऊन राजाचा जयजयकार करीत ह्मटलें, 'महाराज, मी कलमाची पेटी घेऊन येत होतें--

राजा—'बरें मग?'

चतु०—'तों वसुमती राणीसाहेब तरलिकेसह इकडेच येत होत्या. त्यांनीं—मीच नेऊन देतें आण—असें ह्मणून ती माझ्या हातून काढून घेतली.'

विदूषक—'तूं मोठी दैवाची ह्मणूनच सुटलीस!'

चतुरिका—'राणी साहेबांचा शालू झाडाला अडकला तो तरलिका सोडवित आहे इतक्यांत मी निसटलें.'

हें ऐकून राजानें किंचित् साशंक व स्वस्थपणें ह्मटलें, 'मित्रा, ही देवी येत आहे. ती मानी व गर्विष्ठ आहे. ही तसबीर तूं सांभाळ कशी!'

शकुंतलेची तसबीर राणीच्या दृष्टीस पडली तर ती मानी व कुर्रेबाज असल्यानें तिला खपणार नाहीं, व्यर्थ त्रास होईल, तेव्हां तूं ही आपल्याजवळ घेऊन लपवून संभाळून ठेव.—यांत राजानें आपल्या दुसऱ्या राणीविषयीं किंचित् प्रेम, बराच आदर, व कांहींशी भीति दाखविली आहे.

यावर विदूषकानें गडबडीनें व कांहींसें टोंचूनच ह्मटलें, 'आपणालेच असें कां ह्मणाना?' नंतर चित्राची पाटी घेऊन उठून जातां जातां तो ह्मणाला, 'आपण अंतःपुर—काळकूटांतून सुटलां ह्मणजे मला मेघप्रतिछंदप्रासादांत हाक मारा.'—राणी येथें आल्यावर बरीच गडबड उडेल; ती आपल्याला चित्र कोणाचें काय ह्मणून विचारील; तुह्मी सांगण्याला टाळाटाळ कराल तसतसा तिला अधिकाधिक मत्सर वाटेल; ती नाराज होईल; आपल्यावर रागावून भलभलतें बोलेल व त्रास देईल; आपल्याला वर वर प्रेम दाखवून तिची कशी तरी समजूत करण्याचा यत्न करावा लागेल. तो आपल्या हल्लींच्या स्थितींत आपल्याला किती तरी तापट—जणों काळकूटासारखा होईल; हें सारें आटपलें ह्मणजे मग मला आपण हाक मारा, असें ह्मणत तो गडबडीनें निघून गेला.

हें सर्व पाहून सानुमती ह्मणाली, 'याचें मन दुसरीकडे वेधलेलें असूनही पहिलीचा मान राखण्याची ह्याला इच्छा आहे. पण तिच्याविषयींचें याचें प्रेम पार शिथिल झालेलें आहे.'

याचें मन शकुंतलेवर दृढ बसलेलें आहे, तरी तो बाह्यात्कारें या वसुमती राणीचा मान ठेवूं पाहतो आहे.

इतक्यांत प्रतिहारीनें येऊन राजाचा जयजयकार केला. तेव्हां राजानें तिला विचारलें, 'वाटेंत देवी तुला नाहीं का आढळली?'

प्रति०—'हो, पण माझ्या हातीं कामाचे कागद पाहून त्या परत गेल्या.'

राजा—'ती हुशार व प्रौढ—राजकार्याला व्यत्यय आणूं नये हें ती जाणते. ह्मणूनच ती परत गेली.

प्रतिहारी—'महाराज, अमात्यांची विनंती आहे. खजिन्याची गणती करावयाची असल्यानें आज पौरकार्य एकच पाहण्यास झालें.

तें लिहून सेवेशीं पाठविलें आहे, स्वामींनीं पाहण्याची कृपा करावी.'

राजा—'आण तें पाहूं.' असें ह्मणून त्यानें तो कागद घेऊन पाहिला. त्यांतील मजकूर वाचीत तो ह्मणाला, 'काय! दर्यावर्दी व्यापारी धनमित्र गलबत बुडून मरण पावला?! बिचाऱ्याला मूलबाळ नाहीं. तेव्हां त्याची सर्व संपत्ति राजाकडे यावयाची असें अमात्यांनीं लिहिलें आहे. निपुत्रिक असणें खरेंच कष्टकारक. तो मोठा धनाढ्य होता—तेव्हां त्याला पुष्कळ बायका असतीलच—त्यांच्यांतून कोणी गर्भवती आहे काय तपास करावा.'

प्रतिहारी—'अयोध्येच्या सावकाराची कन्या त्याची स्त्री. तिचें नुकतेंच पूंसवन झालें असें ऐकितें.'

राजा—'तर मग त्या गर्भाचा पितृधनावर हक्क आहे, असें अमात्याला जाऊन सांग.'

'जो हुकूम' असें ह्मणून प्रतिहारी जाऊं लागली. तेव्हां त्यानें पुनः ह्मटलें, 'इकडे ये अशी.'

प्र०—'ही आलें—काय आज्ञा?'

राजा—'त्याला संतति आहे कां नाहीं याच्याशीं काय? ज्या कोणाचा जो कोणी आप्तबंधु नाहींसा होईल त्यांचा—त्याच्यांत कांहीं पाप नसेल तेव्हां—हा मी दुष्यंत त्यांच्याठायीं आहें, अशाविषयीं चोहींकडे डांगोरा पिटविण्याला सांग.'

या राजाच्या एकंदर भाषणप्रकारांत त्याचें सौजन्य व प्रजाबंधुत्वाविषयींचे सढळ व थोर विचार उत्तमपणें व्यक्त केले आहेत. तत्कालीन राजाच्या चांगुलपणाचें द्योतन करण्यापेक्षां कवीच्या मतें, किंवा सर्वमान्य मतें, ते कसे असावेत, याविषयींचे हे विचार अधिक द्योतन करितात. अशा तऱ्हेचे थोर राजे क्वचितच पाहण्यांत येतात. अलीकडे त्यांचा बहुतेक लोपच झाला आहे ह्मणण्याला हरकत नाहीं. सर्व प्रजेचे निरनिराळे रीतीनें बंधु होण्यांत, अर्थात् एकाद्या स्त्रीचा पती मरण पावला तर, दुष्यंतानें तिचा पती होणें यांत पाप घडेल. तेव्हां असले संबंध व आप्तपणा सोडून बाकीचे दुष्यंतानें पतकरिले आहेत.

प्रति०—'होय, असा डांगोरा पिटविला पाहिजे.' असें ह्मणून बाहेर जाऊन थोडे वेळानें परत येऊन ह्मणाली, 'सर्वांना ही आज्ञा ऐकून मुकाळीं वृष्टि झाल्याप्रमाणें आनंद झाला आहे.'

प्रतिहारीनें बाहेर जाऊन, डांगोरा पिटविण्याला सांगून—तो पिटविला गेल्यावर लोकांनीं तो ऐकून आनंद मानला—तो प्रत्यक्ष पाहून प्रतिहारीनें परत येऊन राजास कळविलें असलें पाहिजे. व या सर्व गोष्टी होण्याला कांहीं काळ लागला असेल. तो येथें अगदींच थोडा धरला आहे. प्रतिहारी परत येईपर्यंत राजा स्वस्थ मनाशीं विचार करीत बसला होता, असें घेतल्यानें व तो यावेळीं रंगभूमीवर वास्तविकपणें त्याच्या मतें एकटाच असल्यानें यांत फारसा गौणपणाही नाहीं. तरी हा प्रकार प्रयोगाच्या वेळीं विसंगतसा वाटणार.

हें ऐकून राजानें विचारसा करून व मोठ्यानें उसासा टाकून ह्मटलें, 'तर मग संतति खुंटून पुढचा आधार नाहींसा झाला व मूळ पुरुष आटपला ह्मणजे त्या कुलाची संपत्ति व वैभव दुसऱ्याकडे जावयाचें? माझ्यामागें तरी ही पुरुवंशश्री अकालीं बीज पेरलेल्या भूमीप्रमाणें निष्फळ होणार?'

सावकाराच्या निपुत्रिक मरणाच्या प्रसंगावरून, आपणही निपुत्रिक असल्याचें राजाला सहज स्मरण झालें, व आपल्यामागें आपला वंश चालणार नाहीं, दुसऱ्याच कोणाकडे राजलक्ष्मी जाईल, आणि आपलें व आपल्या वंशाचें नांव बुडेल, ह्मणून त्याला फारच खेद झाला.

प्रतिहारी—'इडा पिडा टळो—मलतेंच !'

राजा—'मी घरीं चालून आलेल्या लक्ष्मीचा अवमान केला, मला धिःकार असो!'

सानुमती—'खरोखर या वेळीं यानें स्वतःला दूषणं दिलें तें सखी शकुंतलेलाच उद्देशून.'

राजा—'आपल्या कुलाची प्रतिष्ठा असा आपल्यापासून गर्भ धारण झालेल्या धर्मपत्नीचा मी खुळ्यासारखा त्याग केला, आणि आतां संतति नाहीं ह्मणून खेद करितों! यथाकालीं चांगलें बीज पेरलेल्या व पुढें उत्कृष्ट फळ देणाऱ्या उत्तम भुमीची जाणून बुजून उपेक्षा करावी तशासारखेंच हें माझें वेडेपणाचें कर्म.'

राजानें येथें शकुंतलेला वसुंधरेची उपमा दिली आहे, ती तिसऱ्या अंकांत 'परिग्रह बहुत्वेपि द्वेप्रतिष्ठे कुलस्थनः' असें त्यानें तिच्या सख्यांना ह्मटलें आहे त्यालाच अनुसरून व अनुलक्षून आहे.

सानुमतीनें 'तुझी संतति अखंड आहे बरें.' हें भाषण वस्तुस्थितिदर्शक व आशीर्वादात्मकही आहे.

चतुरिकेनें प्रतिहारीला हळूच ह्मटलें, 'या सावकाराच्या वृत्तांतामुळें महाराजांचा उद्वेग दुणावला आहे. तर यांचें समाधान करण्याला मेघप्रतिछंद महालांतून आर्य माढव्याला तरी घेऊन येतें.'

प्रतिहारी—'हो खरेंच, ठीक ह्मणतेस.' नंतर ती निघून गेली.

राजाचे याचसंबंधानें विचार चालले होते. तो ह्मणाला—'हाय हाय ! या दुष्यंताचे—माझे—पितर संशयांत पडले असतील खास. कारण माझ्यामागें श्रौतविधिपूर्वक तर्पणोदक आमच्या कुलांत कोण देईल अशी त्यांना काळजी पडली असेल. मी संततिखंडित असल्यामुळें, मीं तर्पणांत दिलेल्या जलांनीं दुःखानें गाळलेल्या अश्रूंचें क्षालन करून, उरलेले जळ त्यांना पान करावें लागेल.'

असें बोलतां बोलतां त्याला अतिशय दुःख व खेद होऊन तो मोहित झाला.

हा श्लोक व यांत वर्णन केलेले विचार फारच हृदयंगम आहेत. आपल्या मागें आपल्या कुलाचें नांव चालविण्याला व आपणाला व आपल्या पितरांना निवापोदक देण्याला कोणीतरी असावें अशाबद्दल आपल्या देशांतील-किंबहुना पर्यायानें सर्व देशांतील लहानथोर मनुष्यांना वाटत आलें आहे. अशा विचारांच्या योग्यायोग्यतेविषयीं ऊहापोह करण्याचें हें स्थळ किंवा हा प्रसंग नव्हे. या विचारांस अनुसरूनच हें दुष्यंताचें भाषण घातलें आहे. याच तऱ्हेचे विचार बाण कवीनें कादंबरीपूर्वार्धांत तारापीड राजाच्या तोंडीं अप्रतिम गद्य काव्यांच्या द्वारें घातले आहेत. 'देवि, किमत्र क्रियते दैवायत्ते वस्तुनी' इत्यादि. डालहौसी साहेबानें इकडील राजेरजवाडे व संस्थानिक वगैरेंना दत्तक घेण्याची परवानगी बंद करून लहान मोठीं संस्थानें खालसा करण्याचा सपाटा चालविला. त्यावेळीं निपुत्रिक संस्थानिकांकडे अनेक बरेवाईट प्रकार अमलांत आले, व भयंकर बंड झाले तें तरी याच विचारामुळें. हल्लींसुद्धा याच्याच पायी हजारों निपुत्रिक बायका अनेक जादूटोणे व प्रसंगविशेषीं याही पेक्षां गर्ह्य मानलेले पण त्यांच्या भोळ्या विचारानें पुत्रप्राप्ति करून देणारे मार्ग स्वीकारून, बहुत प्रसंगीं आपणांस लोकनिंदेस पात्र करून घेतात. या सर्व प्रकारांचे व परिणामांच दुष्यंतासारख्या धीरोदात्त नायकाच्या देखील मनावर कसे परिणाम झाले याचें कवीनें अगदीं थोड्क्यांत पण उत्कृष्ट तऱ्हेनें हें वर्णन केलें आहे.

राजा बेशुद्ध होऊन पडलेला पाहून चतुरिका धावऱ्या धावऱ्या त्याचें समाधान करीत ह्मणाली, 'महाराज, सावध व्हा! सावध व्हा!'

हा सारा प्रकार पाहून सानुमतीला फारच चमत्कारिक वाटलें व खेद झाला. ती ह्मणाली, 'हाय हाय! दीप प्रज्वलित असूनही आडपडदा आल्यानें याला हा अंधकारदोषाचा परिणाम भोगावा लागतो आहे. मी आतांच याला सुखी करून टाकल्ये.–अथवा शकुंतलेचें समाधान करीत असलेल्या महेंद्रजननीच्या मुखानें मी नुकतेंच ऐकिलें आहे कीं, यज्ञभागाविषयीं उत्सुक झालेले देव लवकरच अशी कांहीं तजवीज करतील कीं तिच्यामुळें तिचा भर्ता आपल्या धर्मपत्नीचें स्वतःच अभिनंदन करील. आतांच वेळ न लावतां हा सारा वृत्तांत सांगून प्रियसखीचें समाधान करूं दे.'

असें ह्मणून ती आकाशांत उडून अदृश्य झाली.

या सानुमतीच्या भाषणांत भावी प्रकाराचें सूचन चांगल्या तऱ्हेनें केलें आहे.

सानुमती निघून गेली, तोंच कांहींसें दुरून 'अब्रह्मण्यम् अब्रह्मण्यम्' असे दीन व आर्तपणें उच्चारिलेले शब्द राजाच्या कानीं आले. ते विदूषकानें उच्चारिले होते. राजा मोहित झालेला होता, तरी विदूषकाच्या तोंडचे दीन शब्द कानीं पडतांच तो तात्काळ शुद्धीवर आला व पुनः नीट ऐकिलेंसें करून ह्मणाला–'हा आर्तस्वर माढव्याचासा वाटतो. कोण आहे रे तिकडे?'

मनुष्यास कसाही मोह झालेला असला तरी कांहीं भारी हानि किंवा लाभ झाल्याचें किंवा कोणी आप्त प्रिय मित्र मोठ्या संकटांत पडल्याचें एकदम कानीं आलें तर तो मोह एकदम नाहींसा होतो. हा साधारण अनुभव आहे. निदान अशी सामान्य समजूत आहे. ती येथें कवीनें उत्तम प्रकारें व्यक्त केली आहे.

यावर प्रतिहारीनें गडबडीनें येऊन ह्मटलें, 'महाराज, आपल्या संकटांत सांपडलेल्या मित्राचें संरक्षण करावें.'

राजा—'पण तो कोणाच्या तावडींत सांपडला आहे?'

प्रति०—'कोणी अदृष्ट सत्वानें त्याला मेघप्रतिच्छंद प्रासादाच्या शिखरावर नेऊन ठेविला आहे.'

हें ऐकून एकदम उठून तो ह्मणाला, 'थांब तर–काय ह्मणतंस?–माझ्याही घरांत ही अशी भूतबाधा?' इतक्यांत विचार पालटून तो ह्मणाला, 'अथवा प्रत्यहीं आपल्याच हातून किती तरी अज्ञात दोष घडत असतील हें लक्षांत सुद्धा येणें शक्य नाहीं. किंवा प्रजेंत कोण कसा बऱ्या वाईट मार्गानें वागत असेल तेंही समजणें मुष्कील. त्या दोषामुळेंही कदाचित् या भूतचेष्टा माझ्यासुद्धा घरांत होऊं लागल्या असतील.'

हे त्याचे विचार चालले होते तोंच विदूषकानें पुनः आर्तपणानें व दुःखानें, 'मित्रा! हाय हाय!' असें ह्मटलें. त्यावर राजानें गडबडीनें चालत ह्मटलें, 'अरे, भिऊं नको! भिऊं नको!'

वि०—'अरे, हाय हाय! भिऊं नको कसा? हा पहा मला कोणसा डोकें खालीं वांकवून उसासारखा मोडून तीन तुकडे करूं पाहतो आहे!'

राजानें एकदम डोळे वटारून 'अरे, धनुष्य! —' असें ह्मटलें. तोंच एका यवनीनें येऊन, 'महाराज, हें हातमोजासहित धनुष्य' असें ह्मणत धनुष्य त्याच्या हातीं दिलें.

तोंच जणों त्यालाच उद्देशून त्या सत्वानें भाषण केलें,

'तावडींत सांपडलेल्या सावजाच्या मानेचा घोट घेण्याकरितां सिंह जसा त्याचा फडशा पाडतो तद्वत् मी आतां तुझी व्यवस्था करितों. दुष्यंत राजा अनाथाचें पाळण करण्याकरितां नेहमी धनुष्य घेऊन सज्ज असतो, त्याला तूं खुशाल शरण जा. तो तुझें रक्षण कसा काय करितो पाहूं!'

हें भाषण बुद्धचा दुष्यंताला चेव आणण्याकरितां घातलेलें आहे. तें कृतकच असल्यानें त्यांत दुष्यंताला दूषण लागेल अशा अर्थाचे शब्द घातलेले नाहींत.

यावर राजानें रागानें ह्मटलें, 'काय! मलाच उद्देशून बोलतो आहे! थांब तर, दुष्टा—रक्तपाराक्षसा! आतांच तुला नाहींसा करून टाकतों.' असें ह्मणून त्यानें धनुष्याला दोरी चढविली व ह्मटलें, 'वेत्रवती, चल जिन्याची वाट दाखीव.'

त्याप्रमाणें वेत्रवतीच्या मागून तो निघाला.

जिना चढून माडीच्या गच्चीवर गेल्यासारखें करून चोहींकडे पाहून राजानें ह्मटलें, 'अरे, इथें तर कोणीच नाहीं.'

तोंच पुनः पडद्यांतून शब्द झाला, 'हाय हाय! तुह्मी मला दिसतां आणि मी तुह्माला दिसत नाहीं! मांजराच्या तोंडांत सांपडलेला उंदीर जिवंत सुटण्याची मुळींच आशा नाहीं, तद्वत् माझी या वेळीं स्थिति झाली आहे.'

राजा—'अरे, तूं प्रत्यक्ष मला अदृश्य असलास तरी माझ्या शस्त्राला अदृश्य राहणार नाहींस. तें तुला तत्काल शोधून काढील—हा पहा मी बाण सोडतों. पाणी मिसळलेल्या दुधांतून हंस फक्त दूध काढून घेऊन पाणी टाकून देतो, तद्वत् हा माझा बाण तुला शोधून काढून तुझा प्राण घेईल व या गरीब बिचाऱ्या ब्राह्मणाचे प्राण वांचवील.'

यांत अप्रतिहतप्रभावअस्त्राचें दिग्दर्शन, व हंसाविषयीं नीरक्षीरपरीक्षणसंबंधीं प्रसिद्ध असलेली कविकल्पना, या दोहोंचें सहजगत्या सुरेख शब्दांनीं वर्णन केलें आहे.

या कल्पनेचा खरा अर्थ काय असावा तें लक्षांत येत नाहीं. हंस ह्मणजे आपल्याकडे सर्वसंमत असलेला पक्षीविशेष घ्यावयाचा किंवा इतिहासप्रसिद्ध हूण लोक घ्यावयाचे याचा विचार आहे. हूण जातीचे लोक घेतले तर ते हिंदुस्थानाच्या उत्तरेस कुरणांत हजारों बकरीं, गाई, घोडे वगैरे दुभतीं जनावरें घेऊन फिरत असत, व कधींमधीं दक्षिण व पश्चिमेकडील सुपीक प्रदेशावर सपाटून स्वाऱ्या करीत. या लोकांमध्यें दूध व पाणी तात्काळ परीक्षण करून निराळें करण्याची कला प्रसिद्ध असावी, व ती ते हिंदुस्थानांत स्वाऱ्या करून येत तेव्हां इकडील लोकांच्या नजरेस आली असावी. ती इकडील लोकांना अवगत नसल्यानें तिची महती वाटून त्यांनीं तिचें असें वर्णन केलें असावें. ही कला हल्लीं उपलब्ध नाहीं.

राजानें अस्त्राचें संधान केलें. तें पाहातांच मातलीनें विदूषकला सोडून देऊन एकदम प्रगट होत येतां येतां ह्मटलें,

'तूं अस्त्रप्रयोग चालविला आहेस त्याला इद्रानें योग्य व पात्र असें संधान असुर नेमलेले आहेत. तो त्या असुरांवर चालूं दे. सज्जन सुहृत् मंडळीवर प्रेमळदृष्टि हेंच शर सोडतात; दारुण अस्त्रें नव्हेत.'

या एका भाषणांत मातलीनें आपण इंद्राकडून आलों, इंद्रानें असुरविजयाचें काम तुजवर सोंपविलें आहे, मी तुझा सुहृद्—मित्र आहें—मजवर तुझी कृपादृष्टि असावी

—मी शत्रू नव्हे, कीं त्वां मजवर दारुण शर सोडावेस, असें सांगून आपण कां आलों व त्यानें काय करावयाचें तें सर्व सुचविलें आहे.

मातलीला पाहतांच राजाला सानंदाश्चर्य वाटलें. त्यानें एकदम अस्त्राचा उपसंहार केला, आणि आनंदानें ह्मटलें, 'अरे—महेंद्रसारथी मातली! वाः बरे आलां, या.'

इतक्यांत पुढें येऊन विदूषक ह्मणाला, 'हा मला इष्टींतल्या पशूप्रमाणें मारीत होता त्याचेंच हें उलटें स्वागत व अभिनंदन!'

मातलीनें तिकडे लक्षच न देतां हंसत ह्मटलें, 'आयुष्मंता, इंद्रानें मला कां पाठविलें तें ऐक.'

राजा—'होय, ऐकत आहें.'

मा०—'कालनेमीच्या वंशांतले दुर्जय नांवाचे दानवगण आहेत.'

राजा—'हो, असें मी मागेंच नारदाच्या तोंडून ऐकिलें आहे.'

मा०—'तो दानवगण शतक्रतूला दुर्जय असल्यानें त्याचा नाश करण्याकरितां त्यानें तुझें स्मरण केलें आहे. इंद्र सूर्यासारखा प्रखर व तेजस्वी खरा, पण सूर्याच्यानेंसुद्धा रात्रीच्या अंधकाराचा प्रतिकार होत नाहीं. तो नाहींसा करणें चंद्रालाच साधतें.'

येथें मातलीनें आपला मालक इंद्र याची प्रौढपणें बाजू राखून व थोरवी कायम ठेवून दुष्यंताचीही प्रशंसा केली आहे. खऱ्या इमानदार नोकराचें हें कर्तव्यच आहे.

मा०—'तेव्हां तुह्मी आतांच हातीं शस्त्रधारण केलेले असेच या इंद्राच्या रथावर आरूढ होऊन विजयप्रस्थान करावें.'

दुष्यंत माढव्याला त्रास देणाऱ्या पिशाचाचा समाचार घण्याकरितां धनुष्याला दोरी चढवून शरसंधान करण्याला तयारच झालेला होता. तसाच त्याला मातलीनें इंद्ररथावर स्वार होऊन असुरविजयाला चलण्याला सांगितलें आहे. दुष्यंतासारख्या थोर व शूर वीराच्या हातून शौर्याचीं कामें केव्हांही होण्यासारखीं असतात. तरी निमित्तांतरानें अशा कार्याला तो सज्ज झालेलाच असतांना त्याच्याकडून तीं अधिक हुरुपानें व सोयीनें होतील. हें जाणूनच मातलीनें त्याला जशाचा तसाच तात्काळ चालण्याला विनंती केली आहे.

रा०—'भगवान् इंद्रानें हा मला असा थोरपणा दिला, हा मजवर त्याचा मोठा अनुग्रहच झाला. पण कां हो, या माढव्याशीं तुह्मीं हा काय प्रकार केलात?'

मा०—'तेंही सांगतों. कांहीं तरी मानसिक संतापामुळें तुह्मी अगदीं विकल झालेले मला दिसलां. तेव्हां आपल्याला चांगलें चेतविण्याकरितां मी तसें केलें.

'इंधन चालविलें कीं अग्नि अधिक प्रज्वलित होतो, आणि सापाला डंवचिलें ह्मणजे तो तात्काळ फणा उभारतो. प्रायः कांहीं क्षोभ झाला कीं, सर्वजण आपापलें तेज प्रगट करितात.'

हेंही मातलीचें भाषण साधें, प्रौढ आणि योग्य आहे. व त्यानें हें मनुष्यस्वभावाचें वर्णन कसें सहजगत्या थोडक्यांत केलें आहे.

हें पद्य ह्मणीप्रमाणें नेहमीं पाठांत येण्याजोगें साधलें आहे.

या भाषणानें विदूषकालाही पुढें बोलण्याला सवड किंवा कारण राहिलें नाहीं.

राजानें एकीकडे विदूषकाला ह्मटलें, 'मित्रा, दिवस्पती इंद्राची आज्ञा मोडतां येत नाहीं. तेव्हां हें सर्व सांगून माझ्याकडून अमात्य पिशुनाला ह्मणावें.—

'आमचें सज्ज धनुष्य दुसऱ्या कामीं गुंतलेलें आहे, तोंवर केवळ आपली बुद्धि एकटीच प्रजापालन करूं दे.'

प्रजापालनाचें काम आपली बुद्धि व आमचें धनुष्य, दोघांनीं मिळून करावयाचें. पण तूर्त आमचें धनुष्य अन्यकार्यव्यापृत आहे. तोंवर हें काम आपल्या बुद्धीवर सोंपविलेलें राहूं दे.

यांत राजाच्या तोंडून कवीनें तत्कालीन समजुतीप्रमाणें राजा व प्रधान यांची परस्पर प्रजेसंबंधानें कामें कसकशीं वांटलेलीं होतीं किंवा असावींत, याविषयीं निदर्शन केलें आहे.

वि०—'जशी आपली आज्ञा.' असें ह्मणून विदूषक निघून गेल्यावर मातलीच्या विनंतीप्रमाणें राजा रथारूढ झाला आणि दोघेही निघून गेले.

हा अंकही प्रयोग करण्याविषयींचें सौलभ्य, प्रवेशवैचित्र्य, रचना, वर्णन, शैली, इत्यादिकांच्या मानानें पाहतां चांगल्यापैकींच साधला आहे.

प्रथमचा धीवरासंबंधाचा प्रवेश कथेच्या अनुसंधानाला अवश्य असून फारच चटकदार आहे. शकुंतलेला दिलेली अंगठी अवचित् धीवराकडून मिळाल्यावर राजाला कण्वाश्रमांतील सर्व गोष्टींचें एकदम स्मरण झालें, व शकुंतलेचा निष्कारण धिःकार करून तिला घालवून दिली, असें त्याला वाटलें. तेव्हांपासून विप्रलंभ शृंगाराला आरंभ झाला. या संबंधाचें सर्वच वर्णन अप्रतिम आहे. वसंतोत्सवप्रतिषेध, राजकार्यावेक्षणाविषयीं अक्षमता, शकुंतलेसंबंधी शोक, तितक्यांत पट्टराणीसंबंधें दाखविलेला आदर, निपुत्रिकपणाबद्दलचा साहाजिक खेद व मोह, आणि या सर्वांचें मातलीच्या आगमनानें व वर्तनानें चमत्कारिक रीतीनें झालेलें निरसन, हे सर्व भाग फारच रमणीय झालेले आहेत.

## अंक सातवा.

मागील अंकांत सुचविल्याप्रमाणें दुष्यंत राजा मातलीबरोबर रथांत बसून दुर्जय दानवांचें पारिपत्य करण्याला निघून गेला. पुढें त्या दानवांचा पाडाव केला आणि नंतर जाऊन इंद्राची भेट घेतली. इंद्रानें त्याचा देवसभेंत बहुमान करून त्याला आपल्याजवळ अर्धासनावर बसविलें. हा बहुमान झाल्यावर इंद्राच्या रथांत बसून तो मातलीसह आकाशमार्गानें राजधानीला जाण्याला निघाला असतांना इंद्रलोकांत व सभेंत आपला बहुमान झाल्यासंबंधानें तो मातलीला ह्मणाला,—

'मातली, इंद्राच्या ह्मणण्याप्रमाणें मी थोडीशी कामगिरी केली, पण ती त्यानें केलेल्या बहुमानाच्या मानानें किती तरी कमी होती.'

यांत राजाचें साहजिक सौजन्य, साधेपणा, आणि थोरपणा व्यक्त झाला आहे.

मातलीनें हंसत उत्तर दिलें, 'आयुष्यमंता, तुझ्या दृष्टीनें तूं केलेली इंद्राची कामगिरी अत्यल्प दिसते, तद्वतच इंद्रानें केलेला तुझा बहुमान त्याला कामगिरीच्या मानानें अत्यल्प वाटतो. अतएव उभयतांनाही समाधान वाटत नाहीं. हें तुह्मां दोघांच्याही थोर व गुणग्राही स्वभावाला अनुरूपच आहे.'

परस्परांना जेव्हां अशा तऱ्हेचें असमाधान वाटत असेल तेव्हांच एखाद्या केलेल्या चांगल्या नोकरीची व तिच्याबद्दल झालेल्या योग्य बहुमानाची खरी योग्यता असते. नाहीं तर नोकरी बजावणाऱ्याला आपली कदर झाली नाहीं असें वाटत असावें, आणि कदर करणाऱ्यानें ह्मणावें,—अंः कशाची नोकरी नी काय, त्याची इतकी तरी योग्यता कोठें आहे? आह्मी आपल्या योग्यतेकडे लक्ष देऊन हा बहुमान केला आहे; त्याच्या नोकरीच्या मानानें नव्हे.

या दुसऱ्या तऱ्हेचे प्रकारच आजकाल इकडे प्रत्यहीं प्रत्ययास येतात.

राजानें मातलीचा भाव जाणून ह्मटलें, 'मातली, छेः तसें नव्हे. त्यांनीं निरोप देतांना केलेला सत्कार खरोखर माझ्या मनोरथाच्याही पलीकडे होता. सर्व देवांसमक्ष त्यांनीं मला अर्धासनाचा मान दिला. आणि वक्षस्थलावरील हरिचंदनानें चर्चित झालेली मंदारमाला, वास्तविक जयंताला मिळण्याची, ती काढून त्यांनीं सर्वांसमक्ष माझ्या गळ्यांत घातली! याहून अधिक बहुमान तो काय करावयाचा?'

यावर त्याची मनापासून प्रशंसा करीत मातलीनें उत्तर दिलें,

'अमरेश्वरानें कांहीं दिलें व कांहीं केलें, तरी तें आपल्या योग्यतेच्या मानानें थोडेंच. कारण, मागें भगवान् नृसिंहानें तीक्ष्ण नखांनीं असुरसंहार करून देवराजाचें राज्य निष्कंटक केलें त्याच्यासारखीच आपण हल्लीं दानवांचा फडशा पाडून त्रिदिव निष्कंटक केलें त्याची योग्यता आहे.'

यांत मातलीनें अन्योक्तीनें दुष्यंताला, आपली योग्यता प्रत्यक्ष नृसिंहावतारी विष्णूसारखी आहे, असें सुचविलें आहे. तरी ही प्रशंसा किती प्रौढ, साधी व सहज ओघानें आलेली आहे!

राजा०—'यांत तरी शतक्रतूचाच महिमा विशेष प्रशंसनीय.

'मोठ्या लोकांच्या आश्रितांच्या हातून महत्कार्यसिद्धि होते ती त्या आश्रितांच्या अंगच्या योग्यतेमुळें नसून त्या मालकाच्या मोठेपणाच्या प्रभावामुळें होय. अरुणाच्या हातून तमाचा नाश होतो, तो सूर्य त्याला आपल्या रथाच्या धुरीवर बसवितो ह्मणून, त्याच्या स्वतःच्या पराक्रमामुळें नव्हे.'

यांत राजानें, आपण कांहीं केलें नाहीं, जें काय घडलें तें इंद्रानें आपल्याला सवड दिली ह्मणून व त्याच्याच प्रतापाच्या प्रभावानें, असें दर्शविलें. यांत त्याच्या अंगचा विनय उत्तम व्यक्त झाला आहे.

मातली—'हो, हेंही खरेंच.'

हा सर्व संभाषणाचा प्रकार फारच चांगला, योग्य व प्रौढ आहे.

नंतर थोडे पुढें गेल्यावर मातलीनें ह्मटलें,—'आयुष्मंता, आपल्या यशाची इतकी प्रौढी व थोरवी आहे व तें स्वर्गांत राहणाऱ्यांना इतकें प्रिय झालें आहे कीं, ते त्याच्यावर कौतुकानें प्रौढ व अर्थप्रचुर पद्यें रचून, तीं सुरसुंदरींनीं उपभोग घेऊन उरलेल्या अंगरागरूपी रंगांनीं कल्पलतांपासून निघालेल्या पटांवर आनंदानें लिहीत बसले आहेत!'

यांत मातलीनें जणों राजाच्या यशाच्या वर्णनाची कमाल केली आहे. तिकडे दुर्लक्ष्यसें करून राजानें ह्मटलें—'मातली, पूर्वीं जातांना गडबडीमुळें व युद्धाच्या उत्साहामुळें मी स्वर्गमार्ग लक्षपूर्वक पाहिला नाहीं.—कांहो, आपण हल्लीं कोणच्या वायूच्या मार्गांत आहों?'

पूर्वीं स्वर्गावर जातांना रस्त्याकडे राजाचें लक्ष न लागण्याचें कारण यथायोग्य दिलेलें आहे. येतांना फुरसत असल्यानें याबद्दल विशेष माहिती करून घेण्याची राजाला इच्छा होणें साहजिकच आहे.

प्राचीन ज्योतिषशास्त्रांच्या मताप्रमाणें पृथ्वीपासून स्वर्गापर्यंत एकावर एक निरनिराळ्या वायूंचे मार्ग किंवा कटिबंध कल्पिलेले आहेत. पृथ्वीवरून स्वर्गास जातांना किंवा स्वर्गाहून खालीं पृथ्वीवर येतांना या वायूंच्या कटिबंधांतून जावें यावें लागतें. ते वायु येणेंप्रमाणें:—१ भूवायु. २ आवह. ३ प्रवाह. ४ उद्वह. ५ सं-

वह. ६ सुवह. ७ परावह. ही वायूंची कल्पना नीटपणें समजण्याचें हल्लीं साधन नाहीं.

मातली,—' हा परिवहवायूचा मार्ग. याच्यांत आकाशगंगा वाहते आणि पृथक् पृथक् प्रकाशानें युक्त होत्सात्या निरनिराळ्या ज्योती स्वतंत्रपणें फिरतात. वामनावतारांत श्रीहरीचें दुसरें पाऊल याच्यांत पडल्यानें हा वायुमार्ग पावन व तेजोमय झालेला आहे.'

हेंही वर्णन चांगलें प्रौढ व उदात्त आहे.

राजा—' मातली, तरीच अंतर्बाह्य इंद्रियांसह माझ्या आत्म्याला इतकी प्रसन्नता वाटते ती.'

आसपासच्या प्रदेशाच्या बरेवाईटपणाप्रमाणें मनावर हटकून बरा वाईट परिणाम होतो, या कल्पनेचें हें भाषण द्योतक आहे.

राजानें रथचक्राकडे पाहून ह्मटलें, ' आपण मेघमंडळावर उतरलों आहों.'

मा०—' तें कशावरून ?'

राजा—या रथचक्राच्या आरांमधून चातक पक्षी उडून जाताहेत; त्यांच्या व रथाच्या अश्वांच्या अंगावर विद्युत्प्रभा चमकत आहे, व रथचक्राच्या नेमी जलबिंदूंनीं थबथबलेल्या आहेत तेव्हां आपण जलपूर्ण घनपटलाच्या मधून चालत्रों आहों खास.'

रथचक्राच्या आरांतून चक्रवाक पक्षी कसे उडत होते, तें लक्षांत येत नाहीं. बाकीचें वर्णन ठीक व मजेदार आहे.

मा०—'आतां लौकरच तुह्मी तुमच्या अधिकारभूमीवर पोंचतां.

यावर राजानें चोहींकडे पाहत ह्मटलें, 'आपण मोठ्या वेगानें खालीं उतरतों आहों त्यामुळें हा मनुष्यलोक कसा आश्चर्यकारक दिसतो आहे. आपण वेगानें खालीं चाललों असल्यानें पाण्यांत बुडालेल्या वस्तु जशा वेगानें वर याव्या तद्वत् हीं पर्वतशिखरें या नभोमंडळांतून वर उठून येत आहेतशीं वाटतात. सर्व वृक्ष केवळ पर्णछन्न भासत होते, त्याच्या शाखा व स्कंध व्यक्त होत चालले आहेत. नद्यांचीं पात्रें व प्रवाह प्रथम तुटक व बारीक दिसत, ते स्पष्ट सलंग व सारखे दिसूं लागले आहेत. आणि हें सारें भूमंडळ एखाद्यानें जोरानें वर फेंकावें तद्वतच आपल्याकडे येत आहे.'

नभोमंडळांतून भूतलावर वेगानें खालीं उतरत असतांना प्रथम अस्पष्ट असलेले गिरि, शिखरें, नद्या, वृक्ष, समूह, वगैरे भाग वेगानें वर चढून येत आहेत असें भासतें व ते अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागतात. अलीकडे विमानांत बसून अंतरिक्षांत संचार करून पाराशूटच्या द्वारें एकदम पृथ्वीवर अवतरण करणाऱ्याच्या नेहमीं प्रत्यक्ष अनुभवास येत असल्याचें वरचेवर वर्णन येतें. याच गोष्टीचें हें या कवीनें केवळ आपल्या कल्पनेनें तरी पण यथार्थ असें वर्णन केलें आहे.

त्याचें समर्थन व प्रशंसा करीत मातलीनें ह्मटलें, ' वाः फार उत्तम व यथार्थ पाहिलेंत.' चोहींकडे आदरानें पहात तो पुनः ह्मणाला, 'अहो, ही पृथ्वी किती तरी उदार व रमणीय दिसते आहे!'

रा०—' पूर्वसमुद्रापासून थेट पश्चिम समुद्रापर्यंत सारखा पसरलेला—कनकरसच ज्याच्यापासून जणों द्रवतो आहे अशा संध्याकाळच्या मेघपरिघानें व्याप्त असा—हा पर्वत कोणचा ?'

संध्याकाळीं सूर्यप्रकाश पिंवळट असतो. तो मेघमालेवर व त्यांतून वर्षाव होत असलेल्या पर्जन्यधारांवर पडत असतांना कनकरसाची जणों वृष्टि होत असल्यासारखें भासतें.

अशा कनकरसनिष्पंदी मेघमालेनें व्याप्त असलेला हा पर्वत कोणचा?'

मा०—'आयुष्मन्, हा हेमकूट नांवाचा पर्वत. याच्यावर किंपुरुष वास करतात. हें तपस्सिद्धीचें परमक्षेत्र. स्वायंभू मरीचीपासून उत्पन्न झालेला—सुरासुरगुरु प्रजापती कश्यप येथेंच सपत्नीक तपश्चर्या करीत आहे.'

यावर राजानें आदरानें ह्मटलें, 'अशा कल्याणप्रद विभूतीचा अतिक्रम करणें योग्य नाहीं. भगवंतांना प्रदक्षिणा घालून जावें ह्मणतों.'

हा मारीचाश्रमांत उतरण्याचा प्रसंग कसा सहज आणिला आहे. आणि अंतरिक्षगमनासंबंधाचें वर्णन किती थोडक्यांत, बेताचें व अप्रतिम साधलें आहे. नाहीं तर असाच प्रसंग भवभूतीनें महावीरचरितांत शेवटच्या अंकांत कसा तरी ओढून ताणून आणिला आहे व त्याविषयींचें वर्णन तरी किती असंभाव्य, चमत्कारिक व पाल्हाळिक केलेलें आहे!

एखाद्या चांगल्या वस्तूची किंवा प्रसंगाची उत्तम तऱ्हेनें नक्कल करण्याला तरी योग्यता व बुद्धि लागते.

'फार चांगलें—' असें ह्मणून मातलीनें रथ एकदम खालीं उतरून जमिनीवर स्तब्ध केल्यासारखें केलें. याचा राजाला विस्मय वाटून तो ह्मणाला,

'रथ जमिनीवर उतरून थांबला तरी त्याच्या चाकांचा शब्द झाला नाहीं, धक्का बसला नाहीं, किंवा धूळ उडाली नाहीं!'

सामान्यतः एकदम रथ थबकला ह्मणजे पृथ्वीवर त्याचीं चक्रें वगैरे जोरानें लागून धक्का बसतो, व धूळ उडते; तसेंच चाकांचा शब्द होतो. पण यावेळीं तसें कांहींच झालें नाहीं—याचें राजाला आश्चर्यसें वाटलें.

त्याला प्रौढपणें उत्तर देत मातलीनें ह्मटलें, 'शतक्रतूच्या व आपल्यामध्यें फरक काय तो इतकाच.'

या एका वाक्यांत मातलीनें किती तरी गर्भित रीतीनें इंद्राची दुष्यंताहून असलेली थोरवी व्यक्त केली आहे—आणि तीही किती सहज व पोक्तपणानें!

इंद्राच्या रथाचीं चाकें भूतलाला स्पर्श न करितां चार अंगुलें वरून चालतात अशी समजूत आहे, तिला अनुसरून हें भाषण आहे.

राजानें हें भाषण ऐकून तो विषयच सहजपणेंसा सोडून ह्मटलें, 'मातली, मारीचाश्रम कोणीकडेसा आहे?'

तो हातानें दाखवीत मातलीनें उत्तर दिलें:—

'अर्धें शरीर वारुळांत बुडालेलें, उरावर सर्पाची कांत पडलेली, कंठभाग जीर्ण लतेच्या खोडांनें जणों जखडून गेलेला, स्कंधदेश शकुंताच्या घरट्यांनीं व्याप्त, असा स्थाणूमारखा अचल होत्साता हा मुनी जेथें सूर्यबिंबावर दृष्टि लावून स्थित आहे.'

कोणी एक ऋषि तपाचरण करीत एके जागीं स्थिर होता. त्याच्या तपाचरणाची स्थिति इतकी एकाग्रतेची होती कीं, तो बसल्या जागीं त्याच्या शरीराभोवता वारुळ वाढलें, अंगावर सापांच्या कांती पसरल्या, कंठामध्य जीर्ण लतांच्या खोडांचीं कडीं पडलीं, मस्तकावरील जटाभार स्कंधदेशीं पसरलेला होता त्याचांत पक्षांनीं सुखानें घरटीं बांधिलीं होतीं, अशा स्थितींतही सारखी सूर्यबिंबाकडे दृष्टी देऊन जणों प्रत्यक्ष स्थाणू—खांब—प्रमाणें अचल राहून तपाचरण चाललें होतें.

खऱ्या सात्विक पण दीर्घकालिक तपाचें अतिशयोक्तीचें तरी मनोहर हें वर्णन आहे.

राजानें आदरानें ह्मटलें, 'हे प्रखर तप करणाऱ्या महात्म्या तुला नमस्कार असो.'

मातलीनें रथाचे दोर आंखडून ह्मटलें, 'हें पहा, अदितीनें पाळून वाढविलेल्या मंदार वृक्ष-नियुक्त अशा त्या प्रजापतीच्या आश्रमाजवळ आपण आलोंच.'

राजा, 'हें स्वर्गाहूनही अधिक सुखकर स्थान यावेळीं मला अमृतडोहांत बुडाल्यासारखें झालें आहे.' यांत राजानें ऋष्याश्रम इंद्र-लोकाहूनही श्रेष्ट आहे— किंवा इंद्रलोक या-च्यापुढें तुच्छ आहे— असें बोलण्यांत आश्रमाची स्तुति करून तद्विषयक अतिशय आदर, प्रेम व पूज्यभाव दाखविला आहे.

मातलीनें रथ उभा करून राजाला उत-रण्यास सांगितलें. तेव्हां तसें करून राजानें त्याला, 'आपला पुढें काय विचार?' असें ह्मटलें.

'मा०——रथ स्थिर केला आहे. मीही उ-तरतोंच' असें ह्मणून तोही रथाखालीं उतरला व राजासह थोडेंसें फिरून ह्मणाला, 'येथल्या या ऋषींच्या तपोवनभूमि तर पहा!'

रा०—'होय, येथें उत्कृष्ट कल्पवृक्षाच्या वनांत वायु भक्षण करून हे प्राणधारण करीत रहातात. सुवर्णकमलांच्या परागाचा द्रवच पडल्यामुळें पिंगट दिसणाऱ्या नदीजलानें त्यांचें तपानुष्ठान व अभिषेकादिक क्रिया चालताहेत. हे रत्नशिलातलावर समाधी लावून बसतात. आणि विबुध स्त्रियांच्या सन्निधानीं राहूनही आत्मसंयमन करतात. इतर मुनि व तापस, तपाचरणाच्या द्वारानें ज्या ज्या गोष्टींविषयीं इच्छा करीत असतात त्या सर्व येथें विपुल अ-सून, त्यांच्यामध्यें हे ऋषि तपश्चर्या करीत आहेत!'

इतर तपस्वीजन तपाचरणाच्या द्वारानें स्वर्ग-लोक, कल्पवृक्ष, क्षुधा, तृष्णा इत्यादिकांचा अ-भाव, सुवर्णरेणुपूर्ण. उत्तम अमृततुल्य जल, सुवर्ण रत्नादिक संपत्ति, अप्सरा, इत्यादि अ-नर्घ्य वस्तु प्राप्त व्हाव्या ह्मणून झटत व प्रार्थना करीत असतात. त्या सर्व वस्तूंची तेथें साहाजिक रेलचेल असूनही हे ऋषि येथें त्याहूनही अधिक अशा परब्रह्माच्या प्राप्तीकरितां एकनिष्ट तपाचरण करीताहेत.

आत्यंतिक श्रेष्ठ अशा तपाचरणाचें हें अप्र-तिम निदर्शन आहे. यांतील वाच्य व व्यंग्य हे दोन्ही अर्थ उत्कृष्ट आहेत. व पदरचना सरळ, साधी व प्रासादिक आहे.

मातली—'मोठ्यांची हाव व प्रार्थनाही तशीच मोठी, मोठ्यांचें सर्वच मोठें.' यांत त्यानें राजाच्या ह्मणण्याचें पुष्टीकरण केलें आहे. थोडेंसें फिरून, मातली एकीकडे पाहूनसा ह्मणाला, 'अहो वृद्ध शाकल्य, भगवान मारीच काय क-रिताहेत?—काय ह्मटलें?—दाक्षायणीनें पतिव्रता-धर्माविषयीं विचारल्यावरून ते त्यांना व इतर महर्षिपत्नींना तें सांगत बसले आहेत ह्मणून?

राजानेंही हें ऐकून ह्मटलें, 'हें व्याख्यान आटपेपर्यंत वाट पाहिली पाहिजे!'

मा०—'आपण या अशोक वृक्षाखालीं कांहीं वेळ थांबा, तोंवर मी आपल्याबद्दल इंद्रगुरूंना कळविण्याची संधि पाहतों.'

रा०—'जशी आपली मर्जी.' असें ह्मणून राजा त्या अशोक वृक्षाखालीं उभा राहिला आणि मातली निघून गेला. येथें अशोक वृक्ष तरी सहज पण खुबीदारीनें राजाचा शोक पार नाहींसा होण्याचें सूचक ह्मणूनच आणिला आहे, असें दिसतें.

नंतर शुभ शकुन झालासें पाहून राजानें ह्मटलें—

'हे बाहो, व्यर्थ कां स्फुरण पावतोस? मला सुखप्राप्तीविषयीं नुसता मनोरथ सुद्धा करण्याला अवकाश उरलेला नाहीं. प्राप्त झालें असतांना

झिटकारिलेल्या श्रेयाचें पुनः स्मरण झाल्यानेंही दुःख होतें.'

मातलीच्या सहवासांत असतांना राजाचें मन दुसरीकडे लागलेलें असून त्याला शकुंतला-वियोग-मूलक दुःख मनांत आणण्याला सवडच झाली नव्हती. तो निघून जातांच त्याचें मन सहजच त्याच विचारांत परतलें. इतक्यांत त्याचा बाहु स्फुरण पावला. हें सुचिन्ह खरें, पण कसलेंही सुचिन्ह झालें तरी त्यापासून खरें सुख होण्याची आशाच नाहीं; कारण, पूर्वींच सहज प्राप्त झालेलें शकुंतलासमागमरूपी सुख दुर्दैवानें धुडकावून घालविलेलें. अशा गोष्टी एकदां आलेल्या गेल्या ह्मणजे क्वचित् कष्टा-दुःखानेंच परत मिळतात. त्यांच्या स्मरणानें सुद्धा दुःख दुणावतें. यावेळीं सुखाविषयीं मनोरथ करण्याला सुद्धा जागा नाहीं, तेव्हां या बाहुस्फुरणाचें फळ कसलें होणार? असे विचार त्याच्या मनांत आले.

तों जवळच बाजूस कोणीसें—'अशी दांडगाई—चापल—नकोरे करूंस!—काय गेलाच ना आपल्या स्वभावावर?'—हे शब्द बोललेले त्याच्या कानीं आले.

तिकडे राजाचें लक्ष गेलें व तो ह्मणाला, 'दांडगाईचें हें स्थळ नव्हे. हा कोणाचा बरें असा निषेध होतो आहे?' इतक्यांत तिकडे लक्ष देऊन पाहून तो विस्मयानेंसा ह्मणाला, 'अरे, हा कोण बरें—तापसी नको ह्मणत असलेला—मुलापेक्षां अधिक बल अंगीं असलेला—हा बालक—आईचें थान अर्धवट पीत असलेल्या या सिंहाच्या बचाला, त्याच्या सटा धरधरून जोरानें खेळण्याकरितां ओढितो आहे?'

हा दुष्यंत व शकुंतला यांचा पुत्र भरत—सर्वदमन—या मारिचाश्रमांत जन्मलेला. शकुंतलेला राजानें धिःकार करून घालविल्यावर तिची माता मेनका इनें तिला उचलून आणून येथें ठेविलें होतें. ती पुढें प्रसूत झाली, व नंतर मारीच व दाक्षायणी यांची सेवा करीत ती कष्टानें काल कंठीत येथें राहिलेली होती. भरत फारच चपल व दांडगा झालेला होता. त्याला भीति कशाचीच नव्हती. दुष्यंत मातलीसह तेथें पोहोंचला, त्या सुमारास आश्रमाच्या आसपास दोघी तापसी त्याला घेऊन खेळवीत होत्या. तो खोड्या व दांडगाई करी व त्या तापसींना मुळींच ऐकत नव्हता. हल्लींचें त्याचें दांडगाईचें उदाहरण तरी गमतीचें व त्याची उपजत थोरवी दाखविणारें असेंच दिलें आहे. हा त्याचा या वेळचा प्रवेश अगदीं सहज व मनोहर रीतीनें आणिला आहे.

राजानें वर्णन केल्याप्रमाणें तो बाल, त्या दोघी तापसी व सिंहाचा बच्चा, असे येतां येतां त्या बालकानें आपल्या बोबड्याशा शब्दानें ह्मटलें, 'अरे हे सिंहा, जांभई दे—तोंड उघडना—तुझे दांत मोजूं दे मला!'

त्यावर एक तापसी ह्मणाली, 'ए दांडग्या,—मुलापेक्षां अधिक काळजीनें व प्रेमानें पाळलेलीं हीं जनावरें--यांचा असा काय हा छळ मांडिला आहेस? तुझी दांडगाई फारच वाढत चालली ही. ऋषिजनांनीं तुझें नांव सर्वदमन ठेविलें तें अगदीं यथार्थ.'

यांत तपस्विनीच्या तोंडून सहजपणें त्या बालकाची प्रौढि व दांडगाई व त्याचें नांव यांचा प्रशंसापर व सुरेख असा उल्लेख आणिला आहे.

हें भाषण ऐकून व त्या मुलाची चाललेली कृति पाहून राजाचें मन मोहून गेलें. त्याला त्याच्याविषयां अकल्पित प्रेम वाटूं लागलें. तो आपल्याशीं ह्मणाला, 'पोटच्या पुत्राप्रमाणेंच जणों याच्याबद्दल माझ्या मनांत इतकें प्रेम कां

बरें वाटतें हें? कदाचित् अनपत्यतेमुळेंही असें होत असेल.'

भरताला पाहतांच दुष्यंताच्या मनांत त्याच्याविषयीं पोटच्या मुलासारखें वात्सल्य वाटूं लागलें. तें परस्परांना अज्ञात अशा त्यांच्या नात्याचेंच अदृष्ट फल व परिणाम, असें येथें कवीनें दर्शविलें आहे. प्रेमाला जन्मांतरींचा अज्ञात संबंधच आपोआप कारण होतो, अशा तऱ्हेचें व अर्थाचें वर्णन मागें आलें त्याला अनुसरूनच हा प्रकार आहे. त्या मुलाशीं कांहीं संबंध असल्याचें राजाच्या ध्यानींमनींही नव्हतें. तेव्हां याचें कारण आपल्याला मूलबाळ नाहीं ह्मणून, चांगलेंसें मूल पाहतांच आपल्या मनाला प्रेम वाटतें, दुसरें कांहीं नाहीं, असें त्यानें ह्मटलें आहे.

त्या तापसीनें ह्मटलें, 'तूं त्या सिंहाच्या पोराला सोडिलें नाहींस तर ती पहा सिंहीण आतां कसें करील तें!'

तिचा हा भेवडावण्याचा यत्न पाहून मुलानें हंसत व जणों तिची थट्टा करीत व तिला वेडावीतसें ह्मटलें—'मी किती तरी म्यालों पण हा!'

हें मुलाच्या स्वभावाचें वर्णन अगदीं साहजिक, खरें व थोडक्यांत आणिलें आहे.

हा प्रकार पाहून राजानें आपल्याशीं ह्मटलें, 'हा पुढें चांगला थोर, प्रतापी व तेजस्वी होईल खास. लहानसा निखारा पुढें इंधन मिळतांच प्रदीप्त व जोरदार होतो, तद्वत् याची स्थिति आहे.'

त्या मुलाचें लक्ष दुसरीकडे गुंतवावें ह्मणून दुसऱ्या तापसीनें ह्मटलें, 'बाळा, या सिंहाच्या बचाला सोडून दे, मी तुला दुसरें खेळावयास देतें.'

त्यावर त्या मुलानें लगेच हात पसरून ह्मटलें, 'कुठें आहे? दे तर.'

त्याचा तो पसरलेला हात नीटपणें पाहात राजानें ह्मटलें, 'याच्या हातावर चक्रवर्ती लक्षणें आहेत! या मुलानें आवडती वस्तु ग्रहण करण्याच्या लोभानें हात पसरला आहे. याचीं बोटं जशीं जाळ्यांनीं गांठलेलीं दिसतात. एखादें रक्तकमल पहाटच्या अरुणप्रकाशामुळें किंचित् प्रफुल्लित होतांना त्याच्या पाकळ्या व आंतील भाग स्पष्ट दिसत नसूनही मनोहरच दिसतें, तशीच याला शोभा आली आहे.'

आरक्तता व मृदुपणा, आणि लांब लांब बोटें व चाप, अंकुश यांच्या आकृति, व सर्व बोटें जाळ्यानें गांठल्यासारखीं दिसणें, हीं चक्रवर्तीपणाची लक्षणें असल्याचें सामुद्रिक शास्त्रकारांनीं वर्णन केलें आहे.

त्या मुलाचा तळहात थोडासाच पाहण्यास सांपडला, त्यावरून राजानें हें अनुमान केलें आहे. हें वर्णन चांगल्यांतलें आहे.

दुसरी तापसी ह्मणाली, 'सुव्रते, हा कां नुसता बोलण्यानें ऐकणार? जा तूं, माझ्या उटजांतून मार्कंडेय ऋषिकुमाराचा रंगविलेला मातीचा मोर यास आणून दे.'

तापसी तो आणण्याला गेली, तसा तो मुलगा हंसत ह्मणाला, 'तोंवर मी याच्याशींच खेळेन.'

या भाषणांतही मुलाच्या खोडकर व हट्टी स्वभावाचें चांगलें उपलक्षण झालें आहे.

हें त्याचें भाषण व कृति पाहून राजानें ह्मटलें, 'त्याच्या या खोड्या पाहून सुद्धा तो मला किती आवडतो! मुलगा प्रेमानें पित्याच्या अंकावर बसण्याला उत्सुक होत्साता गडबडीनें येतां येतां, निष्कारण व सहज हसतांना त्याच्या कोमल दंतांच्या कळ्या किंचितशा पण सुरेख दिसत असतात. बोलण्याची गडबड उडून सारे शब्द बोबडे असल्यानें त्यांचा अर्थ स्पष्ट समजत नाहीं, तरी ते फारच रमणीय लागतात.

आणि त्याच्या अंगाला लागलेल्या धुळीनें अंगभाग मलिन होत असतात. जे खरे धन्य व भाग्यवान् त्यांनाच अशा तऱ्हेचा अनुभव प्राप्त होतो.'

हा श्लोक या सर्व नाटकांत–एका हिशेबीं सर्व संस्कृत वाङ्मयांत–अत्युत्तम मानला गेला आहे. त्याची योग्यताही तशीच आहे. मुलाच्या गडबड्या प्रेमळ स्वभावाचें, त्याच्या पित्याच्या अंकावर बसण्याविषयींच्या उत्कंठेचें, त्याच्या मोकळेपणीं हिंडत असल्यानें धूळ लागून मलिन झालेल्या शरीराचें, व त्या धुळीच्या योगानें त्या प्रसंगीं त्याच्या पित्याच्या शरीरालाही येणाऱ्या कांहींशा मोहक मालिन्याचें,–उत्कृष्ट वर्णन करून शेवटीं अशा तऱ्हेचा अनुभव जे धन्य व भाग्यवान् असतात त्यांनाच प्राप्त होतो–असें कवीनें ह्मटलें आहे. हें सर्व तऱ्हेचें हृदयंगमत्व व अशी खुबी या एका लहानशा श्लोकांत जशी अप्रतिम साधली आहे तशी इतरत्र क्वचितच आढळेल.

अशा तऱ्हेच्या प्रसंगापासून होणारा आनंद राजापासून रंकापर्यंत सर्व पितृमात्रांना सारखा, व स्थितिपरत्वें कमीजास्त होणारा नसून सार्वत्रिक आहे.

हा श्लोक वाचून प्रसिद्ध जर्मन कवि गेटी जणों मोहून व वेडावून गेला, आणि तो कालिदासाचे धन्यवाद करीत शाकुंतलाचें पुस्तक मस्तकावर धरून आनंदानें नाचूं लागला, अशी आख्यायिका आहे.

गेटीसारख्यावर असा परिणाम झाला यांत आश्चर्य नाहीं. या श्लोकाची किंबहुना या ग्रंथाची योग्यताच अशी आहे कीं, असा परिणाम ज्याच्यावर न होईल तोच धन्य ह्मणावयाचा !

या वर्णनाप्रमाणें एक उत्तम तसबीर बनेल.

हे राजाचे विचार चालले आहेत तों तो मुलगा त्या सिंहाच्या बच्च्याशीं धिंगामस्ती करीत चालला होता, व तापसी त्याला आवरीत होती. ती शेवटीं ह्मणाली, 'अग बाई! हा मला कांहीं नाहीं आटोपत.' चोहींकडे पाहून तिनें पुनः ह्मटलें, 'कोणी ऋषिकुमार आहां कां रे येथें ?'

तोंच राजाकडे तिची दृष्टि गेली आणि त्याला तिनें ह्मटलें, 'अहो भले गृहस्थ, हा पोरगा या सिंहाच्या बच्च्याला घट्ट धरून त्रास देत आहे. तुह्मी तरी या त्रासांतून त्याला सोडवा तर.'

तापसीनें राजाला ओळखिलें नाहीं. तो कोणी संभावित गृहस्थ आश्रमांत कांहीं कामाकरितां आला आहे असें समजून सहजगत्या ती त्याला याप्रमाणें बोलली.

राजानें पुढें होऊन हंसत ह्मटलें, 'अरे ए महर्षिपुत्रा, आश्रमवासी स्थितीचें मुख्य ब्रीद सुखकारक व सात्विक असा संयम किंवा मनोनिग्रह. कृष्णसर्पाचें पोर चंदनाच्या झाडावर राहून त्याला दूषित करितें. तद्वत् इतक्या लहानपणींच याप्रमाणें दांडगाईचें आचरण करून तूं या वृत्तीला कां दूषित करितोस ?'

राजानें त्या मुलाला महर्षिपुत्र असें समजून, संबोधून, पुढें त्याच्या दांडगाईच्या वृत्तीवरून त्याला कृष्णसर्पाच्या पोराची थट्टेनें उपमा दिली आहे. त्या मुलाच्या वयाच्या मानानें हें भाषण त्याला समजण्याजोगें साधें व सोपें नाहीं. तरी सामान्य वर्णन या नात्यानें हें चांगलें नाहीं असें नाहीं. येथें महर्षिपुत्र हा शब्द बुध्द्या सूचक घातला आहे.

त्यानें त्या मुलाला–महर्षिपुत्रा–असें ह्मटलेलें पाहून तापसीनें राजाला ह्मटलें, 'अहो, हा ऋषिकुमार नव्हे.'

*राजा—'होय, आकृति व तिला अनुरूप* आचरण यांवरून सुद्धां हें उघड दिसतें. पण तो या ठिकाणीं आहे असें पाहून आह्मीं असा तर्क केला.'

नंतर त्यानें पुढें होऊन त्याला कुरवाळलें, त्याच्यापासून त्या सिंहाच्या बच्चाला सोडविलें, आणि त्याला प्रेमानें जवळ घेतलें. त्याच्या स्पर्शापासूनच त्याला विलक्षण आल्हाद वाटून तो आपल्याशींच ह्मणाला, 'थोर कुलाचा आधारभूत अंकूर अशा या मुलाच्या नुसत्या स्पर्शानेंच माझ्या सर्वेंद्रियांना असें अप्रतिम सुख होत आहे. तेव्हां ज्या धन्य पुरुषाचा हा औरस पुत्र असेल त्याला कितीतरी सुख होत असेल बरें ?!'

येथें कवीनें राजाचा त्या मुलाशीं संबंध असल्यामुळें प्रथमदर्शनींच व त्याचा सहज स्पर्श होतांच राजाला तो संबंध ज्ञात नसूनही–अलौकिक रीतीनें त्या संबंधाचें परिणामरूपी सुख झाल्याचें दर्शविलें आहे. पुढें हळू हळू राजाला हा आपलाच पुत्र असेल का, असें वाटावयास लागून, शेवटीं अनेक प्रत्यंतरांनीं--तो खराच आपलाच पुत्र आहे, असें समजण्यापूर्वींच त्याच्या मनाची बहुतेक खात्री झाल्याचें दाखविलें आहे. एक तऱ्हेनें हे जन्मांतरसौहृदाचेंच उदाहरण ह्मणून वर्णन केलें आहे.

येथून पुढील भाग एकंदरींत फारच मनोरम झाला आहे.

त्या दोघांना नीटपणें पहात तापसीनें ह्मटलें, 'मोठेंच आश्चर्य !'

राजा—'तें कसें काय ?'

ता०—'अहो, या मुलाची व आपली आकृति कशी अगदीं एक दिसते. शिवाय आपली ओळख नसूनही हा आपल्याशीं कसा अगदीं सरळ वागतो आहे !'

*सामान्यतः* खोडकर मुलें परक्याशीं बरींच विरुद्धपणें व दांडगाईनें वागतात. मांजराचीं पोरें परकी जवळ आलेला पाहून त्याच्यावर गुरगुरतात व केंस पिंजारतात–तशांतलें कांहीं हा करीत नाहीं–स्वस्थ समाधानानें बसला आहे.

अप्रतिलोमी हा शब्द येथें लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

राजानें यावर त्या मुलाला खेळवीत व कुरवाळीत ह्मटलें, 'हा मुनिकुमार नव्हे, तर कोणच्या वंशांतला ?'

ता०—'पुरुवंशांतला.'

राजानें आपल्याशीं ह्मटलें, 'काय, आह्मी एकाच वंशांतले ? तरीच आमचा तोंडवळा सारखा असल्याचें इला वाटलें.

'आपल्या पौरववंशांतील राजे प्रारंभीं सर्व रस व भोग यांनीं युक्त अशा राजभुवनांत राहतात, ते केवळ पृथ्वीचें पालन व रक्षण करण्याकरितांच. पण शेवटीं सर्व ऐश्वर्य व वैभव सोडून व केवळ एकपत्नीव्रत आणि अरण्यवास पतकरून ते तरुतळीं तपाचरण करीत राहतात. त्यांतला कोणी महात्मा येथें येऊन राहिलेल्याचा हा पुत्र असेल.'

नंतर त्यानें तापसीला उद्देशून ह्मटलें, 'पण येथें मनुष्याची स्वेच्छेनें गति नाहीं.'

ता०—'होय, आपण ह्मणतां तसेंच. पण अप्सरांच्या संबंधामुळें याच्या मातेचा या देवगुरूच्या तपोवनांत प्रवेश झाला व ती याला येथें प्रसवली.'

राजानें एकीकडेसें ह्मटलें— 'वाः हें दुसरें आशा वाटण्याला कारण.'

रा०—'पण कां हो, ती कोणच्या राजर्षीची पत्नी ?

हा प्रश्न ऐकून तापसीनें तोऱ्यानें व झिडकाऱ्यानें एकदम उत्तर दिलें, 'धर्मपत्नीचा

त्याग करणाऱ्या त्या मेल्याचें नांव घेण्याला तरी कोणाचें अडलें आहे?'

तिची ही उत्तरें देण्याची तऱ्हा पाहून तर राजाला अधिकच विस्मय झाला व आशा वाटूं लागली. त्यानें मनांत ह्मटलें, 'ही कथा जणों मलाच चिकटते आहे. या मुलाच्या आईचें नांव विचारूं का? छेः, परदारासंबंधी विचार अगदीं अयोग्य.'

राजाला हळू हळू हा मुलगा आपल्याच संबंधाचा असावा असें वाटण्याला एकेक नवें नवें प्रत्यंतर येत चाललें होतें. त्यां सर्वांचा निकाल त्या मुलाच्या आईचें नांव कळल्यानें होणार होता. पण कदाचित् तें नांव आपल्याला हवें तें न जुळलें व एकंदर कयास चुकीला ठरला, तर आपण परदारासंबंधें चौकशीची उठाठेव केल्यासारखें होणार, व असें करणें आर्य ह्मणविणाराला योग्य नव्हे–दोषार्ह आहे, असें तेव्हांच त्याच्या लक्षांत आलें. असें दाखवून त्याच्या मनाचा मोठेपणा व त्याची शुद्धता व्यक्त केली आहे. यांत राजाचा धीरोदात्त स्वभाव अप्रतिम वर्णन केला आहे.

इतक्यांत दुसरी तापसी मातीचा मोर घेऊन येतां येतां ह्मणाली, 'सर्वदमना, हें शकुंतलावण्य पहा.'

शकुंत शब्द मोरालाच लागतो असें नाहीं. तरी तो कवीनें बुध्द्या खुबीनें योजिला आहे. शकुंत ह्मणजे पक्षिविशेष किंवा सामान्य पक्षी. येथें याचा अर्थ केवळ या मातीच्या पक्ष्याच्या चित्राचें लावण्यसौंदर्य एवढाच घ्यावयाचा; पण शकुंतलावण्य हीं अक्षरें सारखीं उच्चारिलीं जातांच सर्वदमनाच्या आईचेंही नांव तेंच असल्यानें, त्याच्या मनांत आईविषयींच तापसी बोलली असें आलें, व त्यानें चटकन् 'कुठें आहे माझी आई?' असें डोळे मिचकावीत विचारिलें.

त्या मुलाच्या आईचें नांव शकुंतला होतें हें सहजपणें राजाच्या कानीं पडावें एवढ्याकारितांच या कुशल कवीनें ही योजना केली आहे.

हा त्याचा प्रश्न ऐकून दोघींनींही कौतुकानें हंसतसें ह्मटलें, 'नामसादृश्य व मातृस्नेह यामुळें फसला बिचारा.'

नंतर एकीनें ह्मटलें, 'अरे, या मातीच्या मोराच्या चित्राचें सौंदर्य तर पहा, असें ह्मटलें बरें इनें.'

हें ऐकून राजानें एकीकडेसें आपल्याशींच ह्मटलें, 'काय, या मुलाच्या आईचें नांव शकुंतला!–सारखीं नांवें पुष्कळ असतात. कदाचित् मृगतृष्णेप्रमाणें मला परिणामीं विषाद न होवो'.

या मुलाच्या आईचें नांव शकुंतला आहे, ती आपलीच प्रिया शकुंतला आहे असें मानून मनांत मांडे खाल्ले तर मृगतृष्णिकेवर विश्वास ठेवणाऱ्या मृगाप्रमाणें मला फसावें लागणार खास. कारण, नांवासारखीं नांवें पुष्कळांचीं असतात.

राजाला आपलीच प्रिया शकुंतला या मुलाची माता असेल असें बऱ्याच खात्रीनें वाटत चाललें होतें. किंबहुना ती तीच असावी अशी त्याला आशा वाटूं लागली होती. पण तसें नसलें तर मात्र आपणाला व्यर्थ विषाद होईल, असेंही त्याच्या मनांत आलें.

मुलानें 'माई, मला हा मोर चांगला आवडतो–' असें ह्मणत हात पुढें केला, तेव्हां तापसीनें त्याला तें चित्र दिलें. तें देतांना सहज तिची दृष्टि त्याच्या मनगटाकडे गेली. तों त्याच्यावर बांधलेलें रक्षाबंधन तेथें नाहीं, हें तिच्या दृष्टीस पडलें. तेव्हां तिनें–' अग बाई! याच्या हातांतलें रक्षाबंधन नाहीं!' असें गडबडीनें ह्मटलें.

तें ऐकून राजानें जवळपास पाहून, तें

पडलेलें होतें त्याच्याजवळ जाऊन, तें वर उचलून घेण्याचा यत्न करीत ह्मटलें; 'अहो, घाबरूं नका, हें पहा येथें तो सिंहाच्या बच्च्याशीं दांडगाई करीत असतांना गळून पडलें आहे.'

यावर, तो तें उचलून घेऊं पाहतो असें पाहून, दोघींनींही गडबडीनें व घाबऱ्यां घाबऱ्यां ह्मटलें, 'हं हं, त्याला तुह्मी हात नका लावूं.—अग बाई, उचललेंच कीं!' असें ह्मणून दोघींही उरावर हात ठेवून विस्मयानें, भीतीनें व आश्चर्यानेंशा एकमेकींकडे पाहूं लागल्या.

ही त्यांची स्थिति पाहून राजानें त्यांना ह्मटलें, 'अहो, नको कां ह्मणालां?'

त्यावर त्याच्याविषयीं आदरानें व आश्चर्यानें एकीनें त्याला उत्तर दिलें,' ऐका महाराज! ही अपराजिता नांवाची अद्भुत वल्ली, भगवान् मारीचांनीं याच्या जातकर्माच्या वेळीं याच्या हातांत बांधली. हा स्वतः किंवा याचे आईबाप, यांच्याशिवाय दुसऱ्यां कोणी ती भूमीवर पडलेली उचलूं नये असें आहे.'

रा०—'बरें, उचलली तर?

ता०—'तर ती त्याला साप होऊन डसते.'

रा०—'याचा तुह्मांला प्रत्यय आहे का?'

ता०—'हो, पुष्कळदां.'

हें ऐकून राजानें मोठ्या आनंदानें पण आपल्याशीं ह्मटलें, 'आतां मी स्वतःचे मनोरथ—शकुंतलाप्राप्तिरूपी—सफल झालेच असें मानून, स्वतःचें अभिनंदन कां करूनं घेऊं नये?'

राजाचा शकुंतलेशीं पुनः समागम होण्याचा हा प्रसंग कवीनें किती चमत्कृतिजनक, सहज, व मजेदार आणिला आहे! यांत सर्वच भाग व्यंग्य व भारदस्तपणाचा ठेविला आहे.

येथवर तापसींना :हा दुष्यंतराजाच आहे असें पक्कें कळलें असल्याचें त्यांच्या तोंडून स्पष्टपणें वदविलेलें नाहीं. पण तो दुसरा कोणी असता तर अपराजिता वल्ली त्याला साप होऊन डसती, तसें झालें नाहीं, यावरून तो दुसरा कोणी नसावा असें अनुमान करूनच त्यांनीं त्याला लगेच 'महाराज' असें बहुमानानें ह्मटल्याचें दाखविलें आहे. यांतील खरी खुबी सर्व सहृदय वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहींच.

राजानें आनंदानें मुलाला आलिंगन दिलेलें पाहून एका तापसीनें, 'सुभते, चल हा वृत्तांत व्रतनियमपरायण शकुंतलेला जाऊन कळवूं—' असें ह्मटलें व दोघीही निघून गेल्या. तेव्हां त्या मुलानें ह्मटलें, 'सोड मला, आईकडे जाऊं दे.'

राजा—'अरे पुत्रा, माझ्या बरोबरच चालून तूं आईला आनंद दे बरें.'

मुलानें चटकन् उत्तर दिलें, 'माझा बाप दुष्यंत, तूं नव्हेस कांहीं.'

हें ऐकून तर राजाला अधिकच आनंद झाला व तो हंसून ह्मणाला, 'या संबंधाच्या शंकेचा या वादानेंच पक्का निर्णय झाला.'

या भाषणप्रकारावरून त्या प्रसंगीं राजाला किती व कशा प्रकारचा आनंद झाला असेल याची इतरांना कल्पना सुद्धा होणें शक्य नाहीं. कारण, हे आनंदाचे प्रकार केवळ स्वसंवेद्य असतात.

दोघी तापसींनीं जाऊन झालेली हकीकत शकुंतलेला कळविली. ती ऐकून ती तशीच प्रत्यक्ष पाहण्याला निघाली. इतके दिवस पतीनें त्यक्त असल्यानें ती व्रतवैकल्यें करीत साध्या तापसवेशानें रहात होती. एकच वेणी घातलेली, वस्त्रें कांहींशीं मलिनच—वल्कलांसारखीं, व तोंडावर व सर्वांगावर अंतस्थ विरहशोकानें व प्रत्यादेशरूपी अपमानाच्या नित्यशः स्मरणानें पांडुरता व कृशता आलेली होती.

शकुंतला एक–वेणीधरा असल्याचें वर्णन केलें आहे, व हें विरह व शोकावस्थेचें द्योतक दर्शविलें आहे. रामायणांतही सीतेचें असेंच वर्णन आहे: "एक वेणीधरा बाला रामदर्शन-लालसा" (सुंदरकांड सर्ग ५७, श्लोक ४०). यावरून प्राचीन कालीं, निदान कालिदासाच्या वेळीं, प्रौढ स्त्रिया सामान्यतः विशेष कारण नसेल तेव्हां एकाहून अधिक वेण्या घालून केश शृंगारीत असत असें दिसतें. हा प्रकार अलीकडे विशेषतः यवनादिकांच्या स्त्रियांमध्यें दृष्टीस पडतो. सामान्यतः हिंदु प्रौढ स्त्रिया सर्वत्र एकच वेणी घालतात. लहान मुलींच्या वेण्या दोन तीन घातलेल्या आढळतात. हल्लीं या संबंधाचा विशिष्ट भेद म्हटला म्हणजे महाराष्ट्रांत वेणी घालणें व आंबाडा बांधणें हा आहे.

शकुंतलेनें आपल्याशीं म्हटलें, 'सर्वदमनाच्या हातांतील औषधीनें आपला गुण सोडला, हें ऐकून माझ्या नशीबाची मला आशाच राहिली नव्हती; पण कदाचित् सानुमतीनें सांगितलें होतें तद्वतच कांहीं प्रकार असेल.' आपल्या कमनशीबानें ती वडीदेखील हतवीर्य झाली, तेव्हां आतां पतिसमागमाची आशाच उरली नाहीं, असें म्हणावयाचें असें प्रथम तिच्या मनांत आलें; तितक्यांत सानुमतीनें तिला येऊन सांगितलेल्या राजाच्या प्रेमळ व विरहशोकग्रस्त स्थितीचें, व लौकरच तिला तिच्या पतीचा समागम होईल असें देव घडवितील असें सांगितलें असल्याचें तिला स्मरण झालें, व तेंही खरें होत असेल असें तिला वाटलें.

ती येत असलेली पाहून राजानें दुरूनच तिला ओळखिली व तो म्हणाला, 'अरे, हीच ती [illegible]चारी शकुंतला!

'ही मलिन वस्त्र नेसली आहे, व्रतें व नियम यांच्या योगानें इचें मुख कृश व रुक्ष झालें आहे. सर्व केशपाशाची एकच वेणी कशीतरी बांधलेली आहे. ही अत्यंत शुद्धाचरणी असून मी असा निष्ठुर व निष्करुण झालों, तरी ती मजसंबंधानेंच दीर्घ विरहव्रत धारण करून राहिली आहे.'

तिची त्यावेळची स्थिति पाहून, आपण तिला इतके कठोरपणें वागविलें असूनही ती केवळ आपल्याच संबंधानें व्रत नियम पाळीत विरहदुःख व प्रत्यादेशाचा अपमान सोशीत दुर्दशेंत राहिलेली आहे असें राजाच्या तेव्हांच नजरेस आलें.

शकुंतला पुढें आली व तिनें राजाला दूरूनचसें पाहिलें. पश्चात्तापामुळें व विरहदुःखानें त्याचा वर्ण पालटला होता. यामुळें तो दुष्यंतच खरा किंवा कसें याबद्दल तिला किंचित् शंका वाटली, व ती म्हणाली–'हे कांहीं आर्यपुत्र नव्हत–माझ्या रक्षामंगल केलेल्या मुलाच्या शरीराला आपल्या गात्रस्पर्शानें हा कोण दूषवितो आहे?'

हें भाषण तिनें खास राजाला उद्देशून व त्याला ऐकूं जाण्यासारखेंच केलें आहे किंवा कसें, याविषयीं विचार आहे. तसें आहे असें मानलें तर तिनें त्याला अगदींच ओळखिलें नाहीं असें दाखविलें, असें कदाचित् होईल. अथवा ओळखूनही बुध्द्या त्याला टोंचण्याकरितां ती असें बोलली, असेंही म्हणतां येईल. हें तिचें भाषण कांहींसें रागाचें व तिरस्काराचें तर होतेंच, पण यांतील किती अंश कृतक व किती खरा होता, हें ठरविणें कठिण आहे.

ती आलेली पाहतांच मुलगा राजाजवळून निघून तिच्याकडे गेला व जवळ जाऊन म्हणाला, 'आई, हा पहा ग कोण मला, पुत्र, पुत्र, म्हणून कुरवाळितो आहे!'

हें या वेळचें मुलाचें भाषण किती रमणीय

व गमतीचें आहे! याचें स्वारस्य तें वाचतांना तर वाटतेंच, पण प्रयोगांत प्रत्यक्ष पाहून ऐकतांना याचा बहुतेक प्रेक्षकांच्या मनावर किती तरी गमतीचा व मोहक परिणाम होतो.

रा०—'प्रिये, त्यावेळीं तुझ्याशीं क्रूरपणानें वागलों, तरी तूं तें सारें विसरून जाऊन यावेळीं मजवर प्रसन्नच झालेली दिसते आहेस. तेव्हां मी आपणाला मोठा भाग्यवान् समजतों.'

हें ऐकून शकुंतलेनें मनांत ह्मटलें, 'मना, धीर धर, धीर धर. आजवर दैव जणों माझा मत्सर करीत होतें, ह्मणून त्यानें मला असें दुःख सोसण्यास लावलें. पण, यावेळीं दैवाची मजवर दया दिसते.–हे आर्यपुत्रच खरे.'

ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून राजानें पुनः ह्मटलें—'प्रिये, ग्रहणरूपी व्याधीपासून मुक्त झालेल्या चंद्रमंडळाशीं चंद्रप्रिया रोहिणीचा समागम व्हावा, तद्वत् पुनः स्मृति झाल्यानें मोह नाहींसा होऊन माझें मन स्वच्छ होतांच तुझ्या सुमुखाचें मला दैवानें दर्शन घडलें, हें मला अत्यंत आनंदकारक झालें आहे.'

हेंही वर्णन राजाच्या मनाची उल्हसित स्थिति व त्याच्या मनांतील शकुंतलेची समजूत करून तिला योग्य रीतीनें आळविण्याची इच्छा वगैरे गोष्टी उत्तम तऱ्हेनें व्यक्त करितें. चंद्रग्रहणाच्यासंबंधें कालिदासाची काय समजूत होती, हेंही यावरून उघड होतें. राहू ह्मणून कोणी क्रूर दैत्य असून तो चंद्राला गिळून टाकतो, ही सामान्य लोकांत प्रसिद्ध असलेली कल्पना त्याला संमत नसून, केवळ चंद्रबिंब अंधकारांत गेल्यामुळें तेवढ्यापुरतें त्याला ग्रहण लागतें असेंच तो मानीत होता, हें स्पष्ट आहे.

राजाचें हें प्रेमळ, खुलविणारें, पश्चात्तापद्योतक, व खुबीदार भाषण ऐकतांच शकुंतलेच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली. त्याचें अभिनंदन करण्याच्या तऱ्हेनें 'आर्यपुत्राचा जयजयकार असो,' इतकें ह्मणतां ह्मणतां तिचा कंठ आनंदानें व गहिंवरानें दाटला. तिच्यानें पुढें बोलवेना सुद्धा. ती तशीच स्वस्थ राहिली. या अर्धवटशा वाक्यांत कवीनें जणों तिच्या मनावर झालेल्या परिणामाच्या वर्णनाची कमाल केली आहे.

तिची ती स्थिति पाहून राजा ह्मणाला, 'हे सुंदरी, विरहाग्नींत होरपळत असल्यानें तुझे ओष्ठ व मुख निस्तेज व फिकट पडलेले—माझा जयजयकार करीत असतांना कंठ दाटून आल्यानें शब्द निघत नाहींत, अशा स्थितींत फारच मोहक झालेलें—मला पाहण्यास मिळत आहे, तेव्हां मी मोठा धन्य आहें.'

त्या दोघांची ही अशी स्थिति झालेली व भाषणें चाललेलीं पाहून सर्वदमनानें मध्येंच ह्मटलें, 'आई, कोण ग हा?' त्याला शकुंतलेनें उत्तर दिलें, 'बाळा, आपल्या नशिबाला विचार.'

या तिच्या भाषणाचा रोंख पाहून अद्यापि तिच्या मनांतील नाराजी व किंतु पूर्णपणें गेला नाहीं असें राजानें ताडून तिच्या पायां पडून ह्मटलें 'हे सुतनु–प्रिये, प्रत्यादेशदुःखरूपी शल्य मनांतून काढून टाक. त्या वेळीं कशामुळेंसा माझ्या मनाला मोठा प्रबल मोह पडला होता. मनोवृत्तीवर गाढ तमाचें पटल पडलें असतें, तेव्हां त्याची शुभगोष्टींसंबंधें सुद्धा अशीच तऱ्हा होते. गळ्यांत टाकलेली पुष्पमाला देखील अंधळा ती सर्प समजून झिडकारून टाकितो.'

हा श्लोक उत्तमांतला आहे. तो सरळ, साधा, पण प्रौढ असून त्याच्यांत कितीतरी व्यंग आहे. व शेवटचा चरण ह्मणीसारखा उत्कृष्ट साधला आहे.

व गमतीचें आहे। याचें स्वारस्य तें वाचतांना तर वाटतेंच, पण प्रयोगांत प्रत्यक्ष पाहून ऐकतांना याचा बहुतेक प्रेक्षकांच्या मनावर किती तरी गमतीचा व मोहक परिणाम होतो.

रा०—'प्रिये, त्यावेळीं तुझ्याशीं क्रूरपणानें वागलों, तरी तूं तें सारें विसरून जाऊन यावेळीं मजवर प्रसन्नच झालेली दिसते आहेस. तेव्हां मी आपणाला मोठा भाग्यवान् समजतों.'

हें ऐकून शकुंतलेनें मनांत ह्मटलें, 'मना, धीर धर, धीर धर. आजवर दैव जणों माझा मत्सर करीत होतें, ह्मणून त्यानें मला असें दुःख सोसण्यास लावलें. पण, यावेळीं दैवाची मजवर दया दिसते.–हे आर्यपुत्रच खरे.'

ती कांहीं बोलत नाहीं असें पाहून राजानें पुनः ह्मटलें—'प्रिये, ग्रहणरूपी व्याधीपासून मुक्त झालेल्या चंद्रमंडळाशीं चंद्रप्रिया रोहिणीचा समागम व्हावा, तद्वत् पुनः स्मृति झाल्यानें मोह नाहींसा होऊन माझें मन स्वच्छ होतांच तुझ्या सुमुखाचें मला दैवानें दर्शन घडलें, हें मला अत्यंत आनंदकारक झालें आहे.'

हेंही वर्णन राजाच्या मनाची उल्हसित स्थिति व त्याच्या मनांतील शकुंतलेची समजूत करून तिला योग्य रीतीनें आळविण्याची इच्छा वगैरे गोष्टी उत्तम तऱ्हेनें व्यक्त करितें. चंद्रग्रहणाच्यासंबंधें कालिदासाची काय समजूत होती, हेंही यावरून उघड होतें. राहू ह्मणून कोणी क्रूर दैत्य असून तो चंद्राला गिळून टाकतो, ही सामान्य लोकांत प्रसिद्ध असलेली कल्पना त्याला संमत नसून, केवळ चंद्रबिंब अंधकारांत गेल्यामुळें तेवढ्यापुरतें त्याला ग्रहण लागतें असेंच तो मानीत होता, हें स्पष्ट आहे.

राजाचें हें प्रेमळ, खुलविणारें, पश्चात्ताप-द्योतक, व खुबीदार भाषण ऐकतांच शकुंतलेच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली. त्याचें अभिनंदन करण्याच्या तऱ्हेनें 'आर्यपुत्राचा जयजयकार असो,' इतकें ह्मणतां ह्मणतां तिचा कंठ आनंदानें व गहिंवरानें दाटला. तिच्यानें पुढें बोलवेना सुद्धा. ती तशीच स्वस्थ राहिली. या अर्धवटशा वाक्यांत कवीनें जणों तिच्या मनावर झालेल्या परिणामाच्या वर्णनाची कमाल केली आहे.

तिची ती स्थिति पाहून राजा ह्मणाला, 'हे सुंदरी, विरहाग्नींत होरपळत असल्यानें तुझे ओष्ठ व मुख निस्तेज व फिक्कट पडलेले–माझा जयजयकार करीत असतांना कंठ दाटून आल्यानें शब्द निघत नाहींत, अशा स्थितींत फारच मोहक झालेलें–मला पाहण्यास मिळत आहे, तेव्हां मी मोठा धन्य आहें.'

त्या दोघांची ही अशी स्थिति झालेली व भाषणें चाललेलीं पाहून सर्वदमनानें मध्येंच ह्मटलें, 'आई, कोण ग हा?' त्याला शकुंतलेनें उत्तर दिलें, 'बाळा, आपल्या नशिबाला विचार.'

या तिच्या भाषणाचा रोंख पाहून अद्यापि तिच्या मनांतील नाराजी व किंतु पूर्णपणें गेला नाहीं असें राजानें ताडून तिच्या पायां पडून ह्मटलें 'हे सुतनु–प्रिये, प्रत्यादेशदुःखरूपी शल्य मनांतून काढून टाक. त्या वेळीं कशामुळेंसा माझ्या मनाला मोठा प्रबल मोह पडला होता. मनोवृत्तीवर गाढ तमाचें पटल पडलें असतें,तेव्हां त्याची शुभगोष्टीसंबंधें सुद्धा अशीच तऱ्हा होते. गळ्यांत टाकलेली पुष्पमाला देखील अंधळा ती सर्प समजून झिडकारून टाकितो.'

हा श्लोक उत्तमांतला आहे. तो सरळ, साधा, पण प्रौढ असून त्याच्यांत कितीतरी व्यंग्य आहे. व शेवटचा चरण ह्मणीसारखा उत्कृष्ट साधला आहे.

राजानें शकुंतलेचा–तिच्या मतानें निष्कारण धिक्कार करून–अपमान व अपराध केला होता. त्याचें अशा तऱ्हेनें प्रांजळपणानें पायां पडून त्यानें क्षालन केलें. तें त्याच्या थोर व उदात्त स्वभावाला शोभे असेंच आहे.

तो पायां पडलेला पाहून शकुंतलेनें प्रेमानें व किंचित् दुःखाच्या व पश्चात्तापाच्या झांकीनें म्हटलें, 'उठावें–उठावें आर्य पुत्रा ! माझ्या सुदैवाला कांहीं तरी पूर्व संचितच त्यावेळीं आड आलें, म्हणूनच आपण तसे वागलां. याचा सर्व दोष माझ्या नशीबाकडे, आपण थोर मनाचे व कृपाळू–आपल्याकडे कांहीं नाहीं.'

हें ऐकून व तिनें आपल्याला सर्वथैव क्षमा केली असें पाहून राजा उठला. शकुंतला पुनः म्हणाली, 'पण आर्यपुत्रांना माझें बिचारीचें स्मरण कसें झालें !'

त्यानें प्रेमळपणानें उत्तर दिलें 'मूळ विषादाचें कारण–शल्य–काढून टाकून सांगतों.

'हे सुतनु, त्यावेळीं मी मोहामुळें नेत्रांतून ओठावर गळून तुला अत्यंत बाधा करणारा अश्रुबिंदु स्वतः प्रेमानें पुसून टाकण्याची उपेक्षा केली. हल्लीं किंचित् वक्र झालेल्या पापणीला लागलेला हा अश्रुबिंदु पुसून तरी त्या मोहाचें व तदुत्पन्न पश्चात्तापाचें परिमार्जन करूं दे.' असें म्हणून त्यानें तिला जवळ घेऊन तिचे अश्रुबिंदु प्रेमानें पुसून टाकले.

पूर्वी शकुंतला स्वतः आपल्याकडे आनंदानें आलेली, तिचा मोहामुळें निष्कारण धिक्कार केला. तेव्हां दुःखातिशयानें तिच्या नेत्रांतून अश्रुबिंदु गळून, तिच्या अधरोष्ठावर पडले. तेव्हांच ते पुसून टाकून मी तिची समजूत करावयाची ती केली नाहीं. हल्लीं आनंदाच्या भरानें व तसेंच पूर्ववृत्तस्मरणानेंही तिच्या डोळ्यांला अश्रु आले आहेत. ते तरी स्वतः पुसून पूर्वीच्या मोहाचें व कठोरपणाचें क्षालन करून ता[illegible] अशा हेतूनें राजानें हें भाषण [illegible] फारच योग्य, प्रेमळ व हृदयंगम आ[illegible]

राजानें तिचे अश्रुबिंदु पुसण्याक[illegible] जवळ घेतलें व हातानें तिचे डोळे पुस[illegible] सहज तिची दृष्टि त्याच्या बोटांत अ[illegible] नामाक्षरें कोरलेल्या अंगठीकडे गेली. तेव्ह[illegible] एकदम म्हटलें–'आर्यपुत्रा, हीच ती अंग[illegible]

राजा–'तिच्या लाभामुळेंच तर पूर्ववृ[illegible]ताची मला स्मृति झाली.'

शकुं०—'हिनें त्यावेळीं फारच घा[illegible] केला. आपल्याला प्रत्यय देण्याच्या प्रसंगीं को[illegible] मेली नाहींशी झाली !'

रा०—'वेल बहारीला आली म्हणजे तिला पुष्पें येऊं लागतात. तद्वत् हल्लीं तुला आनंदाचा बहार आला आहे, त्याचें चिन्हच जणों ही तूं पुनः धारण कर.'

ही अंगठी परत तुजजवळच असूं दे म्हणण्याचें हें भाषण किती सार्थ, प्रेमळ व खुबीदारीचें आहे !

शकुंतलेनें चटकर उत्तर दिलें, 'नको नको, तिनें मला एकदा फसविलें. आतां नाहीं मला तिचा विश्वास येत. आपली आपणच ठेवा.'

येथवर राजा व शकुंतला यांच्या अवचित समागमानंतर परस्पर खुलासा होऊन पूर्व प्रेम स्थापित होण्याला अवश्य तितकीं भाषणें झालीं. अधिक भाषणें होण्यांत विशेष स्वारस्य किंवा रसपोष नाहीं हें जाणूनच जणों या ठिकाणीं मातलीचा ओघानें प्रवेश आणिला आहे.

इतक्यांत मातलीनें येऊन सर्व प्रकार पाहत आनंदानें म्हटलें, 'सुदैवानें धर्मपत्नीचा समागम व पुत्रमुखदर्शन घडल्याबद्दल मी अभिनंदन करितों. आपली वृद्धि होवो !'

रा०–'माझ्या मनोरथाला मधुर फळें येऊन

ालें- मातली, हा वृत्तांत इंद्राला ऊ कां हो?'

नें हंसत ह्मटलें, 'ईश्वरांना–थोरांना–सें काय? चलावें, भगवान् मारीच ा दर्शन देताहेत.'

–'शकुंतले, पुत्राला घे. बरोबरच जाऊन चें दर्शन घ्यावें ह्मणतों.'

याला तिनें आपल्या नैसर्गिक स्वभावास सरून लाजत व लडिवाळपणानें उत्तर दिलें, डिलांच्या समोर बरोबरच जाण्याची मला ई लाज वाटते.'

वडील माणसांपुढें नवऱ्यासह किंवा त्याच्या बरोबर जाणें येणें ठीक नाहीं अशी कालिदासाच्यावेळींही–हल्लीं आहे तशीच–दृढ समजूत होती, असें दिसतें. असें करण्यांत त्यांचा किंचित् अवमान होतो, असें समजलें जातें.

राजानें तिची समजूत करीत व खुलवीतसें ह्मटलें, 'मंगल प्रसंगीं असें करावेंच लागतें. चल, चल–' असें ह्मणून सर्वजण निघाले.

भगवान् मारीच अदितीसह आसनावर बसलेले होते. त्यांनीं राजा येत असलेला पाहून ह्मटलें–'दाक्षायणी, दुष्यंत नांवाचा प्रतापी पृथ्वीपति तो हा. युद्धामध्यें तो इंद्राहूनही कांकणभर अग्रणी–त्याच्या धनुष्यानेंच इंद्रवज्राचीं कामें भागविलीं असल्यानें, हल्लीं तें इंद्राला नुसतें आभरण झालें आहे.'

मारीचानें दुष्यंताची योग्यता जणों इंद्रापेक्षांही कांकणभर जास्त असें सुचविलें आहे. तरी यांत इंद्राची योग्यता कांहीं कमी आहे असा प्रकार मुळींच दिसत नाहीं. हीच वर्णन करण्याची खुबी.

दाक्षायणी–'याच्या आकृतीवरूनही हा तसा प्रतापी असावा, असें तेव्हांच दिसतें.'

मातली–'आयुष्मंता, देवादिकांचे पितर असे हे भगवान् मारीच व अदिती–यांची दृष्टि तुमच्याठायीं पुत्रवात्सल्यानें भरलेली दिसते. ते प्रसन्नचित्त आहेत, चला त्यांच्याजवळ जाऊं.'

राजानें सादरानंदानें ह्मटलें, 'हें काश्यप–दाक्षायणीचें जोडपें फारच थोर व पूज्य–सर्व व्यासादि मुनींनीं द्वादश विभागात्मक सर्व पृथ्वीवरील तेजाचें हें आदिकारण मानिलें आहे–यज्ञभाग ग्रहण करणाऱ्या देवांचा स्वामी इंद्र यांच्याच पोटीं उत्पन्न झाला. इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष परम पुरुष व स्मयंभू भगवंतानें वामन अवतार घेण्याला हेंच योग्य स्थान ठरविलें, आणि ब्रह्मदेवाच्या व यांच्या मध्यें सारी एकच पिढी आहे, अशी यांची योग्यता.'

राजानें मारीच व दाक्षायणी यांची योग्यता अवर्णनीय थोर असल्याचें वर्णन करून त्यांच्याविषयीं आपला आदर व्यक्त केला आहे. मुनी लोकांनीं यांचें वर्णन केल्याचा उल्लेख करून व्यासादिकांनीं केलेल्या पुराणांचें व त्यांत वर्णन झालेल्या वामनादिक अवताराविषयींचेंही अवतरण केलें आहे. यावरून कालिदासाच्या वेळींही वामनादिक अवतार व तद्वर्णनविषयक पुराणें उपलब्ध व प्रसिद्ध होतीं हें सिद्ध आहे. तीं पुराणें अलीकडे जितकीं आधुनिक मानण्याचा प्रघात पडला आहे, तितकीं तीं आधुनिक नसून त्यांतून कांहीं–निदान कालिदासाच्या कालापूर्वीं–झालेलीं असावीं असें मानण्याला हरकत नाहीं.

या श्लोकाची रचना प्रौढ, सरळ व प्रसादप्रचुर आहे.

मातली–'हो खरेंच.' नंतर राजानें पुढें होऊन उभयतांना अभिवादन करीत ह्मटलें, 'आपणा उभयतांनाही हा मी वासवानें कामीं लावलेला दुष्यंत नमस्कार करितों.'

यांत वासवानुदोज्य हें पद आपण त्या उभयतांचा पुत्र वासव–इंद्र–याचा मित्र असल्यानें

त्यांच्या मनांत आपल्याविषयीं पुत्रवत् प्रेम वाटावें ह्मणून राजानें योजिलें आहे.

मारीच—'वत्सा, चिरंजीव हो–पृथ्वीचें पालन कर!'

अदिती—'वत्सा, अप्रतिरथ हो!'

शकुंतला–'पुत्रासहित मी आपल्या पायां पडतें.'

मारीच–'वत्से, तुझा भर्ता आखंडलाप्रमाणें व पुत्र जयंतासारखा, तेव्हां तूं स्वतः पौलोमीसारखी हो, याशिवाय दुसरा कोणचा आशीर्वाद तुला योग्य?'

आदिती–'बाळे, तूं पतीला मान्य हो. हा बाळ दीर्घायु व उभय कुलांला आनंद देणारा खचित होईल.'

हे दोन्ही आशीर्वाद देणाऱ्यांना व घेणाऱ्यांना सर्व तऱ्हेनें योग्य व आवडतीळ असेच आहेत.

सर्वजण मारीचाच्या सभोंवार यथायोग्य स्थानीं बसले. मारीच एकेकाचें वर्णन करीत ह्मणाला,

'तुह्मी मोठे भाग्यवान्; ही साध्वी शकुंतला–हा उत्तम पुत्र सर्वदमन–आणि हा तूं स्वतः, हा योग श्रद्धा, वित्त, आणि विधि, यांच्या समागमाप्रमाणें अभिनंदनीय–याचें माहात्म्य काय वर्णन करावें?'

ही स्वतःची प्रशंसा ऐकून तिच्या विषयीं बोलणें सोडून मारीचाचीच थोरवी वर्णन करीत राजानें आदरानें ह्मटलें,–'भगवंता, प्रथम मनोरथाची पूर्णता, नंतर आपलें दर्शन.

'हा अनुग्रह अगदीं अपूर्व. कारण, सामान्यतः प्रथम फूल, मागाहून फळ–अगोदर अभ्रें येतात, नंतर जलवृष्टि होते. असा हा कार्यकारणांचा सामान्यतः क्रम. पण आपल्या प्रसादाची गोष्टच विलक्षण–पूर्वींच सर्व संपदा प्राप्त झालेली!'

प्रथम दर्शन घडल्यावर पुढें प्र[illegible] अभिमत प्राप्तिरूपी फल मिळावयाचे [illegible] पला प्रकार विलक्षणच.–आपण प्रथम [illegible] सिद्धि करून दिली व नंतर आपलें दर्श[illegible] या भाषणांत राजानें त्याचें अत्यंत गौ[illegible] आहे.

हाही श्लोक लहानसाच पण चटकदार [illegible]

मातली–'हे थोर सृष्टिकर्ते, यांच्या प्र[illegible] दाची तऱ्हाच ही अशी.'

राजा–'भगवंता, या आपल्या सेवेकरिणि[illegible] मी गांधर्वविधीनें वरिलें. कांहीं कालानंतर तिच्या बांधवांनीं तिला मजकडे आणिलें. तेव्हां स्मृतिशैथिल्यामुळें मी तिचा प्रतिषेध करून आपले सगोत्र कण्व यांचा मी मोठा अपराधी झालों. पुढें अंगुलीयकाचें दर्शन होतांच तिच्याशीं लग्न झालें असल्याचें मला स्मरण झालें. हें सारेंच मला मोठें विलक्षण वाटतें. हत्ती समोरून चालला असतांना तो खरा नव्हे असा संशय व्हावा, आणि पुढें त्याचीं पाउलें पाहून प्रत्यय वाटावा, तशांतली माझ्या मनाची ही स्थिति कशी काय झाली कोण जाणें!'

कण्वाचा व मारीचाचा सगोत्र संबंध, कण्वकन्येचा आपण निष्कारणसा प्रतिषेध केलेला, तो आपल्या हातून कां व कसा घडला, कांहींच कळत नाहीं–यामुळें काश्यप व कण्व खचित नाराज झाले असतील. त्यांची माफीशी मागून समजूत करावी व साधल्यास या गोष्टीचा त्यांच्याकडून खुलासा करून घ्यावा ह्मणून राजा असें बोलला आहे. हेंही भाषण प्रौढ, साधें, सरळ व मनापासून केलेलें आहे.

मारीच—'वत्सा, यांत तुझा कांहीं अपराध आहे ही शंका सोडून दे; तुझ्या ठिकाणीं संमोह होणें सुद्धा संभवत नाहीं. ऐक—'

कौतुकानें व समाधानानेंसें म्हटलें, ...क ऐकतों आहें.'

...—'अप्सरस तीर्थावर अवतरलेल्या मे... ...कुंतलेची विव्हळ स्थिति प्रत्यक्ष पाहून ...दाक्षायणीकडे आणिलें, तेव्हांच मी ध्या... ...णिलें कीं, या बिचाऱ्या धर्मपत्नीचा तूं ... केलास तो दुर्वासाच्या शापामुळें, उगीच ... तो शाप अंगुलीयदर्शनानेंच संपणारा ...ा.'

हें ऐकून राजाला आपल्यावरील मोठा दुस्सह ...ार उतरल्यासारखें झालें व तो उसासा टाकून म्हणाला, 'मी अपवादापासून मुक्त झालों!'

येथवर आपण शकुंतलेसंबंधानें इतके मूढ कां व कसे झालों याबद्दल त्याचें त्यालाच गूढ पडलें होतें. आपण जाणूनबुजून जननिंदेला भिऊन अशा तऱ्हेनें अज्ञान दाखवीत आहों अशी सामान्यतः सर्व जनांची समजूत होऊन याबद्दल सर्व लोक नांवें ठेवणार खास, हें त्याला माहित होतें. याला त्याच्याजवळ कांहीं योग्य उत्तर नव्हतें. आतां मारीचाच्या तोंडून खरा प्रकार कळल्यापासून त्याला आपल्यावरील हा भार हलका होऊन, आपलें तोंड उज्वल झालें असें वाटूनच त्यानें उसासा टाकला, व हें असें भाषण केलें आहे.

शकुंतलेनें आपणाशींच म्हटलें, 'यांनीं माझा प्रत्यादेश उगीचच केला नाहीं असें सुदैवानें ठरलें, हें फार चांगलें झालें.—पण मला बाई कोठें कोणी शाप दिल्याचें कांहीं स्मरत नाहीं—अथवा तो मिळाला असूनही विरहामुळें माझें मन ठिकाणावर नसल्यानें तो मला कळला नसेल. तरीच बरें मला सख्यांनीं यांना अंगुलीयक दाखीव म्हणून बजाविलें होतें तें!'

या वेळीं हे विचार शकुंतलेच्या मनांत येणें किती सहज आहे! यांत कवीनें तिला तिच्या संबंधें घडलेल्या पूर्ववृत्तांताचें योग्य स्मरण व त्या गोष्टीचें सकारणत्व व्यक्त करून दिलें आहे.

शकुंतला कांहींच बोलत नाहीं, तरी तिच्या मनांत कांहीं तरी नवऱ्याविषयींचाच विचार चालला आहे, असें पाहून तिची समजूत करीत मारीचानें म्हटलें—'वत्से, तुला हवें होतें तें सारें प्राप्त झालें आहे. या आपल्या सहधर्मचारी पतीवर आतां तूं राग धरूं नकोस. हें पहा, शापामुळें स्मृति निरुद्ध होऊन तुझ्या पतीला मोह पडला होता. म्हणूनच त्यावेळीं तो तसा रुक्ष होऊन त्यानें तुझा तसा प्रतिषेध केला होता—तो त्याचा मोह नष्ट झाला.

'आतां त्याच्यावर तुझीच सत्ता आहे. मळ बसल्यामुळें अंधुक झालेल्या आरशांत प्रतिबिंब चांगलें पडत नाहीं—पण तोच आरसा स्वच्छ झाला म्हणजे तें प्रतिबिंब सहज व स्वच्छ दिसतें.

अंगुलीयकदर्शनापर्यंत तुझ्या पतीच्या हृदयपटलावर जणों मलिनता येऊन त्याच्यांत तुझ्या रूपाचें व तुजसंबंधी वास्तविक स्थितीचें प्रतिबिंब स्वच्छ उमटलें नाहीं. अंगुलीयकदर्शन होतांच तो मळकटपणा पार पुसून गेला. आणि त्याच्यांत सर्वत्र तुझेंच प्रतिबिंब पडलें. आतां त्याच्यावर तुझीच सर्वपरी सत्ता झाली आहे.

हेंही वर्णन व या श्लोकाची रचना फार सुरेख आहे.

रा०—'भगवंता, आपण म्हणतां तसेंच खरें.'

मारीचानें राजाला विचारिलें, 'वत्सा, आम्ही यथाविधि ज्यातकर्मादिक केलेला हा तुझा शाकुंतलेय पुत्र—याचें अभिनंदन केलेंस का? हा तुला आवडतो का?'

रा०—'भगवंता, हाच माझ्या कुलाला पुढें चालविणारा आधार—त्याचें मी कसें अभिनंदन करणार नाहीं?'

मा०—'वत्सा, हा तसाच भाग्यशाली चक्रवर्ती

होईल, समजलास? हें पहा, हा अप्रतिरथ वीर सर्व जलधींच्याही पलीकडे जाऊन सप्तद्वीपा पृथ्वीचा पूर्ण विजय करील.

'आश्रमांतील सत्वांचें पूर्णपणें दमन करितो ह्मणून त्याला सर्वदमन हें नांव प्राप्त झालें आहे. पण पुढें सर्व प्रजेचें उत्कृष्ट भरण करणार ह्मणून सर्व लोक त्याला भरत असें ह्मणतील.'

हाही श्लोक साधा, सरळ, तरी प्रसाद-प्रचुर आणि जणों आशर्वादात्मक आहे.

त्याचा गौरव करीत राजानें उत्तर दिलें, 'भगवंतांनीं त्याचे संस्कार केलेले, तेव्हां या सर्व गोष्टी याच्या हातून खास होणारच.'

अदिती–'भगवन्, कन्येचे सर्व मनोरथ सफल झालेले कण्वाला कळवून द्यावें, नाहीं कां? दुहितृवत्सला मेनका येथेंच सेवेंत हजर आहे.'

हें ऐकून शकुंतलेनें आपल्याशीं ह्मटलें, 'भगवतीनें जणों माझ्या मनचीच गोष्ट सांगितली.' सर्वांना आपल्या संबंधाचें आनंदाचें वर्तमान आपल्या मातापितरांना कळावें अशी साहजिकच इच्छा असते.

मारीच–'तपप्रभावामुळें त्यांना त्या सर्व गोष्टी कळतच आहेत.'

राजा–'तरीच ते मजवर रागावले नाहींत.'

मारीच––'तरी पण आपण त्याला कळविलें पाहिजे. कोण आहे रे तिकडे? गालवा, आतांच आकाशमार्गानें–पक्षासारखा जाऊन–माझ्याकडून कण्वाला प्रिय निवेदन कर कीं, तो शाप निवृत्त होतांच स्मृति झालेल्या दुष्यंतानें पुत्रवती शकुंतलेचा स्विकार केला आहे ह्मणून.'

शिष्य–'जशी आपली आज्ञा' असें ह्मणून निघून गेला.

मारीच–'वत्सा, तूंही आपल्या मित्राच्या रथावर बसून भार्यापुत्रासह राजधानीला जा.'

राजा–'जशी आपली आज्ञा.'

मारीच–'वत्सा, आणखी तुझें काय प्रिय करावें, तें सांग.'

राजा–'आणखी प्रिय तें काय असणार? तरी, भगवान् इच्छितातच तर हें प्रिय–भरत वाक्य–असो.

'राजे प्रजेच्या हिताकरितां झटोत, विद्वान् व श्रेष्ठ कवींची श्रेष्ठ वाणी अमर राहो, आणि सर्वव्यापी, सर्वशक्तिमान, स्वयंभु, व नील-लोहित शंकर, माझा संसारचक्रक्रम नाहींसा करो.'

हें भरतवाक्य किती साधें पण रसाळ आणि प्रासादिक आहे! यावरून कवीची या वेळे प्रौढ व शांत स्थिति उत्तम व्यक्त होते.

असें ह्मणून सर्व निघून गेले.

या एकंदर नाटकांत हा अंक रचना, प्रयोग, पात्रांचें व प्रवेशांचें वैचित्र्य, इत्यादिकांच्या संबंधानें फार चांगला साधला आहे. याच्यांत सर्व कथाभागाचा सहजगत्या व चतुरपणानें समारोप केलेला आहे. इंद्राच्या सभेंत दुष्यंताच्या कर्तबगारीबद्दल व शौर्याबद्दल इंद्रानें त्याचा बहुमान केला व त्याला आपल्या पुत्रापेक्षांही अधिक मान दिला. या संबंधाचें प्रत्यक्ष प्रदर्शन कदाचित् किंचित् अधिक प्रेक्षणीय झालें असतें. पण त्यांत इंद्रादिक देव व लोकपाल यांना सामान्य जनांप्रमाणें रंगभूमीवर आणावें लागतें. असें करणें योग्य नव्हे, ह्मणूनच त्याचें वर्णन सहजगत्या राजा व मातली यांच्या भाषणांत आणिलेलं दिसतें. मातलीच्या सर्व भाषणांत त्याची नैसर्गिक प्रौढि व इंद्राविषयींचा दाखविलेला आदर चांगला व्यक्त केला आहे. पुढें निरनिराळ्या वायुमार्गाचें सुरेख वर्णन केलें आहे. बहुतेक याच प्रसंगावरून भवभूतीनें, राम लंकेहून अयोध्येस परत विमानांतून जातेवेळचें वर्णन केलेलें आहेसें दिसतें. पण,

त्यांत व यांत किती तरी अंतर आहे. मारीचाश्रमवर्णन, सहजगत्या सर्वदमनाचें राजाला दर्शन व भेट, व हळू हळू तो आपलाच पुत्र आहे असें त्याला पक्कें ज्ञान होत जाऊन त्यामुळें झालेल्या मनोविकारांचें व आनंदाचें वर्णन, त्याच्याच संबंधानें घडलेली शकुंतलेची भेट—उभयतांचें पूर्व वृत्तांताविषयींचें खुलासा होण्याजोगें भाषण—वगैरे भाग व पुढें मारीच ऋषि व अदिती यांचें दर्शन होऊन, मूळ मोह पडण्याच्या कारणाचा खुलासा, स्वतः राजाचा दोष नसल्याचें सिद्ध होणें, व मुलासंबंधाचे आशीर्वाद, वगैरे सर्वच भाग अप्रतिम साधले आहेत.

या नाटकाची प्रशंसा काव्य या नात्यानें किंवा नाटक याही नात्यानें करावी तितकी थोडी आहे. इतकें उत्तम व सर्वतोभद्र नाटक हेंच—आणि असें नाटक रचणारा तो कवीही धन्यच होय.



समाप्त.

